# अनुक्रमणिका.



# प्रस्तावना.



सन १८९९ साली ग्रंथमालेंतून माझें अशोकचरित्र पुस्तकरूपानें बाहेर पडलें. तें वाचून प. वा. न्यायमूर्ति माधवरावजी रानडे यांनीं आपला संतोष प्रदर्शित केला, आणि बौद्धधर्माचा साद्यंत इतिहास लिहिण्याचें काम मीं हातीं घ्यावें अशी सूचना केली. ही सूचना म्हणजे त्या महर्षीची अनुल्लंघनीय अशाच होय, म्हणून मीं ती शिरसा वंद्य समजून तेव्हांपासून त्या विषयाच्या अध्ययनाकडे आपलें लक्ष लाविलें. तथापि विषय अमर्याद, त्यावरील ग्रंथराशी प्रचंड आणि मतभेद असंख्य; इकडे माझें ज्ञान अल्प, ग्रहणशक्ति बेताबाताची आणि अशा अध्ययनास लागणारें शारीरिक व मानसिक बल आणि स्वस्थता यांची पूर्ण प्रतिकूलता, शिवाय पोटापाण्याच्या उद्योगापुढें फुरसत मिळणार तीही अल्प; अशा स्थितींत आपल्या हातून हें काम निभावें कसें, हा विचार मनांत येऊन मी पुष्कळ वेळां निराश होत असें. तथापि महर्षीची आज्ञा सतत डोळ्यांपुढें टेवून आणि " आकाशमंत न कळोनिहि अंतरिक्षीं, आक्रान्त आक्रमिति शक्त्यनुसार पक्षी " या लहानपणीं शिकलेल्या कवितेंतला बोध मनांत वागवून मीं आपलें अध्ययनाचें काम यथाशक्ति चालू ठेविलें होतें. शारीरिक व्याधि व प्रापंचिक अडचणी यांनीं मग व्यग्र झालें, तरी बुद्धाच्या उपदेशामृतानें मनांत नवी उमेद व कर्तव्याची जाणीव संचारित झाल्यामुळें गेल्या पंधरा वर्षांत माझें बौद्धधर्माचें अध्ययन चालू राहिलें व त्याचेंच हें फळ या लहानशा पुस्तकाच्या रूपानें मराठी वाचकांपुढें मी आज अतिशय आनंदानें ठेवीत आहें. महर्षीच्या प्रेरणेनें तयार झालेलें हें पुस्तक प्रत्यक्ष त्यांच्या चरणीं अर्पण करण्याइतकें भाग्य परमेश्वरानें मला दिलें नाहीं, ही मोठी दु:खाची गोष्ट आहे. तथापि त्यांच्या आज्ञेचें माझ्या हातून उल्लंघन झालें नाहीं येवढें पाहून तरी त्यांचा आत्मा संतुष्ट होईल अशी मी आशा बाळगतों.

'बौद्धधर्माचा इतिहास' ह्या विषयाचा प्रचंडपणाच माझ्यासारख्या अल्पज्ञाची छाती दडपून टाकण्यास पुरेसा आहे. विशेषतः त्याच्या संबंधानें असलेले मतभेद आणि दिवसेंदिवस उपलब्ध होत असलेल्या त्या इतिहासाच्या साधनांची विपुलता या दोन गोष्टींमुळें हें पुस्तक लवकर बाहेर काढूं नये अशी फार इच्छा होती, आणि म्हणून हें पुस्तक लिहिण्यास सुरवात होऊन पांच सहा वर्षें आणि छापण्यास सुरवात होऊन चार वर्षें लोटली तरी पुस्तकाच्या प्रकाशनाचे कामीं घाई करण्यांत आली नाहीं. तथापि स्वास्थ्यविघ्नतेमुळें जीविताचें क्षणिकत्व आणि पुस्तक अपूर्ण राहण्याची भीति दिवसेंदिवस ज्यास्त भासमान होऊं लागल्यामुळें शेवटीं मी आपला दीर्घ परिश्रमपूर्वक केलेला हा प्रयत्न सुज्ञांपुढें मांडण्याचें धैर्य केलें आहे.

मराठी वाचकांची वाचनाभिरुचि वाढत्या प्रमाणावर आहे, ही मोठी खरी आहे. तथापि बौद्धधर्माच्या इतिहासासारख्या विषयावरील ग्रंथाकडे त्यांचें लक्ष आकर्षिलें जाण्यास अद्याप पुष्कळ काळ लोटला पाहिजे. तेव्हां लेखकास व प्रकाशकास या पुस्तकापासून द्रव्यलाभ किंवा कीर्तिलाभ या दोन्हींची अपेक्षा करावयास नको. उलट या पुस्तकांत प्रतिपादिलेलें मत या विषयाचा अभ्यास व विचार केलेल्या अनेक प्राच्य व पाश्चात्य विद्वानांना पसंत न पडण्यासारखें असल्यामुळें टीकाकारांच्या रोषास मात्र मी पात्र होण्याचा संभव आहे. तथापि लेखकानें प्रतिपादलेल्या मताविषयीं त्याचा कोणत्याही प्रकारचा दुराग्रह नसल्यामुळें व विद्वानांनीं या विषयाचें आलोचन करावें अशी त्याची खरी अंतःकरणापासून इच्छा असल्यामुळें कोणत्याही प्रकारचा लाभ नसतां व केवळ 'कर्मण्येवाधिकारस्ते' या गीतावाक्यावर पूर्ण श्रद्धा ठेवून फलावर दृष्टि न देतां त्यानें आपले विचार स्वतंत्रपणें या पुस्तकांत नमूद केले आहेत.

हें पुस्तक इंग्रजींत लिहिलें असतां इंग्लंड, जर्मनी, अमेरिका वगैरे देशांतरच्या विद्वानांचें तिकडे लक्ष जाऊन माझ्या कामाची अधिक सफलता होईल असें पुष्कळ विद्वान व हितचिंतक मित्रांनीं मला सुचविलें होतें. तथापि मराठी भाषेवरलें माझें प्रेम आणि बौद्धधर्माविषयींच्या ग्रंथाची मराठी वाङ्मयांतली उणीव या दोन गोष्टींमुळें माझ्या मित्रांच्या सद्धेतुप्रेरित सूचनांचा अनादर

करून मराठींतच हें पुस्तक काढण्याची मला बुद्धि झाली, त्याला माझा नाइ-लाज आहे. माझे मित्र त्याबद्दल सदयभावानें मला क्षमा करतील अशी मी आशा बाळगतों.

हातीं घेतलेल्या विषयाचें महत्त्व व साधनांची विपुलता यांचा विचार करता हें पुस्तक सध्याच्या चौपट तरी मोठें व्हावें होतें, व सुमारें हजार पृष्ठें भरतील येवढें पुस्तक लिहिण्यापुरती सामग्रीही मीं गोळा केली आहे. तथापि येवढें मोठें मराठी पुस्तक खपण्याची अडचण लक्षांत घेऊन मला या पुस्तकाचा बरा चसा भाग अगदीं संक्षेपानें लिहावा लागला. त्यामुळें पुष्कळ वेळां माझ्या विवेचनासंबंधानें वाचकांचा गैरसमज होण्याचा संभव आहे. बौद्धधर्माचें इतर *धर्मांशीं साम्य व भिन्नता हीं विस्तारानें एका स्वतंत्र प्रकरणांत दाखविण्याचें* मनांत होतें, पण याच कारणामुळें तोही योग साधतां आला नाहीं, याबद्दल वाईट वाटतें. तथापि वर सांगितलेल्या अडचणींच्या स्थितींपुढें माझा नाइलाज झाला हें लक्षांत घेऊन सुज्ञ वाचकांनीं क्षमा करावी अशी मी प्रार्थना करतों."

शेवटीं महर्षि न्या. मू. रानडे यांच्या आज्ञेवरून हातीं घेतलेलें कार्य त्यांच्या आशिर्वादानें व माझ्या भाग्यानें अंशतः तरी तडीस गेलें, यांतच समाधान मानून व या पुस्तकाच्या रचनेच्या कामीं ज्यांच्या ज्यांच्या ग्रंथांचें, विचारांचें व सूचनांचें मला साह्य झालें त्या सर्वांचे आणि त्याचप्रमाणें द्रव्यलाभावर दृष्टि न ठेवतां केवळ मराठी भाषेच्या वाङ्मयाविषयीं आपलें कर्तव्य बजावण्याच्या सद्बुद्धीनें प्रेरित होऊन या पुस्तकाच्या प्रकाशनास प्रवृत्त झालेल्या भट आणि मंडळीचे अनेकवार आभार मानून हा प्रस्तावनालेख संपवितों.

आनंदमंदिर, इंदूर
आषाढ शुद्ध ११ शके १८३१ } वासुदेव गोविंद आपटे.



# बौद्धपर्व.



## प्रकरण पहिलें.



## सामान्य माहिती.



[ विषय —बौद्धधर्माच्या इतिहासाची योग्यता व त्याचें महत्व-बौद्ध धर्माविषयीं पाश्चात्य ग्रंथकारांचें मत-त्या इतिहासाचीं साधनें बौद्ध वाङ्मय-संस्कृत ग्रंथ-तिबेटी ग्रंथ-चिनी ग्रंथ ब्रह्मी ग्रंथ-सीलोनी ग्रंथ-जपानी ग्रंथ-पाली ग्रंथ-महायान व हीनयान पंथ-त्यांचे ग्रंथ ]

बौद्धधर्माचा इतिहास म्हणजे एकतृतीयांश मानवजातीचा गेल्या अडीच हजार वर्षांतल्या सुधारणेचा इतिहास आहे. हा इतिहास एकाच देशासंबंधाचा व नुसत्या धर्मविचारापुरताच असता, तरी देखील तें काम अत्यंत महत्त्वाचें गणलें गेलें असतें. पण बौद्धधर्माचा इतिहास हा केवळ भरतखंड, तिबेट, नेपाळ, चीन, जपान, सयाम, ब्रह्मदेश व सीलोन या देशांचाच नसून, बौद्धधर्मप्रचारकांनीं ज्या ज्या देशांतून त्या धर्माचा प्रसार केला त्या त्या अवांतर देशांच्या म्हणजे अफगाणिस्तान, अमेरिका, जाव्हा वगैरे देशांच्या इतिहासांशींही त्याचा संबंध येतो. ही एक गोष्ट झाली. दुसरी गोष्ट, बौद्धधर्माचा इतिहास म्हणजे या निर्दिष्ट केलेल्या देशांतल्या नुसत्या धर्मविचारांचा इतिहास नाहीं, तर धर्मविचारांबरोबर लोकांची बुद्धि, नीति व शास्त्रें यांचाही विकास बौद्ध धर्मानें करून सोडल्यामुळें मानवजातीच्या सुधारणेच्या बहुतेक साऱ्या ठळक ठळक अंगांचा तो इतिहास आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. कित्येक पाश्चात्य पंडितांच्या मतें तर धर्म आणि नीति यांची सुरेख सांगड घालून देणारा,

धर्मतत्वाना व्यावहारिक रूप देणारा, उदारमतवादी व अर्वाचीन शास्त्रीय तत्वाच्या कसोटीस पूर्णपणें उतरणारा असा हा पहिलाच धर्म आहे आणि म्हणून बौद्धधर्माची योग्यता विशेष आहे या संबधात प्रसिद्ध ग्रथकार मि पॉल कॅरस यांचे मत विचारणीय आहे ते म्हणतात —

Buddhism was the first prophet to proclaim the importance of morality in religion at the same time it was the first positivist the first radical free thinker the first iconoclast and the first prophet of the religion of science

—*Buddhism and its Christian critics*

[ अर्थ—धर्मसबधात नीतीचें महत्त्व जाहिर करण्याचें कार्य प्रथम बौद्ध धर्मानें केलें, त्याचप्रमाणें प्रत्यक्षवादी लोकात, ईश्वरप्रणीत ग्रथासबधीं अश्रद्धा बाळगणारात, मूर्तिभजकात आणि शास्त्रनियामकतत्वाचें निरूपण करणारात, तो अग्रगण्य होता ]

अशा प्रचड आणि अत्यत महत्वाच्या इतिहासाचीं नुसता साधनें गोळा करण्यालाच अनेक महान् महान् पडितांना कित्येक वर्षे अविश्रांत परिश्रम करावे लागले आहेत हीं साधनेंही एका प्रकारचीं नाहींत बौद्ध धर्माचा इतिहास काहीं संस्कृत ग्रथावरून, काहीं पाली ग्रथावरून, काहीं शिलालेख नाणीं, ताम्रपट इत्यादिकावरून आणि काहीं लोकात पिढ्यानपिढ्या चालत आलेल्या आचारविचारावरून मिळवावा लागला या सर्व साधनांचा उल्लेख येथें विस्तरश करणें अशक्य आहे तथापि ठळक ठळक ग्रथाची यादी व त्याच्या संबधाची थोड थोडी माहिती येथें देणें अवश्य आहे म्हणून ती दतो

✓ **१ संस्कृत भाषेतले ग्रथ**–बुद्धचरितविषयक संस्कृत ग्रथात 'ललितविस्तर' हा ग्रथ मुख्य आहे या ग्रथात गौतम हा बुद्धत्व पावून लोकांना धर्मोपदेश करू लागला येथपर्यंतची हकीकत असून गद्यरूपानें व असून पद्यरूपानें दिली आहे हा ग्रथ राजा कनिष्क याच्यावेळी रचिला गेला असावा असें कित्येक पाश्चात्य पडिताचें मत आहे ललितविस्तर ग्रथांत बुद्धचरित्र अलकारिक रीतीनें वर्णिलेलें असल्यामुळें इतिहासदृष्ट्या त्याची

किंमत किती ठरवावयाचा हा मोठा प्रश्न आहे या ग्रंथाचा आवृत्ति परलोक वासी डा० राजेंद्रलाल मित्र याना कलकत्त्याच्या एशियाटिक सोसायटीच्या द्वारें प्रकाशित केला होता या शिवाय संस्कृत भाषेतले अन्य ग्रंथ म्हणजे अश्वघोषकृत बुद्ध चरित लंकावतार सूत्र, व अवदानकल्पलता हे होत अश्वघोषाच्या बुद्धचरित्राची एक उत्कृष्ट आवृत्ति प्रो० कॉवेल यानीं तयार करून ती केंब्रिज युनिव्हर्सिटीमार्फत प्रकाशित केली लंकावतार-सूत्र ग्रंथाचा आवृत्ति कलकत्त्याचे महामहोपाध्याय डा० सतीशचंद्र विद्याभूषण एम ए व राय शरच्चंद्र दास बहादुर सी आय इ या दोघा पंडितानीं बुद्धिस्ट टेक्स्ट सोसायटी मार्फत छापविलेली उपलब्ध आहे 'अवदानकल्पलता' या ग्रंथाचा काही भाग राय शरच्चंद्र दास बहादुर व पंडित हरिमोहन विद्याभूषण यानीं शोधून तो बंगाल एशियाटिक सोसायटी मार्फत प्रकाशित केला आहे

**२ तिबेटी भाषेतील ग्रंथ-** यात रत्नधमराज नावाच्या एका बौद्ध धर्मी भिक्षूनें लिहिलेला एक व दुसरे गृहस्थांना लिहिलेले काही ग्रंथ आहेत हे बहुतेक ललितविस्तराच्या आधारानें लिहिलेले आहेत त्याचीं रूपांतर इंग्रजींत झाला आहेत कर्यांग्‌र नावाचा जो तिबेटी ग्रंथ संग्रह आहे त्यांत 'ग-छरोल्प' नांवाचा एक बौद्ध ग्रंथ आहे पण तो अद्याप अप्रकाशित आहे

**३ चिनी भाषेतील ग्रंथ—**संस्कृतातल्या महाभिनिष्क्रमणसूत्र' नामक ग्रंथाचें चिनी भाषेतलें भाषांतर इ० स० च्या ६ व्या शतकांत तयार झालें, असें प्रो० हिस डेव्हिड्स म्हणतात मूळ संस्कृत ग्रंथाच्या रचनेचा काळ अनिश्चित आहे पण तो अर्थातच सहाव्या शतकाच्या पूर्वीचा असला पाहिजे याशिवाय ललितविस्तर ग्रंथाची चिनी भाषेत चार भाषांतरें झालीं आहेत शवन्चें भाषांतर 'हान' वंशातल्या राजाच्या कारकीर्दींत म्हणजे इ० सनाच्या तिसऱ्या शतकांत झालें अश्वघोषाच्या बुद्धचरित्राचें चिनी भाषांतर धर्मरक्ष नांवाच्या बौद्ध पंडितानें इ० सनाच्या ५ व्या शतकांत केलें प्रसिद्ध प्रवासी हुएन त्सांग लिहितो कीं, "चार सूर्यांनीं सगळें जग प्रकाशित करून सोडलें आहे" या चार सूर्यांपैकीं अश्वघोष हा एक आहे लंकावतार सूत्राचें चिनी भाषांतर इ० सनाच्या ५ व्या शतकांत सुंग वंशीय राजाचे कार

कीर्दीत गुणभद्र नांवाच्या एका पंडितानें केलें या ग्रंथाला 'लंकावतार' हें नांव देण्याचें कारण हुएन-त्सांग असें देतो कीं, या ग्रंथांत वर्णिलेला उपदेश गोतम बुद्धानें सिलोन ( लंका ) मधाल एका पर्वतशिखरावरून केला खिस्ताच्या गिरीवरील उपदेशाशीं ( Sermon on the mount याच्याशी ) याचें साम्य आहे याशिवाय महापरिनिर्वाणसुत्त, जातक निदान, महावंस वगैरे ग्रंथांचीही चिनी भाषेंत भाषांतरें झालीं आहेत

४ ब्रह्मदेशातील ग्रंथ—यांत 'मल्लगवत्तु' नांवाचा एक ग्रंथ विशेष प्रसिद्ध आहे हें मूळ एका पालिग्रंथाचें भाषांतर आहे यांत वर्णिलेलें बुद्धाचें चरित्र जातक-ग्रंथांत दिलेल्या चरित्राशीं तंतोतंत जुळतें याशिवाय अन्य संस्कृत व पालि ग्रंथांचीं भाषांतरें झालीं आहेत

५ सिलोन देशांतले ग्रंथ—यांतील दीपवंस व महावंस या ग्रंथांत सिंहलद्वीपाचा प्राचीन इतिहास आहे महावंस महानाम नांवाच्या सिंहली पंडितानें रचिला असून त्याचे १०० अध्याय आहेत त्यांपैकीं ३७ व्या अध्यायांत बुद्धघोषाचें चरित्र वर्णिलें आहे महानाम पंडित बुद्धघोषाचे समकालीन असल्यामुळे तें चरित्र बरेंच विश्वसनीय असावेंसें दिसतें बौद्धधर्मप्रचारकांत बुद्धघोष अग्रगण्य असल्यामुळें या चरित्रांतील विशेष रमणीय भाग संक्षपतः येथें देतों तो असा – मगध देशांत गयेजवळ एका गांवीं एक ब्राह्मणपुत्र राहत असे त्यानें वेद व शास्त्रें यांचें चांगलें अध्ययन केलें होतें त्याचा रेवत नामक भिक्षूशीं एकदां कडाक्याचा वाद होऊन त्यांत पराभव पावल्यामुळें ब्राह्मणपुत्रानें बौद्धधर्माचा स्वीकार केला त्याचा स्वर बुद्धासारखा गंभीर, उणखणीत आणि स्निग्ध असल्यामुळें त्याला बौद्धभिक्षु बुद्धघोष म्हणू लागले बौद्धधर्माची दीक्षा घेतल्यावर त्या धर्मासंबंधानें ग्रंथरचना करण्यास त्यानें प्रारंभ केला, आणि ज्ञानोदय ग्रंथ लिहिला पुढें रेवत भिक्षूच्या आग्रहावरून तो सीलोन देशीं गेला आणि तेथें स्थविर संघपालापाशीं त्रिपिटक ग्रंथाचें अध्ययन केल्यावर तो ग्रंथ त्यानें तेलगी लिपींत लिहून काढला हा ग्रंथ ब्रह्मदेशांत गेला तेव्हां तेथील लोकांनीं त्याची फार वाहवा केली आणि अजून त्या देशांत या ग्रंथाची जशी मानमान्यता आहे तशी दुसऱ्या कोणत्याही ग्रंथाची नाहीं बुद्धघोषानें विशुद्धिमग्ग ( विशुद्धिमार्ग ) ग्रंथ लिहिला,

त्या संबधानें महावंश ग्रथांत एक गमतीची कथा आहे ती अशी–बुद्धघोष मगधदेशातून सीलोनला गल्यावर तेथील पडितांना त्यानें विनती केली की सिंहली भाषतल्या अथ्थकथाचें ( अर्थकथा ) पालिभाषेंत भाषांतर करावें हा हेतु आहे तेव्हा त्या ग्रथाची एक प्रत कृपा करून यावी भाषातर करण्याला लागणारी विद्वत्ता त्याचे अगीं किंतपत आहे हें पाहण्यासाठा पडितानीं त्याला त्या ग्रथातल फक्त दोन श्लोक प्रथम दिले आणि त्यावर पाली भाषत व्याख्या लिहावयास सांगितलें या दोन श्लोकावर बुद्धघोषानें जी विस्तृत व्याख्या केली तिचेंच नाव विसुद्धिमग्ग ती व्याख्या पाहून सिंहली पडित आश्चर्यचकित झाले आणि त्याना समग्र अथकथा त्याच्या स्वाधीन कल्यावर बुद्धघोषानें त्या पाली भाषेंत लिहून काढल्या बुद्धघोषाच्या या अथ्थकथा म्हणजे साहित्य दर्शन विज्ञान, इतिहास, इ०चें अपूर्व भाडार समजतात हा बुद्धघोष इ स च्या ५ व्या शतकात होऊन गला

**६ जपानी ग्रथ**– प्रसिद्ध पडित मॅक्समूलर यानीं १८८८ सप्टेंबर साहे बाच्या हुकुमान जपानातल्या होंग्वानजी नामक बौद्धविहारांतून तथल ग्रथांची यादी तेथील धर्माध्यक्ष बुनियुनानजो यांच्या मार्फत आणवून प्रसिद्ध केली तीत अनेक बौद्ध ग्रथांचीं नांवें व त्यांच कर्ते यांची माहिती दिली आहे

**७ पालिभाषेंतले ग्रथ**—पालिभाषतल बौद्ध ग्रथ फार प्राचीन आहेत अशी समजूत आहे या ग्रथांत त्रिपिटक हा ग्रथ फार मोठा व अत्यत महत्त्वाचा आहे हा महाभारत ग्रथाच्या तिप्पटीन मोठा असून त्याची ग्रथसंख्या सरा सरी तीन लक्ष आहे हा केव्हां लिहिला गला तें सांगता यत नाहीं लोकप्रवाद असा आहे की हा मूळ पाटलिपुत्र येथ निर्माण झाला व पुढें अशोक राजाचा पुत्र महेंद्र हा जे हा धर्मप्रचाराथ सीलोनमध्यें गला तव्हां त्यानें तो आपल्या बरोबर सिलोनला नेला त्रिपिटकांत राजगृह व वैशाली यथील सभांचा उल्लख आहे पण पाटलिपुत्र यथ झालेल्या सभचा उल्लख नाहीं यावरून या दोन कोणाच्या

---

१ या लोकप्रवादाला बुद्धघोषाचार्याच्या त्या ग्रथावरील टीकेंत आधार आहे तो असा बुद्धघोष त्रिपिटकापैकी दीघनिकायावरील अट्ठकथाच्या पालिभाषतल्या रूपांतराच्या आरंभीं प्रस्तावनेंत लिहितात –

मध्यंतरी त्याची रचना झाली असली पाहिजे. त्रिपिटकाचा काहीं भाग निःसंशय प्राचीन आहे, तसा काहीं भाग निःसंशय अर्वाचीन कालांतला असावा, असें कित्येक पंडित म्हणतात. या ग्रंथाचीं भाषांतरें सिंहली, ब्रह्मी, चिनी, जपानी, वगैरे अनेक भाषांतून झालीं आहेत. या ग्रंथाला त्रिपिटक हें नांव पडण्याचें कारण त्याचे तीन पिटक (पुडें) म्हणजे भाग आहेत. ते येणें प्रमाणें —

## १ सुत्तपिटक

यांत बुद्धाच्या उपदेशाचा संग्रह आहे. याचे चार मोठाले 'निकाय' म्हणजे पोटभाग आहेत. ते येणें प्रमाणें —

१ दीघनिकाय (दीर्घनिकाय), २ मज्झिमनिकाय (मध्यमनिकाय), ३ संयुत्तनिकाय (संयुक्तनिकाय) ४ अंगुत्तरनिकाय, आणि ५ खुद्दकनिकाय (क्षुद्रनिकाय). यांत बुद्धाचे आपल्या शिष्यांशीं वेळोवेळीं झालेले संवाद आणि तत्त्वज्ञान व धर्म या संबंधानें शिष्यवर्गानें विचारलेल्या शंका व त्यांचीं उत्तरें यांचा संग्रह केलेला आहे. साक्रेटिसाचे संवाद पाश्चात्य तत्वज्ञानाचा बोध होण्याला अवश्य म्हणून त्याचें जसें महत्व मानण्यांत येतें, तशीच या संवादाची गोष्ट आहे. हे सगळे (१८३) संवाद असे गहन आहेत कीं, त्यांतलें एकेक सूत्र एखाद्या व्याख्यानाचा विषय करतां येईल. दीघनिकायांत दीर्घ म्हणजे मोठमोठाले संवाद आहेत. मज्झिम (मध्यम) निकायांत मध्यम लांबीचे संवाद संग्रहित केले आहेत. संयुत्तनिकायांत एकाच विषयावर निरनिराळ्या शिष्यांशीं झालेले संवाद एकत्र केलेले आहेत. अंगुत्तरनिकायांत बौद्ध धर्मांतली

---

'सीहलदीप पन आभथाय वासिना महामहिन्देन ।
ठपिता सीहल भासाय दीप वासिन मत्थाय ॥
अपनेत्वा ततोहं सीहलभासं मनोरम भासं ।
तन्तिनयानुच्छविकं आरोपेन्तो विगतदोसम् ॥'

अर्थ — ही अट्ठकथा महामहिन्द्रानें सिंहलद्वीपास आणिली, आणि या द्वीपवासीयांच्या हितासाठीं सिंहली भाषेंत लिहून ठेविली. ती सिंहली भाषेंतून काढून मनोरम आणि शास्त्रास अनुरूप अशा निर्दोष पालिभाषेंत मीं लिहून ठेवली.

मानसशास्त्र व नीतिशास्त्र या संबंधाची सूत्रें असलेले संवाद निराळे काढले आहेत अंगुत्तरनिकाय सर्वांत मोठें आहे खुद्दकनिकायांत लहान लहान संवाद आहेत या खुद्दनिकायाचे पुन १५ पोटविभाग आहेत ते हे — १ खुद्दक पाठ, २ धम्मपद, ३ उदान, ४ इतिवुत्तक, ५ सुत्तनिपात, ६ विमानवत्थु, ७ पेतवत्थु, ८ थेरगाथा, ९ थेरीगाथा, १० जातक, ११ निद्देस, १२ पटिसंभिदामग्ग, १३ अवदान, १४ बुद्धवंस, आणि १५ चरियापिटक

**खुद्दक ( क्षुद्र ) पाठ** — हें लहानसें पुस्तक नवशिष्यांकरता आहे यांत मनुष्यदेहाची रचना व तत्संबंधी इतर ढोबळ ढोबळ गोष्टांची थोडीशी माहिती आहे

**धम्मपद** — याच्या नांवावरूनच आतल्या विषयाचा थोडासा बोध होतो यांत धर्म व नीति हे विषय आहेत यांतील कित्येक श्लोक महाभारत, भगवद्गीता व दुसरे नीतिपर ग्रंथ यांच्याशी समतोल आहेत यांत ज्ञान व कर्म यांची उत्कृष्ट प्रकारें सांगड घातलेली दिसून येते कर्ममार्गी व कर्मत्यागी

---

१ या ग्रंथाच्या उत्कृष्टत्वाची थोडी कल्पना करता यावी म्हणून त्यांतले थोडसे श्लोक येथे भाषांतरासह देतों —

**( अ ) अप्पमत्तो पमत्तेसु सुत्तेसु बहुजागरो । अबलस्सं व साधस्सो हित्वा याति सुमेधसो ॥** (अप्पमादवग्गो ९)

**अर्थ.**-ज्या प्रमाणें वेगवान् अश्व दुबळ अश्वाला मागें टाकून पुढें जातो, त्याप्रमाणें बुद्धिमान् मनुष्य प्रमत्त माणसांत स्वतः अप्रमत्त राहून अथवा निद्रिस्त माणसांत असूनही जागृत राहून धर्ममार्गांत सर्वांच्या पुढें जातो ( या श्लोकाचें गीतेंतील 'या निशा सर्व भूतानां तस्यां जागर्ति संयमी ।' या श्लोकाशीं बरेंच साम्य आहे )

**( आ ) न हि वेरेण वेराणि सम्मन्तीध कुदाचनं । अवेरेणच सम्मन्ति एस धम्मो सनन्तनो ॥** ( यमकवग्गो ५ )

**अर्थ.**-या जगांत शत्रुत्व शत्रुत्वानें शमत नाहीं, पण शत्रुत्वाच्या अभावानें त्याचा नाश होतो यालाच सनातन धर्म म्हणतात

**( इ ) दूरे सन्तो पकासेन्ति हिमवन्तोव पब्बतो । असन्तेत्थ**
२
**न दिस्सन्ति रत्तिंखित्ता यथा सरा ॥**(पकिण्णकवग्गो १५)

दोन्ही प्रकारच्या लोकाना यात बहुमोल उपदेश सापडेल थोडक्यात सांगावयाचें ह्मणजे गीतेप्रमाणें वेद व उपनिषदें याचा सारसंग्रह यात आहे. ब्राह्मण धर्मांच्या अवनतीच्या काळा बुद्धानें ब्राह्मणाना केलेला अमूल्य उपदेश व दिलेले उज्वल दृष्टांत जसे या पुस्तकात आहेत, तसे पृथ्वीच्या पाठीवर अन्य कोणत्याही ग्रंथात सापडणें कठीण आहे असें एका मोठ्या विद्वानाचें मत आहे बौद्धधर्माचें सार थोडक्यात आणण्यासाठीं हा ग्रंथ निर्माण झाला या ग्रंथाचे २६ अध्याय आहेत त्याना वग्ग ( वर्ग ) अशी संज्ञा आहे या २६ अध्यायात मिळून ४२३ श्लोक आहेत नालंद, विक्रमशिला वगैरे ज्या मोठमोठाल्या पाठ

---

अर्थः–ज्याप्रमाणें हिमालयपर्वत दुरून सुद्धा दिसतो, तसे साधु पुरुष दुरून सुद्धा ओळखता येतात. पण दुष्ट लोक रात्रीं रस्त्यात जवळ पडलेल्या बाणाप्रमाणें जवळ असतांही दिसत नाहींत

( ई ) धम्मंचरे सुचरितं न तं दुच्चरितं चरे । धम्मचारी
सुखं सेति अस्मिंलोके परं हिच ॥ ( अत्तवग्गो ३ )

अर्थः–सत्कर्माचें आचरण कर, पापाचरण करू नकोस धर्माचरण करणाराला इह व पर अशा दोन्ही लोकीं सुख होतें

( उ ) न तावता धम्मधरो यावता बहुभासति । योच अप्पम्पि
सुत्वान धम्मं कायेन पस्सति । सवे धम्मधरो होती
योधम्मं नप्पमज्जति ॥ ( धम्मट्ठवग्गो ४ )

अर्थ.–धर्मासबधानें बडबड करणारा खरा धार्मिक असतो असें नाही जो थोडें ऐकून शरीरानें धर्माचरण करतो तो खरा धार्मिक जो धर्माचरणात चुकत नाहीं तोच धार्मिक होय

( ऊ ) सब्बे तसन्ति दण्डस्स सब्बेसं जीवितं पियं । अत्तानं
उपमं कत्वा न हनेय्य न घातये ॥

या श्लोकाचा 'आत्मवत् सर्वभूतानि य पश्यति स पडित' या वाक्याशीं किंवा 'प्राणा यथात्मनोऽभीष्टा भूतानामपि ते तथा । आत्मौपम्येन भूतेषु दयां कुर्वन्ति साधवः ॥' या हितोपदेशातल्या श्लोकाशीं किती तरी साम्य आहे!

झाला प्राचीनकाळीं होता, त्यातून शिकणारे विद्यार्थी, आणि गिरिकंदरांतून, आणि विहारातून राहणारे बौद्ध भिक्षु व भिक्षुणी, संसारी स्त्रीपुरुष व संसार-त्यागी विरक्तलोक एकसारखे या ग्रंथाचें भक्तिपूर्वक पठन करीत असत.

**उदान**—एखाद्या भाषणानें किंवा गोष्टीनें बुद्धाच्या मनोवृत्ति उचंबळल्या असता त्या भरात त्याच्या तोंडून जीं अत्यंत उदात्त व रसभरित वचनें बाहेर पडत, तीं त्याचे शिष्य पाठ करून ठेवीत. अशा ८२ वचनांचा हा संग्रह आहे. यात बौद्धांचें आदर्श-जीवन कसें असावें तें मुख्यत दाखविलें आहे.

**इतिवुत्तक**—यांतही भगवान् बुद्धाचीं १२० वचनें आहेत याला 'इतिवुत्तकम्' हें नांव पडण्याचें कारण त्यांतल्या प्रत्येक वचनाच्या आरंभीं 'इतिवुत्तं भगवता' म्हणजे भगवंतांनीं असें म्हटलें, असें प्रास्ताविक वाक्य असतें या वचनांचा संग्रह इ० स० पूर्वी ४०० वर्षें झाला असावा असें प्रो० -ऱ्हीस डेव्हिड्स् म्हणतात.

**सुत्तनिपात**—यात ७० छंदोबद्ध सूत्रें आहेत याचे पांच मोठाले भाग असून प्रत्येकात ५४ लहान काव्यें आहेत

**विमानवत्थु**—यांत गरुडपुराणातल्या कथांप्रमाणें स्वर्ग व नरक यांच्यासंबंधाच्या कथा आहेत.

**पेतवत्थु**—सदरप्रमाणेंच प्रेतासंबंधाच्या कथा यांत आहेत.

**थेर व थेरीगाथा**—थेर म्हणजे स्थविर अथवा वृद्ध (वडील) पुरुष, आणि थेरी म्हणजे वडील स्त्रिया बुद्धाचे उपदेश पद्यबंधात घालून तयार केलेला कवनें या दोन्ही ग्रंथांत आहेत. पहिल्यांत १०७ थेरांचीं व दुसऱ्यांत ७३ ठळक थेरींचीं कवनें असून त्या कवनाच्या कर्त्यांचीही माहिती दिलेली आहे. या कवनावरून बुद्धकालीन स्त्रीपुरुषांची दिनचर्या चांगली कळते बुद्धाच्या काळीं स्त्रियाना स्वातंत्र्य व शिक्षकिणीची उच्च पदवी फार दिवसांनीं प्राप्त झाली होती. त्या स्वातंत्र्याचा व उच्च पदवीचा त्यांनीं कसा सदुपयोग केला, तें थेरी-गाथेवरून स्पष्ट दिसतें. उदाहरणा दाखल यातली एकच गोष्ट येथें देतों राज

१ थेरीगाथेविषयीं लिहिताना प्रो ऱ्हिस डेव्हिड्स् हे सुप्रसिद्ध पाश्चिमात्य धार्मिक पंडित म्हणतात —"It affords a very instructive picture of

[ अर्थ—मुहूर्तमात्र टिकणारी जी तुझी तृष्णा ती तुला दूध पाजून मी शमविली, पण तू धर्मदुग्ध पाजून माझी अक्षय्य तृष्णा शमविलीस ]

न तित्ति पुब्ब तव दस्सनेन । चक्खु न सोत तव भासितेन ॥
चित्त मम केवलमेकमेव । पप्पुय्य त धम्मरसेन तित्तिम् ॥

अर्थ—पूर्वी ( तू लहान हातास तेव्हा ) तुला पाहण्याने, व तुझे बोल ऐकल्याने माझ्या डोळ्याचें आणि कानाचें पारणें फिटलें नाहा पण तू पाज लेल्या धर्मरसाने मात्र त्याची तृप्ति झाली

जातककथा—याविषयीं एक स्वतत्र प्रकरण लिहिलें आहे तें पहावें

निद्देस ( निर्देश )—ही सुत्तनिपाताच्या उत्तरार्धावरली नुसती टीका आहे मूळ ग्रथाचा पत्ता नसतां नुसत्या टीकेला बौद्धशास्त्रांच्या यादीत घातलेलें असें हें एकच उदाहरण आहे ही टीका सारीपुत्त नावाच्या बुद्धाच्या प्रमुख शिष्यानें लिहिली असें म्हणतात

पटिसभिदामग्ग ( प्रतिसबोधमार्ग )—बौद्ध अर्हताच्या दिव्य दृष्टी विषयीं यात सांगितलें आहे

अपदान—यात अर्हतांचा चरित्रे दिलीं आहेत

बुद्धवस—यांत गौतमबुद्ध व त्याच्या पूर्वी होऊन गेलेल्यांपैका २४ बुद्ध यांची चरित्रें आहेत

चरियापिटक—यात गौतमबुद्धाच्या ३४ पूर्व जन्माची हकीकत आहे हा ग्रथ अपूर्ण आहे

## २ विनयपिटक.

यांत भिक्षूंनी पाळण्याच्या नियमांचा सग्रह आहे याच पांच भाग आहेत ते असे —१ पाराजिका, २ पाचितियादि, ३ महावग्ग, ४ चुल्लवग्ग आणि ५ परिवारपाठ

१ पाराजिका—यांत प्रायश्चित्ताचे नियम आहेत

२ पाचितियादि—वरीलप्रमाणे

३ महावग्ग—( महावर्ग ) व ४ चुल्लवग्ग ( क्षुद्रवर्ग ) या दोहीं मिळून ' खन्धक ' हा भाग झालेला आहे

५ परियारपाठ - परिशिष्ट.

या वर सांगितलेल्या ग्रथांपैकीं पहिला व दुसरा मिळून झालेल्या भागाला ' सुत्तविभग ' असें नांव आहे सघांत राहणाऱ्या भिक्षूच्या हातून घडणारे दोष व त्यांच्या परिमार्जनार्थ करण्याचीं प्रायश्चित्तें यात सांगितलीं आहेत या ग्रथांवर अनेक भाष्यें व त्यांच्यावर पुन टीका झाल्यामुळें या ग्रथाचा आकार फार वाढला आहे प्रायश्चित्तासबधाचा जो स्वतत्र ग्रथ आहे, त्याचें नांव **प्रातिमोक्ष** हा ग्रथ फार प्राचीन आहे तथापि आश्चर्याची गोष्ट ही कीं बौद्धलोक त्याच्यापेक्षां सुत्तविभग या ग्रथालाच श्रेष्ठ मानतात

## ३ अभिधम्मपिटक.

यात बौद्धतत्त्वज्ञानाचें विवेचन आहे यात सात प्रकरणें आहेत तीं अशीं —

१ धम्मसगणि, २ विभग, ३ धातुकथा ४ पुग्गलपञ्ञत्ति, ५ कथावत्थु, ६ यमक व ७ पट्ठान

**धम्मसंगणि** ( धर्मसग ) यात मनाचे धर्म सांगितले आहेत

**विभग**—यात विविध विषय आहेत

**धातुकथा** - यात शीलाचे परस्पर सबध सांगितले आहेत

**पुग्गलपञ्ञत्ति**—( पुरुषपद्धति ) यात पुरुषाच्या गुणाचें विवेचन आहे

**कथावत्थु**— यांत अनेक वादग्रस्त मुद्दयावर विवेचन केल्लें आहे

**यमक**—यांत परस्पर विरोधी दिसणाऱ्या गोष्टींचें विवेचन आहे

**पट्ठान**—यात कार्यकारणाचा निर्णय आहे

सुप्रसिद्ध पालीभाषाभिज्ञ पाश्चात्यपडित प्रो॰ ऱ्हिस डेव्हिड्स हे या पाली त्रिपिटकग्रथाविषयीं लिहितात —

" In the history of Indian literature there is nothing older than these works excepting only the Vedic writings and all the later classical Sanskrit literature has been profoundly influenced by the intellectual struggle of which they afford the only direct evidence It is not therefore too much to say that the publication of this unique literature

दिलेल्या बुद्धाच्या जन्मकालाशीं जुळतो ( ' द्वे ऋषींनदसङ्ख्याया गताया तद्दिने शुभे । खर-वर्षे दशम्या च शुक्रे मासे तथाऽश्विने॥ योगवित् परमो जातो महात्यातो हि बुद्धराट् ॥) कित्येक बौद्ध ग्रंथकार बुद्धाचा जन्म वैशाख शु १५ ला झाला असें समजतात, आणि कित्येक म्हणतात कीं प्रत्यक्ष जन्म जरी अश्विन महिन्यात झाला असला, तरी त्याचा गर्भसंचार वैशाख शुद्ध १५ ला झाला परतु गौतमाला बोधीवृक्षाखाला दिव्यज्ञान झाल्याचा ( अर्थात् बुद्धत्व प्राप्त झाल्याचा ) काळही वैशाख शुद्ध १५ हाच असल्यामुळें व बौद्ध ग्रंथकार बुद्धत्वप्राप्तीला त्याच्या जन्मकालापेक्षा फार अधिक महत्व देत असल्यामुळें, गौतमाच्या बुद्धत्व-प्राप्तीचा जो दिवस ताच त्याचा खरा जन्मदिवस अशी त्याची समजूत झालेली दिसत साराश, बुद्धाच्या जन्मकालापासून या प्रश्नाचा समाधानकारक निकाल जरी लागला नाहीं तरी बुद्धावताराशीं गौतमबुद्धाचें जन्मकालापुरतें साम्य दिसतें

आता बुद्धाची जन्मभूमी व वश याचा विचार करू श्रीमद्भागवतांत ' बुद्धो नामाऽजनसुत कीकटेषु भविष्यति ' असें म्हटलें आहे ( प्रथमस्कध, अध्याय ४, श्लोक २४ ) म्हणजे पुराणकारांच्या मतें बुद्धावतार कीकटदेशांत अजनाच्या पोटीं झाला भागवतावरील टीकाकार श्रीधरस्वामी ' कीकटेषु ' म्हणजे ' मध्ये गया प्रदेशे ' असें स्पष्ट सागतात बौद्धग्रंथकाराच्या मतें बुद्धाचा जन्म नेपाळ प्रदेशांत कपिलवस्तु येथें झाला, तथापि त्याला बुद्धत्व प्राप्त झालें तें गयेजवळ म्हणजे शाक्य गौतम या दृष्टीनें त्याचा स्वाभाविक जन्म कपिलवस्तु येथें, आणि बुद्ध या दृष्टीनें लौकिकी जन्म गया येथें झाला त्याचप्रमाणें अवतारबुद्धाचा जन्म अजनाच्या पोटीं झाला असें पुराणग्रंथांत म्हटलें आहे, तेही बौद्ध ग्रंथाशीं बहुतेक जुळतें आहे 'बहुतेक' म्हणण्याचें कारण, बौद्धग्रंथकारांच्या मतें गौतमाची आई मायादेवी ही अजनाची मुलगी म्हणून तिला अजना म्हणत असत तेव्हां अजन हें गौतमाच्या आजाचें नांव होतें, आणि आजाचें नांव नातवाला ठेवण्याची चाल हल्लींप्रमाणें

१ 'महावंश' नामक सुप्रसिद्ध बौद्धमताचा ग्रंथ पहा

असा बुद्धावताराचा उल्लेख आहे.

मराठींत वामन पंडितासारख्या विद्वान कवींनेंही—

'कृष्णावतार सरल्यावरि बौद्ध होतो ।
संप्राप्तकाळ कलिच्या खर वत्सरीं तो ॥
आश्विन शुक्ल दशमी रविवार देखा ।
तें शुक्लयोग असतां घटि पड् विशाखा ॥ १ ॥

या श्लोकात बुद्ध हा विष्णूचाच अवतार असें सांगून तो केव्हा झाला त्याविषयींचा काळही दिला आहे

परंतु रामायणात—

'यथा हि चोरः स तथा हि बुद्धस्तथागतं नास्तिकमत्र विद्धि ।'

(अयोध्याकांड)

या श्लोकात बुद्धाला 'चोर' 'नास्तिक' वगैरे म्हटलेलें पाहून दशावतारात गणलेला बुद्ध तो बौद्ध धर्माचा प्रवर्तक सुप्रसिद्ध शाक्य गौतम हाच किंवा दुसरा कोणी बुद्ध आहे अशी शंका अलीकडे कित्येक विद्वान् घेऊं लागले आहेत. म्हणून या विषयाचें अधिक विवेचन करणें जरूर दिसतें

कित्येक लोक रामायणातला हा श्लोक प्रक्षिप्त मानून आलेली अडचण टाळण्यास पाहतात रामायणातला हा श्लोक प्रक्षिप्त आहे असें माझेंही मत आहे. पण हा श्लोक प्रक्षिप्त मानण्यानें अडचण टळते असें मला वाटत नाहीं कारण, रामायणाखेरीज अन्य ग्रंथांतूनही बुद्धाला नास्तिक वगैरे विशेषणें दिलीं असून पुन त्याची दशावतारांत गणना केलेली आढळते! तेव्हां या प्रश्नाचें उत्तर या श्लोकाच्या प्रक्षिप्तत्वाखेरीज अन्यत्र शोधलें पाहिजे बुद्धाचा जन्मकाळ व दशावतारांतील बुद्धाचा जन्मकाळ, बुद्धाची जन्मभूमी व वंश आणि बुद्धावताराची जन्मभूमी व वंश, बुद्धाचीं मतें व दशावतारांतील बुद्धाचें अवतार-कृत्य यांच्यांत खरोखर कांहीं साम्य आहे कीं काय हें पाहिल्यानंतर या प्रश्नाचा आपोआप निकाल लागेल असें मला वाटतें

बुद्धाचा जन्मकाळ वर वामन पंडितांच्या श्लोकांत दिलेला आहे तो आपल्या हिंदुपुराणांच्या आधारानें दिलेला आहे. हा जन्मकाळ जैनग्रंथात

'यथा हि चोर स तथा हि बुद्ध ' असे बुद्धासबधानें अपशब्द निघाले त्यावर जाबालीनें हा उपदेश केवळ तुझें मन पाहण्यासाठीं केला अशा रीतीनें वसिष्ठ ऋषीनें त्यावर विरजण घालून रामाचें समाधान केलें, अशी कथा आहे या कथे वरून रामायणकर्त्याच्या अथवा हा श्लोक प्रक्षिप्त मानल्यास प्रक्षपकाराच्या मतें बुद्धावताराचें कृत्य म्हणजे बुद्धांला मोह पाडून श्रुतिमान्य अशा सदाचारापासून लोकांस परावृत्त करण्याचें होतें असें दिसतें खुद्द गौतमानें पित्राज्ञा स्वत उल्लघन केली नाहीं किंवा तसा उपदेशही कधीं केला नाही, तथापि त्यानें मोहपाश तोडून पित्याची आज्ञा न विचारतां एकाएकीं गृहत्याग (महाभिनिष्क्रमण) केला या त्याच्या चरित्राला उद्देशून पित्राज्ञाभग करण्याविषयी मोह पाडण्याचे कामीं बुद्धाच्या नावाचा उपयोग जाबालीनें या प्रसगीं केला असावा असें फार तर म्हणता येइल पण बुद्धाचा काळ रामावताराच्या पुष्कळ मागाहूनचा असल्यामुळें सदरहू श्लोक प्रक्षिप्त ठरतो ही गोष्ट राहतेच सारांश, श्रीमद्भागवतकार, 'आर्यविद्यासुधाकर' ग्रथाचा कर्ता, व ' यथाहि चोर स तथाहि बुद्ध ' या श्लोकाचा कर्ता, या तिघाच्याही दृष्टीनें बुद्धावताराचा उद्देश म्हणजे वेदप्रतिपादित मार्गापासून ( यज्ञयागापासून अथवा पित्राज्ञा पालनापासून ) लोकांना पराङ्मुख करणें हा होता असें दिसतें प्रसिद्ध गीत-गोविंद काव्याचा कर्ता जयदेव यानें तर म्हटलें आहे की—

' निन्दसि यज्ञविधेरहह श्रुतिजातम्
सदयहृदयदर्शितपशुघातम्
केशवधृतबुद्धशरीर, जय जगदीश हरे ॥'

विष्णुपुराणांत ( तृतीय अश १७।१८ अध्याय ) बुद्धावताराला 'मायामोह' असें नांव दिलें आहे आणि त्यानें विष्णूच्या शरीरापासून निर्माण झाल्यानतर नर्मदेच्या तीरीं जाऊन तेथें तपश्चर्या करीत असलेल्या दैत्यांना सदहजनक वाक्यांनीं श्रुतिस्मृतिधर्मापासून पराङ्मुख करून अर्हत् धर्माचा उपदेश केला आणि तुम्हांला निर्वाण पाहिजे असल तर पशुवधाचा त्याग करा, आणि हें जग विज्ञानमय करून सोडा, या जगाला कोणत्याही आधार नाहीं हें निश्चयें करून जाणा, वगैरे शिकविलें, अशा प्रकारें बुद्धावताराचें कृत्य वर्णिलें आहे

वरील सर्व उल्लेखांचा, विशेषतः विष्णुपुराणांत सांगितल्याप्रमाणें दैत्यांना केलेल्या उपदेशांत 'अर्हत्,' 'निर्वाण' 'विज्ञान,' आणि जगाचा कोणी आधार किंवा नियंता नसणें इ० गोष्टींचा उल्लेख व त्यांची गौतम बुद्धाच्या मताशीं तुलना करून पाहिलें तर, बुद्धावतार म्हणजे गौतम बुद्धच कीं अन्य कोणी याविषयीं संदेह राहण्याचें वस्तुत कांहीं कारण दिसत नाहीं.

साहित्यदर्पणकार भट्ट विश्वनाथ यांनीं दशावतारासंबधानें लिहितांना प्रत्येक अवताराचें अल्प वर्णन दिलें आहे तें असें आहे —

'यस्यालीयत शल्कसीम्नि जलधिः पृष्ठे जगन्मण्डलं।
दंष्ट्रायां धरणी नखे दितिसुताधीशः पदे रोदसी।
क्रोधे क्षत्रगणः शरे दशमुखः पाणौ प्रलंबासुरः।
ध्याने विश्वमसावधार्मिककुलं कस्मैचिदस्मै नमः॥

यात लोकांना भ्रांति पाडण्याचें नाव नाहीं, तर उलट ध्यानाच्या योगानें सगळ्या विश्वावर प्रभुत्व स्थापित करण्याचा उल्लेख करून गौरव केला आहे गौतम बुद्धाच्या चारित्र्याचें विशेषत्व म्हणजे हठयोगादिकाच्या योगानें नव्हे, तर ध्यानाच्या योगानें दिव्यज्ञानाची प्राप्ति त्यानें करून घेतली व जगाचा उद्धार केला यात आहे, आणि हें त्याच्या चरित्रांतलें रहस्य भट्ट विश्वनाथ यानीं एका शब्दात मोठ्या खुबीनें सांगितलें आहे दुसऱ्या एका कवीनें म्हटलें आहे —

वेदा येन समुद्धृता वसुमती पृष्ठे धृताप्युद्धृता
दैत्येशो नखरैर्हतः फणिपतेर्लोक बलिः प्रापितः।
क्ष्माक्षत्राजगती दशास्यरहिता माता कृता रोहिणी
हिंसा दोषवती धराप्ययवना पायात् स नारायणः॥

यांत बुद्धावताराचें कृत्य हिंसानिषेध, याचा स्पष्ट उल्लेख आहे

हे ब्राह्मणधर्मी ग्रंथकाराचे उल्लेख झाले आता बौद्धग्रंथकार यासबंधानें काय म्हणतात तें पाहू येथें हे अवश्य सांगितलें पाहिजे कीं, ज्याप्रमाणें येशू ख्रिस्तानें स्वत ला Son of God म्हणवून घेतलें, त्याप्रमाणें गौतम बुद्धानें स्वत विष्णूचा अवतार किंवा देवाचा अंश असें कोठेंही म्हटलें नाहीं.

अर्थ—इंद्र, वरुण, वायुप्रभृति देव व मुख्य मुख्य मुनी ज्या कामवासनेनें लटपटून जातात, त्या कामवासनेला तृणवत् ( तुच्छ ) मानणारा ( बुद्ध ) कोणाच्या विस्मयाला प्राप्त होत नाहीं?

असेच बुद्धाला अत्युच पदीं अढळ बसविणारे उल्लेख ललितविस्तर, अश्वघोषरचित बुद्धचरित, लंकावतारसूत्र वगैरे संस्कृत बौद्ध ग्रंथात आणि महावंस, महावग्ग, वगैरे पालिग्रंथात आढळतात.

यावरून निष्पक्षपाती मनानें जर काणी निष्कर्ष काढू लागला तर तो असाच निष्कर्ष काढील कीं गौतमबुद्ध हा पुरुष अलौकिक, सदाचरणी, पवित्र मनाचा, दिव्यज्ञानी आणि जगाच्या उद्धारार्थ अवतीर्ण झाला होता, त्याचीं मतें श्रुतिप्रतिपादित धर्ममार्गाहून भिन्न असतील, आणि म्हणून ब्राह्मणधर्मी ग्रंथकाराचीं मनें त्याच्या शिकवणीमुळें दुखविलीं जाणें व त्यामुळें त्या ग्रंथकाराच्या ग्रंथात प्रसंगविशेषीं त्याच्याविषयीं कटूक्ति आढळणें साहजिक आहे, तथापि त्याच्या आचरणाची छाप ब्राह्मणग्रंथकाराच्या मनावरही इतकी विलक्षण बसली होती कीं त्याच्यानें त्याच्याविषयीं योग्य आदर व्यक्त केल्यावाचून राहवेना, आणि म्हणून त्यानीं बुद्धाला विष्णूच्या अवतारात गणिलें पण त्याच्या मताच्या विचित्रपणामुळें असुराना मोह पाडण्याचा उद्देश त्याच्या अवताराला चिकटवून त्यानीं आपल्या मनाचें समाधान करून घेतलें

असा काढलेला निष्कर्ष इतिहासाच्या दृष्टीनेंही चुकीचा ठरणार नाहीं, कारण, गौतम बुद्धानें लोकाच्या श्रुतिप्रणीत धर्मावर आघात करून त्याचीं मनें जरी असत क्षुब्ध केलीं तरी ती क्षुब्धता चिरकाल राहिली नाहीं, व बुद्धाविषयीं किंवा त्याच्या शिष्याविषयीं दीर्घ द्वेष ब्राह्मणधर्मी लोकानीं ठेविला नाही कालातरानें मनाची क्षुब्धता निघून जाऊन शांततेनें विचार करण्याची वेळ येताच व गौतमाच्या अगचे लोकोत्तर गुण त्याच्या हृदयमदिरांत उज्वल प्रकाश पाडू लागताच त्याना आपलें शिर त्याच्यापुढें वाकवून गौतमासारख्या जगाच्या उद्धारार्थ देह कष्टविणाऱ्या महात्म्याला योग्य असा मान दिला बौद्ध धर्माचा छळ करून त्याना ब्राह्मणानीं हिंदुस्थानातून घालवून दिलें असा जो लोकप्रवाद आहे त्याला इतिहासात खरोखर कांहीं आधार नाहीं

ऐतिहासिक प्रमाणें देऊन या विषयासंबधानें मी लवकरच एक लेख लिहिणार आहे तूर्त येथें एवढेंच सांगतो कीं एकाद दुसऱ्या राजानें जरी बौद्धांचा छळ केला तरी तो काहीं नियम नव्हे, अपवादच म्हटला पाहिजे बौद्धांचा उच्छेद करणारा असा एकादा राजा निघाला तर त्याना ब्राह्मणाच्या बरोबरीनें दक्षिणा देणें, त्याच्या मथाविषयीं आदरबुद्धि दाखविणें, त्याच्यासाठीं विहार वगैरे बांधणें इत्यादि कृत्यें करण्याचें मानसिक औदार्य दाखविणारे ब्राह्मणधर्मी राजे व मंत्री याची संख्या दसपट निघेल हें कान्हेरी येथील लेण्यांतील कोरीव लेखांवरून व शासनपत्रांवरून सिद्ध करून देता येईल सामान्यत बौद्ध व ब्राह्मणधर्मी लोक परस्पराशा शांततेनें व स्नेहभावानें वागत असत अशा वेळीं आमच्या लोकांनीं बुद्धाला त्याच्या अगच्या लोकोत्तर गुणावरून देवाच्या अवतारात गणिलें तर त्याचें नवल वाटण्याचें किंवा त्याविषयीं संदेह वाटण्याचें कारण नाहीं प्रसिद्ध खिस्तीपंडित रेनन याचें नाव माहित नाहीं असा इग्रजी जाणणारा मनुष्य विरळा याचें खिस्तचरित्र सुप्रसिद्धच आहे या ग्रथात त्यानें लिहून ठविलें आहे कीं, शाक्य मुनीखेरीज सगळ्या मानवजातात येशु खिस्ता एवढा थोर पुरुष दुसरा झाला नाहीं जो मान खिस्ती लेखक प्रांजलपणें बुद्धाला देत आहेत, तोच आमच्या लोकांनीं बुद्धाला दिला तर त्याचें नवल का वाटावें?

# प्रकरण तिसरें.



## बौद्ध धर्माविषयीं कित्येक गैरसमज.

[ बौद्धधर्माविषयीं अनास्था व अज्ञान-धर्म का तत्त्वज्ञान?-ईश्वरवादी कीं नास्तिक?-बौद्धधर्म व हिंदुधर्म बौद्धदर्शन व सांख्यदर्शन बौद्धधर्म शून्यवादी नाहीं-निर्वाण म्हणजे काय? निराशावाद बुद्धाविषयींचे गैरसमज व त्याचें निरसन ]

Journal of the Pali Text Society 1886 Dr Bhandarkar s Early History of the Deccan

मताचा अनुवाद केला वस्तुत बौद्धधर्म जितका तत्वज्ञानमय आहे, तितक[illegible] तो धर्म या संज्ञेलाही पात्र आहे किंबहुना धर्म, नीति, आणि तत्वज्ञान [illegible] तिन्ही त्याच्या ठिकाणीं एकवटलीं आहेत असें म्हणणें अधिक योग्य होईल [illegible] या विश्वाचें स्वरूप व त्याला चलन देणाऱ्या शक्ति यांचे ज्ञान बौद्धधर्म करून[illegible] दतो, मनुष्याला त्याच्या अतरात्म्याचें खरें स्वरूप व्यक्त करून दाखवितो; त्याच्या उन्नतीची पराकाष्ठा कोणती आहे ती सागतो, मनुष्याच्या अत-करणांतल्या गूढ नैतिक वृत्तींवर प्रकाश पाडतो, व त्याना जागृत करून सन्मार्गाकडे प्रवृत्त करतो, मनुष्याचें ' दैव ' म्हणतात तें त्याच्याच स्वत च्या हातात असतें, हा गोष्ट त्याच्या मनावर बिंबवून स्वत च्या प्रयत्नाच्या हिंमती-वर मनुष्याला अक्षय्य शाततासुख–चिरकालीन निर्वाणपद–प्राप्त करून घेता येतें, हेंही तो धर्म सागतो साराश, विश्वाचें सत्यस्वरूप, त्याला हलविणाऱ्या शक्ति, त्यात वागणाराचे परस्पराशीं सबध, उत्तम गतीचा मार्ग, त्या मार्गानें जाण्याचें साधन, व अतिम साध्य, इतक्या सगळ्या गोष्टी दाखविणाऱ्या बौद्ध धर्माला जर ' धर्म ' ह्मणावयाचें नाहीं, तर मग म्हणावयाचें तरी कोणाला?

' धर्म ' शब्दाचा सामान्यत जो अर्थ लोक घेतात, तो याहून किंचित् निराळा असल्यामुळें समजुतीचा घोंटाळा झालला आहे आपल्या ज्ञानेंद्रियाच्या आकलनशक्तीच्या मर्यादेच्या बाहेर अज्ञेय असें जें काहीं आहे, त्याची प्राप्ति करून घेण्याची हाव ही आमच्या धर्मकल्पनेच्या मुळाशीं बहुधा असते तेव्हा ईश्वराविषयींच्या आमच्या कल्पना, त्याच्या विषयाचें भय, अलौकिक चमत्कार, ईश्वरी कृपा, इ० गोष्टी ज्यात नाहींत, त्याला धर्म ही संज्ञा देण्यास आमचें मन कचरावें हें साहजिक आहे बौद्ध धर्माचा पायाच मुळीं निराळा आहे तो अज्ञेयावरील श्रद्धेसारख्या संशयित गोष्टीवर बसविलेला नाहीं, तर प्रत्यक्ष प्रमाणावर–दु खाचें अस्तित्व या जगात आहे तोंवर शाश्वत शांति प्राप्त होणार नाहीं या गोष्टीवर–बसविलेला आहे त्यांत संदिग्धता, अंधश्रद्धा किंवा गूढ मुळींच नाही तथापि मनुष्याच्या जीविताचा सद्विनियोग कसा करतां येईल, हें बौद्ध धर्मानें जितकें उत्कृष्ट प्रकारें दाखविलें आहे, तितकें अन्यत्र क्वचित्च दाख विलेलें असेल बौद्ध धर्माची 'धर्म'या दृष्टीनें महती आहे ती याच गोष्टींत आहे

बौद्ध धर्मात धर्मतत्वें तर समाविष्ट आहेतच, पण त्यात नीतितत्वांचा देखील प्रकर्ष झालेला आढळतो अंधश्रद्धा ठेवण्यास तो धर्म कधीं सांगत नाहीं स्वत विचार करा, प्रतीती पहा, खात्री करून घ्या, आणि मग खरें माना, असें तो सांगतो अज्ञेय अशा ईश्वरानें ही गोष्ट सांगितली आहे, आणि म्हणून ती खरी मानली पाहिजे अशा तत्त्वावर त्याच्या इमारतीची उभारणी झालेली नाहीं तर जग व मानवी जिवित याचा अगेंउपागें काय आहेत त्याची मीमांसा करून, मनुष्य व मनुष्यें व मनुष्य आणि मनुष्येतर प्राणी याच्यातला संबंध ठरवून, त्या स्वाभाविक संबंधाच्या पायावर त्यानें आपले नियम रचिले मनाला जी गोष्ट पटेल तिचाच स्वीकार विहित, त्यांत दुराग्रहाचा भाग नसावा, असें तो सांगतो दुराचरण करणाराला चिरकालीन शासनाचा बागुलबोवा किंवा अंधश्रद्धा ठेवणाराला पापमुक्ततेचें आमिष दाखविण्याचा यत्न करण्याचें त्यानें मनात सुद्धां आणिलें नाहीं, पण प्रत्येक माणसाला त्याच्या बऱ्या वाईट कर्मा-प्रमाणें फळ मिळावयाचेंच, चुकावयाचें नाहीं, असें लोकाच्या मनावर बिंबवि त्यानें सदाचरणाविषयीं स्फूर्ति, व दुराचरणाला प्रतिबंध व्हावा, पापाचरणावि षयींच्या मोहाचे पटल गळून पडावें, सत्याच्या प्रकाशानें दिव्य दृष्टि प्राप्त व्हावी व सर्वांची क्षणिक–नश्वर–सुखाकडची दृष्टि निघून ती चिरकालीन व शाश्वत सुखाकडे वळावी व माणसाचे हातून सदाचरण, परोपकार, धर्मकृत्यें, समाजसेवा इ० व्हावींत, अशी योजना बौद्ध धर्मानें करून ठेविली आहे अशा रीतीनें धर्म आणि नीति याचा मिलाफ करून ज्या बौद्ध धर्मानें त्याला व्यावहारिक स्वरूप दिलें, त्याला एकांगी म्हणणें ही निखालस चूक म्हटली पाहिजे

**दुसरा गैरसमज**—बौद्ध धर्म निरीश्वरवादी ऊर्फ नास्तिक आहे हा गैरसमज 'ईश्वर' शब्दाच्या अर्थाविषयींच्या मतभेदामुळें उत्पन्न झाला आहे ज्याच्या कृपाप्रसादानें किंवा इच्छामात्रेंकरून हें सारें विश्व निर्माण झालें आहे, अस्तित्वात आहे किंवा लय पावणार आहे, असा जो कोणी पुरुष तो ईश्वर, अशा अर्थानें बौद्ध ईश्वराचें अस्तित्व मानीत नाहींत, ही गोष्ट कबूल केली

आहे असें मुद्दास वाटत होतें. आपण काढलेला धर्ममार्ग हा कांहीं नवा नाहीं असें तर त्यानें वारंवार शिष्यांना बजावून सांगितलें आहे. बौद्धदर्शन ही सांख्यदर्शनाची पुष्कळ सुधारलेली व्यवहारपयोगी आवृत्ति आहे; तसेंच वेदान्त व बौद्धदर्शन यांच्यांतही पुष्कळ साम्य आहे. बौद्धनिर्वाण व वेदान्त मार्गाचा मोक्ष यांच्यांत तर अतिशय साम्य आहे, वगैरे गोष्टींचा बारकाईनें विचार केला म्हणजे प्रो० ऱ्हिस डेव्हिड्स साहेबांसारख्या थोर, विद्वान्, पण ब्राह्मणधर्माविषयीं अत्यंत प्रतिकूल मत धारण करणाऱ्या लेखकानें बुद्धाविषयीं '*the greatest, the wisest and the best of the Hindus*' म्हणजे 'हिंदूमध्यें सर्वांत थोर, सर्वांत अतिशय ज्ञानी, व सर्वांत उत्कृष्ट' असें जें म्हटलें आहे, त्यांत अतिशयोक्ति दिसेनाशी होते.

बौद्धदर्शन व सांख्यदर्शन यांच्यांत पुष्कळ मतभेद आहे; तथापि पहिलें हें दुसऱ्याची सुधारून वाढविलेली व्यवहारपयोगी बनविलेली आवृत्ति आहे असें वर म्हटलें आहे. सांख्य आणि बौद्ध यांच्यांत जो संबंध आहे तोच बौद्ध आणि वेदान्त यांच्यांत आहे, व श्रीशंकराचार्यांनीं मायावाद हा बुद्धांपासून घेतला अशी शंका त्यांच्यांतल्या साम्यावरून तत्कालीन लोकांना-सुद्धां आली होती. प्रसिद्ध ग्रंथकार विज्ञानभिक्षु यानें विज्ञानामृत नांवाच्या आपल्या भाष्यांत पद्मपुराणांतून पुढील श्लोक उतरून घेऊन वरच्यासारखेंच अनुमान काढलें आहे. तो श्लोक असाः—

मायावादमसच्छास्त्रं प्रच्छन्नं बौद्धमेव तत् ।
मयैव कथितं देवि कलौ ब्राह्मणरूपिणा ॥

या श्लोकांत सांगितलेला ब्राह्मण म्हणजे श्रीशंकराचार्य हें सांगावयाला नकोच. या गोष्टीला दुसराही एक आधार आहे. आचार्य दिग्विजय करीत करीत काश्मीर देशांत गेले व तेथें 'शारदा' पीठाची स्थापना त्यांनीं केली. त्या वेळीं झालेल्या वादाच्या संबंधानें पुढील श्लोक महत्त्वाचा आहे. तो असाः—

विज्ञानवादी क्षणिकत्वमेषामंगीचकारापि बहुत्वमेषः ।
वेदांतवादी स्थिरसंविदेकत्वंगीचकारेति महान् विशेषः ॥

या श्लोकावरून शांकरमत व बौद्धांपैकीं माध्यमिकसंप्रदायमत यांच्यांत

फारच सूक्ष्म भेद आहे–स्थूल दृष्टीनें दोन्हीं एकच आहेत–असें साहजिक वाटतें. खुद् आचार्य व इतर दर्शनकार यांना बौद्ध म्हणजे आर्यधर्माहून बाह्य असें वाटत नसतां आम्ही त्यांचे अनुयायी मात्र त्यांना तुच्छ व परके समजतों, हें आमचें केवढें अज्ञान आहे!

**चौथा गैरसमज**–कित्येक म्हणतात कीं, बौद्ध धर्म हा शून्यवादी आहे खुद् शंकराचार्यांचाही असाच समज झालेला स्पष्ट दिसतो बौद्ध धर्मा विषयींची ही समजूत अगदीं अलीकडल्या काळापर्यंत चालत आली आहे, व ती त्या धर्माच्या एका पयासबघानें अगदीं खरी आहे यांत शंका नाहीं पण गौतम बुद्धानें केलेल्या उपदेशांत 'शून्यवादा' सारखें काहा दिसत नाहीं 'शून्यापासून हें सगळें जग व सचेतन जग निर्माण झालें, व शून्यातच त्याचा लय व्हावयाचा आहे,' या मताचें नांव शून्यवाद पण बुद्धानें एकदा भिक्षुस म्हटलें आहे —

"सय्यथापि भिक्खवे महासमुद्दो एकरसो लोणरसो, एवमेव खो भिक्खवे अय धम्मो एकरसो विमुत्तिरसो।' उदान्.

अर्थ—हे भिक्षूंनो, महासागर ज्याप्रमाणें एकरस–सगळें खारें पाणी असतें–त्याप्रमाणें धर्म हा सगळा विमुक्तिरसमय आहे ह्मणजे धर्म ही आध्यात्मिक गोष्ट आहे व तिचा उद्देश फक्त मुक्ति अथवा निर्वाण हा आहे 'निर्वाण' या शब्दाचा बुद्धानें ज्या अर्थानें निरनिराळ्या ठिकाणीं प्रयोग केला आहे, त्याच अर्थानें खुद् आचार्यांनींही त्या शब्दाचा प्रयोग केलेला आढळतो उदाहरणार्थ, गीतेंत ज्या ज्या ठिकाणीं सदर शब्द आला आहे ते ते म्हणजे पुढील श्लोक पहा—( अ० २।७२, ५।२४, ५।२६, ६।१५ )

यापैकी पहिल्या तीन श्लोकांत 'ब्रह्मनिर्वाण' असा शब्द असून चाव्यांत फक्त 'निर्वाण' असाच शब्द आहे, आणि सर्व ठिकाणीं आचार्यांनी आपल्या भाष्यांत त्या शब्दाचा अर्थ 'निर्वाण मोक्ष' असाच केलेला आहे गीताभा ष्यांत दुसरे एके ठिकाणीं ते म्हणतात कीं 'शान्ति सर्वसंसारदु खोपरमलक्षणां निर्वाणाख्याम् ।' वेदान्तसूत्रांपैकी शेवटल्या सूत्रावर भाष्य करताना आचार्य पुन म्हणतात–'सम्यग्दर्शन–विध्वस्त–तमसान्तु नित्यसिद्धनिर्वाण–परायणानां

सिद्धेव अनावृत्ति.' म्हणजे 'ज्यांनी सम्यग्दर्शनाच्या योगानें अंधकार दूर केला व जे नित्य सिद्ध निर्वाणाविषयीं तत्पर, त्यांना अनावृत्ति सिद्धच झाली म्हणावयाची'

आता बौद्ध ग्रंथांपैका विशेष आदरणीय असा जो धम्मपद ग्रंथ तो पाहिला तर त्यांत 'निब्बाण' म्हणजे निर्व्वाण शब्द पुढील ठिकाणीं आलेला आढळतो. ( अप्पमादवग्गो श्लोक ३।१२, बालवग्गो १६, दण्डवग्गो ६, बुद्धवग्गो ६, सुखवग्गो ७।८, कोधवग्गो ६, मग्गवग्गो १३।१७, भिक्खुवग्गो १०।१३) या श्लोकांवरील टीकावरून आणि खुद्द बुद्धानें शिष्यांना वेळोवेळीं दिलेल्या उत्तरावरून बौद्ध धर्मांत 'निब्बाण' शब्दाचा खरा अर्थ काय आहे तो काढतां येतो. * तो अर्थ हाच कीं, निब्बाण म्हणजे

* निर्वाण ( पालि निब्बाण ) म्हणजे काय तें आम्हास समजून सांगा असें हेमक, उदय व कप्पक अशा तिघांनी निरनिराळ्या वेळीं गौतम बुद्धास म्हटलें. तेव्हां गौतमबुद्ध म्हणाले —' छन्दरागविनोदनं निब्बाण पदमच्चुतम्' आणि या सूत्राचें स्पष्टीकरण करतांना त्यानीं म्हटलें 'या जगांत काहीं गोष्टी आपण पाहतों, काहीं ऐकतों, काहींचा विचार करतों. काहीं गोष्टींबद्दल प्रीति, आवड, इच्छा, वासना, अनुराग ही उत्पन्न होतात पण या मनोवृत्तींपासून ज्यांना स्वतःस अलिप्त ठेवतां येतें, तेंच संसारांतून उत्तीर्ण झाले असें समजावयाचें' दुसऱ्या एका प्रसंगीं उदयानें म्हटलें, 'हे मुनि, अविद्येचा नाश करणारा ज्ञान-मोक्षाचा मार्ग आम्हांस सांगा' तेव्हां भगवान् बुद्ध म्हणाले, 'हे उदय, वासना व आसक्ति यांचा विनाश, दोन्ही प्रकारचें दौर्मनस्य व आलस्य यांचें अपनोदन ( पालविणें, नाहींसें करणें ) व दुष्कृतीचें निवारण हाच तो मार्ग' ( **तण्हाय विप्पहानेन निब्बाणं इति वुच्चति**). कप्पक यानें विचारलेल्या प्रश्नाचें उत्तर देतांना भगवान् म्हणाले, '**अकिंचनं अनादानं एवं दीपं अनापरं निब्बाणं इति नं ब्रूमि जरामच्चुपरिक्खयम्** ।' अकिंचन म्हणजे ही काहीं वस्तु नाहीं, अनादान म्ह० कोणत्याही वस्तूचा लाभ करून घेण्या सारखी ही गोष्ट नाहीं, अनापर म्ह० हिला कशाचीही तुलना नाहीं, जरामच्चु परिक्खयं म्ह० जरा व मृत्यु यांचा नाश अशी जी गोष्ट तीच निर्व्वाण होय. या सर्वांचा अर्थ इतकाच कीं, वासना [अनुराग] क्षय, तृष्णाक्षय, व जरामृत्यूच्या अतीत होणें हाच निब्बाण होय.

शून्य नव्हे, तर अविद्येचा नाश राग, द्वेष व मोह याचा नाश कामतृष्णा, भवतृष्णा, व विभवतृष्णा याचा नाश होय देश व काल याच्या अतीत म्ह० पलीकडच्या स्थितीला तें नांव आहे निर्वाण म्हणजे अमृतत्वाचा लाभ अमृतपदाची प्राप्ति 'अकृत' वस्तुलाभ उपनिषदें ज्याला 'मुक्ति' म्हणतात, त्यालाच श्रीशंकराचार्य व बुद्ध हे निर्वाण म्हणतात ही निर्वाण प्राप्ति या जन्मीं–या पृथ्वीवर–करून घेता येते, असें बौद्ध शास्त्रग्रंथांत अनेक ठिकाणी सांगितलें आहे धम्मपदांतले स्थळें वर निर्दिष्ट केलींच आहेत 'मज्झिमनिकाय' ग्रंथात बुद्धत्वप्राप्तीनंतर बुद्ध व चपक यांच्यात झालेला संवाद दिला आहे त्यात बुद्ध म्हणतात, "मला अर्हत्व प्राप्त झालें आहे मी बुद्ध झालों आहें मला निर्वाणाचा लाभ झाला आहे" यावरून बुद्धाच्या स्वतःच्या उक्तीवरून तरी निर्वाणप्राप्ति जशी मेल्यानंतर तशी या जन्मांत सुद्धा प्राप्त करून घेता येते असें बौद्ध धर्माचें मत उघड दिसतें बुद्धाचें निर्वाण व उपनिषदाचें तुरीय ब्रह्म हें एक दिसतें माण्डुक्योपनिषदांत एके ठिकाणीं म्हटलें आहे कीं, 'जें अंतःप्रज्ञ नाहीं, बहिःप्रज्ञ नाहीं उभयप्रज्ञ नाहीं, प्रज्ञानघन नाहीं, जें अदृष्ट, अव्यवहार्य, अग्राह्य, अलक्षण, अचिन्त्य, अनिर्वचनीय, जें एकात्मतेच्या प्रत्ययाचा विषय होण्यास योग्य जें पंचविषयांहून अतीत, शांतियुक्त, मंगलमय, व अद्वैत, त्याला ज्ञानी चतुर्थ म्हणतात'

निर्वाण ही अवस्था पंचस्कंधातीत, संज्ञातीत, असंज्ञातीत, व अनाद्यात आहे तींत पृथ्वी, जल, तेज, वायु आकाश, अवस्तु, इहलोक, परलोक चंद्र, सूर्य कोणाचाही प्रवेश करू शकत नाहीं या कल्पनेशीं उपनिषदांची कल्पना कशी जुळते पहा —

न तत्र सूर्यो भाति, न चन्द्रतारकम्
नेमा विद्युतो भान्ति, कुतोऽयमग्निः ॥ मुण्डको० २।२।१

निर्वाण आणि मोक्ष हे एकच हें दाखविणारीं आणखी पुष्कळ प्रमाणें आहेत परंतु स्थलसंकोचास्तव तीं येथें देतां येत नाहींत आतां मोक्ष व ब्रह्म हे एकच आहेत हें दाखवितों म्हणजे तिघांची एकरूपता व्यक्त होईल

ज्याना हे पाहण्याची इच्छा असेल, त्यानीं आचार्यांच्या वेदांतभाष्यातले पुढील भाग पहावे.—

'ब्रह्मस्वरूपत्वात् मोक्षस्य' (१।१।४)
'ब्रह्मभावश्च मोक्षः' (१।१।४)
'ब्रह्मैव हि मुक्तावस्था' (३।४।५२)

त्याचप्रमाणें कठोपनिषद (१।२।१४) व बृहदारण्यकावरील भाष्य (४।४।६) हीं पहावीत.

वरील विवेचनावरून बुद्धाला शून्यवादी म्हणण्याचा कोणाल्हाही अधिकार नाहीं हें दिसून येईल बुद्धाला मोक्ष मान्य आहे इतकेंच नाहीं, तर त्यानें म्हटलें आहे कीं 'अय धम्मो एकरसो विमुत्तिरसो' ही विमुक्ति म्हणजे शून्यत्व–आत्यन्तिक विनाश–नव्हे, तर निर्वाण म्हणजे उपनिषदातले तुरीय ब्रह्म होय जर वेदान्ताला–आचार्यांना–तुम्ही हिंदुधर्माबाहेर टाकण्याला किंवा शून्यवादी म्हणण्याला तयार नाहीं, तर त्याच्याच मतासारखीं मतें प्रतिपादन करणाऱ्या बुद्धाला अहिंदु व शून्यवादी म्हणण्याला तुम्हाला काय अधिकार आहे?

**पांचवा गैरसमज**—बौद्ध धर्म हा पक्का निराशावादी (Pessimist) आहे, आणि दुःख भोगणे हाच पुरुषार्थ असे त्याचे गौरव करण्यास तो शिकवितो हा गैरसमज उत्पन्न करण्यास प्रसिद्ध जर्मन तत्ववेत्ता च निराशावादी शोपेनहोर यानें बौद्ध धर्माची केलेली प्रशंसा ही बहुधा कारण झाली असावी बुद्ध धर्मानें दुःखाचें प्रस्थ माजविलं असं म्हणणें म्हणजे त्या धर्माच्या निंदेचा कळस झाला म्हणावयाचा तेव्हा या गैरसमजाविषयीं दोन शब्द विस्तारानें लिहिणें अवश्य आहे.

---

१ 'If I were to take the result of my philosophy as the standard of truth, I would be obliged to concede to Buddhism the pre eminence over the rest. In any case it must be a satisfaction to me to see my

ज्या ठिकाणीं अहंता (Egotism) आहे त्या ठिकाणीच निराशावादा (Pessimism) चें वास्तव्य असणें शक्य आहे कारण अहंतेचा भंग होणें हेंच मोठें दुःख असतें पण बौद्ध धर्मांत अहंतेला थाराच नाहीं तेथें आत्याच्या दृष्टीला सगळ्या गोष्टींचें महत्त्व सारखेंच तेव्हां अहंतेचा भंग किंवा तज्जन्य दुःख यांचा प्रश्न काय उरला? जग हें दुःखमय आहे या दुःखाचा नाश केला पाहिजे व त्यापासून मुक्ति मिळविली पाहिजे ही बौद्ध धर्माची मुख्य शिकवणी आहे जगातल्या दुःखाचा नाश करणें हाच आपल्या जीविताचा उद्देश आहे असें शाक्य गौतमानें वारंवार आपल्या शिष्यांना निक्षून सांगितलें आहे पण दुःख म्हणजे तरी काय? यांत कोणकोणत्या गोष्टींचा अंतर्भाव होतो? हा विचार करण्यासारखा प्रश्न आहे बुद्धाच्या मतें जन्म जरा रोग मृत्यु विपत्ति क्लेश, निराशा हीं सगळीं दुःखें आहेत ज्याची आपण आकांक्षा धरतों तें न मिळणें हें सुद्धां दुःखच सारांश जीविताचीं मुख्य मुख्य अंगें सगळीं दुःखपूर्ण आहेत या दुःखाचें मूलतत्त्व काय तर क्षणभंगुरता असें बुद्धानें शोधून काढलें

---

teaching in such close agreement with a religion which the majority of mankind on earth hold as their own (The World as Will and Idea by Schopenhauer)
आपल्या मतासारखेंच बौद्ध धर्माचें मत आहे ही शापेनहोरची समजूत साफ चुकीची आहे मनुष्याच्या अंतर्यामी म्हणजे मनोवृत्तींच्या तळांत दुःखाचें क्षेत्र आहे व त्यामुळें त्याचें सगळें जीवित कष्टप्रद असणें अपरिहार्य आहे—मनुष्य प्राणी हा दुःखी असलाच पाहिजे—दुःखापासून त्याची सुटका कधीं होणें नाहीं हें शापेनहोरच्या मताचें सार आहे जगांत दुःख आहे असें बौद्ध धर्महि सांगतो पण या दुःखापासून मुक्तता मिळविण्याचें साधन—मनाची एकतानता हें मनुष्यास प्राप्य आहे इतकेंच नाहीं, तर तें मिळविणें हेंच जन्माचें साफल्य होय असें हा धर्म सांगतो मनुष्यानें निराश होऊं नये, शोक करूं नये, त्यापासून कांहीं लाभ नाहीं उलट मनाला दुर्बलता मात्र येते, असा उपदेश सारिपुत्राच्या शोकानें विव्हल झालेल्या आनंद नामक शिष्याला तथागतानें (बुद्धानें) केला आहे बुद्धाच्या मतें जीवित हें दुःखमय आहे,

मनुष्य अहंतेच्या भरात स्वतःला अक्षय समजतो या शरीराचा नाश झाला तरी आत्मा अमर आहे, त्याला भंग नाहीं, त्याचें रूपांतर व्हावयाचें नाहीं, अशी त्याची समजूत. त्याला बुद्धानें अनित्यत्वाचा उपदेश केल्यावरोबर त्याच्या मनाला धक्का बसून 'हाय? मी नाश पावणार? हाय हाय!' अशा प्रकारचे दुःखोद्गार त्याच्या मुखातून आपोआप बाहेर पडतात पण जीवित आणि क्षणभंगुरता याची पक्की सांगड घातली आहे अशी जर पूर्वीपासूनच मनाची पक्की समजूत झालेली असली आणि क्षणभंगुरता म्हणजेच दुःख हें कळलेलें असलें, तर जीवित दुःखमय आहे या गोष्टीच्या ज्ञानानें मन अविकृत राहतें या दृष्टीनें विचार केला म्हणजे दुःखाचें ज्ञान हा निर्वाणप्राप्तीचा मार्ग आहे हें उघड आहे.

---

याचें कारण मनुष्य वासनेला चिकटून राहतो व स्वार्थासाठीं धडपडतो, उच्च प्रकारच्या जीवनाची कल्पना त्याला नसते ती कल्पना ज्याला असते व सत्याकरिता व धर्माकरिता चारित्र धारण करणें हा उद्देश ज्याच्या डोळ्यांसमोर असतो, त्याला मृत्यूचें भय वाटत नाहीं, व या जन्मातलीं दुःखें त्याला भिववूं शकत नाहींत त्याचें मन नेहमी शांत व तृप्ति प्रसन्न असतें त्याला दुःखें बाधा करूं शकत नाहींत. असा मनुष्य निराश कसा असेल? जसा वृक्ष तशीं फळें, असा जगाचा नियम आहे. बौद्ध धर्म जर निराशावादी असता तर जगातलें दुःख नाहींसें करण्यासाठीं अपार लोकांच्या उद्धारार्थ स्वसुखनिरभिलाष वृत्तीनें उपदेश करीत हिंडणारे बौद्धधर्मोपदेशक पृथ्वीच्या पाठीवर निरनिराळ्या स्थानीं का हिंडते? त्यांना दडून बसण्यास अरण्यें, गुहा आणि गिरिकंदरें नव्हतीं असें थोडेंच आहे! आणि असा निराशावादी बौद्ध धर्म आपला म्हणविणाऱ्या लोकांत किती निरुत्साह, किती उद्विग्नता, आणि किती उदासीनता दिसली असती! पण बौद्ध म्हणविणाऱ्या राष्ट्रांची खरी स्थिति अशी कधीं तरी असल्याचें इतिहासांत दिसतें काय? जोंपर्यंत बौद्ध धर्माला ग्लानि आलेली नव्हती, व जोंपर्यंत त्यांत भ्रष्टता शिरली नव्हती, तोंपर्यंतचा भरतखंडाचा इतिहास किती तेजःपुंज व उज्ज्वल आहे हें मगध व कोसल देशच्या उदाहरणावरून सर्वांस विदित आहे थोड्या फार अंशानें ही स्थिति सीलोन, ब्रह्मदेश, सयाम, चीन व जपान या देशांत अजूनही पाहण्यास मिळते, असें मि० स्पॉर आकोनर नामक पाश्चात्य ग्रंथकार म्हणतो.

'जग हें दुःखमय आहे' ही कांहीं मनुष्याच्या अनुभवाची पराकोटी नाहीं. तर मनानें आकलन केलेल्या जगाविषयाच्या ज्ञानाचा मात्र पराकाष्ठा आहे. जगातलें दुःख प्रत्यक्ष अनुभवण्याचा नव्हे, तर जगात दुःख आहे ही गोष्ट पूर्ण लक्षात घेऊन सावध राहणें व त्या दुःखाच्या विकृतीपासून मनाला अलिप्त ठेवणें या गोष्टीचा उपदेश बौद्ध धर्म करतो. आयुष्यात सुखाचा लेश नाहीं, आनंद नाहीं, सगळी शुष्कता आहे, असें तो धर्म सांगत नाहीं, तर जें कांहीं आनंदमय दिसेल त्यानें मन विकृत होऊं देऊं नका कारण, तसें केल्यास दुःखानेंही तसेंच मन विकृत होईल, व निर्वाणप्राप्ति दूर जाईल असें त्याचें सांगणें आहे. सृष्टिसौंदर्यापासून होणारा निरुपद्रवी आनंद अनुभवण्याला व मनाला त्याची उपाधि न होऊं देतां त्याचें सेवन करण्याला बौद्ध धर्म कधींच मना करीत नाहीं. शांत, निर्जन, व रमणीय अशा अरण्यात एखाद्या झुळझुळ वाहणाऱ्या ओढ्याच्या अगर गंभीर जलाशयाच्या कांठीं बसून चांदण्या रात्रीं सृष्टिदेवतेचा सौंदर्यप्रसाद मनमुराद लुटण्याला बुद्धाची मुळींच हरकत नाहीं. पण जगाला त्रासून, व त्याच्या दुःखविषयींचा तिटकारा मनात बाळगून अरण्यसेवन करणें हा मार्ग चुकीचा आहे, असें बुद्धाचें म्हणणें आहे. जगात सगळें दुःखच आहे अशी त्याची समजूत असती 'तर जगातल्या अत्यंत सुखी प्राण्यापैकीं मी एक आहें' असे उद्गार त्यानें कधीं काढलेच नसते. जगात सुखही आहे आणि दुःखही आहे पण तें मानण्यावर आहे. जगांतली प्रत्येक वस्तु नश्वर आहे म्हणून तिच्याबद्दल शोक न करतां विचार करा, ज्याप्रमाणें पिंगवींत मोहोरा भरलेल्या ऊसाच्या त्याप्रमाणें या नश्वरतेच्या पाटांतच अनंत व अक्षय सुखाचा ठेवा आहे तो शोधून काढा, असा बुद्धाचा उपदेश आहे. 'जग हें दुःखमय आहे' या वाक्याचा भलताच अर्थ घेऊन लोकांनीं बौद्ध धर्माविषयीं गैरसमज करून घेतलेला आहे. क्षणभंगुरतेच्या पडद्याकडे पाहूनच सगळे लोक घाबरून जातात, आणि भ्रांत होऊन एक तर मोहपाशात अडकतात, अगर त्यापासून दूर रहावें म्हणून पळत सुटतात. दोन्ही प्रकार वाईट आहेत. क्षणभंगुरता म्हणजे दुःख ही गोष्ट पक्की लक्षात ठेवून धैर्यानें हा पडदा बाजूला सारण्यास पुढें व्हा, म्हणजे त्याच्या मागें असलेलें दिव्य निधान तुम्हाला प्राप्त होईल असें म्हणणें हा निरा

शावाद खास नव्हे, उलट महत्तम आशावाद होय, ही गोष्ट कोणीही कबूल करील तेव्हा शोपेनहोरला जे बौद्ध धर्माचा शिष्य समजतात, ते बौद्ध धर्मा विषयी स्वत चा भलताच ग्रह करून घेतात असें म्हटलें पाहिजे[१].

हे बौद्ध धर्माविषयींचे गैरसमज झाले. आतां खुद्द बुद्धासंबधाच्या गैरसमजाचे एक दोन प्रकार सांगून हा लेख समाप्त करतों पुष्कळ लोक गौतम बुद्धासंबधानें बोलताना त्याला बौद्ध धर्माचा संस्थापक अशी संज्ञा देतात. पण हा चूक आहे शंकराचार्य हे जितके हिंदु धर्माचे संस्थापक तितकेच गौतमबुद्ध हे बौद्ध धर्माचे संस्थापक होत खरी गोष्ट म्हणजे शाक्य गौतम हे बौद्ध धर्माचे संस्थापक नव्हेत, तर केवळ एक मुख्य प्रचारक अथवा संस्कारक होते गौतमाच्या पूर्वी अनेक बुद्ध होऊन गेले. बौद्ध शास्त्रकाराच्या मताप्रमाणें हल्लीं महाभद्रकल्प चालू आहे नुसत्या या कल्पाचेच उदाहरण घेतलें तरी गौतमापूर्वी ककुच्छंद (ख्रि श पूर्वी ३१०१ वर्षे) व कनकमुनि (ख्रि श पू २०९९ वर्षे), काश्यप (ख्रि श पू १०१४ वर्षे) असे तीन बुद्ध झाल्यावर चवथे बुद्ध शाक्य गौतम हे ख्रि श पू ६२३ या वर्षी जन्मास आल्याचे उल्लेख सापडतात या महाभद्रकल्पाच्याही पूर्वी १२० बुद्ध होऊन गेले असें बौद्ध म्हणतात तेव्हा गौतम बुद्ध हा बौद्ध धर्माचा संस्थापक अशी जी समजूत प्रचलित आहे ती खोटी आहे इतकेंच नाहीं, तर बौद्ध धर्म हा एक नवीन धर्म–पूर्वीच्या वैदिक किंवा ब्राह्मणधर्माहून अगदी निराळा धर्म–आहे ही समजूत सुद्धा चुकीची आहे शाक्यमुनि गौतम येवढेंच म्हणतात कीं, ब्राह्मण धर्माचें किंवा सनातन धर्माचें रहस्य न समजता केवळ अंधपरंपरेनें जग चाललें आहे त्या धर्माचें रहस्य विचाराअंतीं आपणास कळलें आहे व तें उपदेशाच्या द्वारें आपण जगास विदित करीत आहों. म्हणजे बौद्ध धर्म हा प्रोटेस्टंट

१ कल्पवृक्षास निघणाऱ्या नशनल म्यागाशिन नावाच्या एका इंग्रजी मासिक पुस्तकात एका विद्वान् लेखकानें हीच चूक करटी टाच्यासमोर असल्यानें हा खुलासा येथें द्यावा लागला.

ब्राह्मणधर्मासारखा आहे अशी बुद्ध गौतमची कल्पना होती असें दिसतें या संबंधात पालि भाषेचे प्रसिद्ध पंडित प्रो॰ र्‍हिस डेव्हिड्स यांचे मत विचारणीय आहे ते म्हणतात –

" Buddhism was a child—a product of Hinduism. Gautama's whole learning was Brahmanical He probably deemed himself to be the most correct exponent of the spirit as distinct from the letter of the ancient faith, and it can only be claimed that he was the greatest, the wisest, and the best of the Hindus "

बुद्धासंबंधाचा आणखी एक गैरसमज म्हणजे त्याच्या ऐतिहासिकत्वासंबधानें संशय होय गौतम बुद्धाच्या चरित्रातल्या ठळक ठळक गोष्टींचें अलौकिकत्व हें त्या गोष्टींच्या ऐतिहासिकत्वाविषयीं लोकांच्या मनात शंका उत्पन्न होण्यास मुख्य कारण झालें आहे त्याशिवाय शुद्धोदन, माया, सिद्धार्थ, महाप्रजावती गौतमी, यशोधरा वगैरे नावांचे होणारे निरनिराळे अर्थ, आणि बौद्धधर्माच्या अलौकिक कथा व पौराणिक गोष्टी याच्यातलें साम्य इत्यादि प्रकारावरून मॉ॰ सेनार्टसारख्या विद्वानांनासुद्धां भ्रम उत्पन्न होऊन बुद्धासारखा पुरुषच कोणी निर्माण झाला नाही, ती केवळ काल्पनिक व्यक्ति असली पाहिजे, असें वाटू लागलें मॉ॰सेनार्ट हे आपल्या Essai sur la Legende du Buddha या ग्रंथात म्हणतात–" It is necessary to recognise that on the whole, excepting a few authentic souvenirs which easily slip through our fingers, the legend of Buddha represents not a real life, nor even a life coloured with fanciful inventions, but it is essentially the poetical glorification of a mythological and divine type that popular

veneration has fixed as an aureole on the head of a perfectly human real founder of a sect." मॉ० सेनार्ट यांच्या मतें बुद्धाचें चरित्र म्हणजे सूर्यविषयींची एक नुसती पौराणिक कथा आहे, आणि तींत पुढील गोष्टी सुचवत आहेत—१ स्वर्गलोक सोडून या मृत्युलोकावर येण्याचा सूर्याचा विचार, २ मर्त्यांच्या पोटीं जन्मास न येतां प्रकाशाकडे पितृत्व आणि मेघाच्छन्न आकाशाकडे मातृत्व येणें, ३ मायेच्या साह्यानें वनस्पतींच्या गर्भांत उत्पत्ति, ४ जन्मतांच मातेचा मृत्यु ( सूर्योदय होतांच बाष्पावरण नाहींसें होणें ), ५ इहलोकचें वैभव ( उत्तम सुगंधि, शीतल, वायु, व विद्युत, इत्यादिकांचा सहवास ) ६ वैभवाचा तुच्छ मानून त्याविषयींची वैराग्यवृत्ति, आणि मेघावरणांतून केव्हां सुटेन अशी मनाला लागलेली तळमळ, ७ मोहपाशांतून सुटका ( मेघांच्या आडून सूर्यानें बाहेर येणें ), ८ तपाचरण ( रानावनांतून आणि शुष्क वातावरणांतून सूर्याचा संचार ), ९ अमृतपान ( जलाशयांतून पाण्याचा पुरवठा होणें ), १० मार-विजय ( पर्जन्याची वृष्टि, वादळें वगैरे ), ११ बुद्धविजय ( प्रकाश ), १२ धर्मचक्रप्रवर्तन ( अशीं अनेक संकटें आलीं असतांही त्यांतून निभावून ऋतूंचें चक्र बिनबोभाट व्यवस्थित चालू ठेवणें ), १३ निर्वाणप्राप्ति (सूर्यास्त), १४ दहनविधि ( सूर्यास्ताचे वेळीं क्षितिजावर ज्वालेसारखा दिसणारा तप्तसुवर्णासारखा रंग ), या सगळ्या गोष्टी बुद्धाचें चरित्र आणि सूर्योदया-पासून तों सूर्यास्तापर्यंतचें आकाशांतलें दिनमणीचें भ्रमण यांच्यांतलें साम्य दाखवितात यावरून मॉ० सेनार्ट यांनीं सिद्धान्त काढला आहे कीं, बुद्ध हा जरी ऐतिहासिक पुरुष असला तरी त्याच्या धर्मांत वरील सूर्योपासनेच्या स्वरूपाचेंच बरेंच प्रतिबिंब आहे यांत संशय नाहीं.

येशू ख्रिस्त, श्रीकृष्ण वगैरे अनेक लोकोत्तर व्यक्तींच्या ऐतिहासिकत्वा-संबंधानें असेच तर्कवितर्क पुढें केले जात असतात तेव्हां गौतमबुद्धासंबंधानें बऱ्याचशा तर्ककुतर्क निघावेत यांत आश्चर्य नाहीं. कांहीं वर्षांपर्यंत असल्या तर्कांना काय जबाब द्यावा याविषयीं मोठी अडचण पडत असे, पण थोड्या वर्षांपूर्वीं हिंदुस्थानसरकारच्या पुराणवस्तुसंशोधन खात्याला नेपाळ संस्थानांत

ज्या ठिकाणीं बुद्धाचा जन्म झाला असें बौद्धलोक समजतात, त्या जागेजवळ खणीत असता, अशोक राजाच्या वेळचा एक शिलास्तंभ सापडला त्यावर पुढील लेख खोदलेला होता —

"देवान पियेन पियदसिन वीसति वसाभिसितेन अतन आगाच महीयिते हिध बुद्धे जाते सक्यमुनीति सिला विगडा-भिचा कालापित सिलाथवेच उसपापिते; हिध भगव जातेति लुमिनिगामे उबालिके कते अथभागियेच।"

अर्थ—देवाचा प्रियदर्शी म्हणजे अशोकराजा यानें आपल्या अभिषेकास वीस वर्षे झाल्यावर येथें शाक्यमुनि बुद्ध जन्मला होते म्हणून स्वतः येऊन पूजा केली चारी बाजूस शिलास्तंभाची भिंत बांधिली, आणि (हा) शिलास्तंभ उभारिला या ठिकाणीं भगवान् बुद्ध जन्मले होते म्हणून या लुंबनी गावचा कर माफ करण्यात आला, आणि (विहाराला ?) काही नेमणूक करून देण्यात आला (प्रो धर्मानंदकृत "बुद्ध, धर्म आणि संघ" पृ २ पहा)

या शिलालेखानें बुद्ध ही ऐतिहासिक व्यक्ति नसून केवळ पौराणिक रूपक आहे असा समजुतीला कायमची मुक्ति दिली तेव्हापासून बुद्धाच्या एतिहासिकत्वासंबधानें शंका घेण्याचें धाडस पुनः कोणी केलें नाहीं

ज्याप्रमाणें मॉ सेनार्ट यांहीं बुद्धाला सूर्योपासनेचें रूपक बनविलें, त्याचप्रमाणें डॉ कर्न यांनीं त्याला ज्योतिषविषयक सृष्टचमत्काराचें स्वरूप देऊन त्याची एतिहासिकता नष्ट करण्याचा यत्न केला होता, पण वरील शिला-स्तंभाच्या शोधामुळें तोही यत्न फसला, इतकेंच नाहीं, तर डॉ एर्नेस्ट विंडिश सारख्या विद्वान् लखनाचा पुढील टोमणा त्याना खावा लागला डॉ विंडिश म्हणतात —"Dr Kern's remarkable knowledge of astronomy enables him to see stars twinkling in regions where there is not the smallest ground for any such assumption"

गौतमबुद्धाच्या चरित्राच्या ऐतिहासिकत्वासंबधानें पाश्चात्य व प्राच्य पंडितांचीं मतें कशाहीं असलीं तरी त्याच्या नांवाशीं संबद्ध असलेला धर्म ही जगातल्या इतिहासातल्या अत्यंत प्रमुख घटनेंपैकी एक घटना होती, व तिच्यासंबंधानें निष्कारण गैरसमज करून न घेता शोधक बुद्धीनें तिच्याबद्दलची माहिती मिळविणें हें प्रत्येक सुशिक्षिताचें कर्तव्य आहे एवढी गोष्ट खास आहे

---

# प्रकरण चौथें.

## बुद्धाचे पूर्वजन्म.

[विषय—बुद्धनिर्माण होण्याचें कारण-निरनिराळ्या कल्पातले निरनिराळे बुद्ध-गौतमाच्या पूर्वजन्माच वृत्त-निरनिराळ्या जन्मात निरनिराळ्या पारमिताची प्राप्ति-मर्कटजन्माची कथा-मार्जारजन्माची कथा सिंह जन्माची कथा-वाराणशीचा राजपुत्र-पूर्वसंचिताचा विकास]

बुद्धाच्या पूर्वजन्मासंबंधानें बौद्ध ग्रथातून नानाविध गमतीच्या कथा आढळतात या कथाचा संग्रह सुत्तपिटक नामक पालिग्रंथात 'जातक कथा' या नावानें प्रसिद्ध आहे बौद्ध ग्रथकाराची समजूत अशी आहे का, घोर तिमिरानें आच्छन्न अशा या संसारांत बुजत पडलल्या मानवाच्या उद्धारार्थ अनेक वर्षांनीं एक्क बुद्ध निर्माण होतो बौद्धधर्मप्रवर्तक शाक्य गौतमाच्या पूर्वी अनेक बुद्ध अशा रातीनें अवतीर्ण झाले पण त्यांच्या अवतारकृत्याचा इतिहास सर्वभक्षक अशा कालाच्या उदरांत जाऊन पडल्यामुळें लोक त्या विषयी अज्ञानात आहत सध्याचा जो काळ आहे, त्याला बौद्धग्रथकार 'महाभद्रकल्प' म्हणतात या कल्पात आजपर्यंत ककुच्छद, कनकमुनि, काश्यप व शाक्य गौतम असे चार बुद्ध झाले पहिला ककुच्छद याचा काळ खि० स० पूर्वी ३१०१ वर्षे, दुसऱ्याचा खि० स० पू० २०९९ वर्षे, तिसऱ्याचा खि० स०

पू० १०१४ वर्षे, व शेवटचा शाक्य गौतम याचा काळ खि० स० पू० ६२३ वर्षे हा होता, असें ते समजतात त्याच्या पूर्वी १२० 'तथागत' झाले, व त्याच्या अगोदर किती बुद्ध होऊन गेले, याची गणती नाही. या बुद्धाच्या अवतारकथा हल्लीं उपलब्ध नाहींत. त्याच्या चरित्रांतला नवीन नवीन भाग इतिहास-संशोधकाच्या परिश्रमानें प्रकाशांत येऊं लागला आहे, व खुद्द गौतम बुद्धानें आपल्या मागल्या जन्माच्या कथा शिष्यांना सांगितलेल्या आज उपलब्ध आहेत. या पूर्वजन्मांच्या कथा खरा खरा इतिहास म्हणून जरी मानल्या नाहींत, तरी त्यावरून बुद्धाच्या अवतारकृत्याच्या स्वरूपावर बराच प्रकाश पडण्यासारखा असल्यामुळें व या जातककथांना बौद्धधर्मी लोक व पाश्चात्य पंडित बरेंच महत्व देत असल्यामुळे त्यांचे थोडेसें विवेचन येथ करीत आहें

बौद्धग्रंथकार बुद्धाच्या निरनिराळ्या जन्मासंबंधानें उपपत्ति देतात ती अशी –पुण्यवान् लोक मरणोत्तर ब्रह्मलोकाला जातात, पण कित्येक शतकेंपर्यंत पृथ्वीतलावर पापाचरण सारखें सुरू असल्यामुळें कोणी ब्रह्मलोकास जाईना, तेव्हा आपला लोक ओस पडलेला पाहून ब्रह्मदेवाला वाईट वाटलें, आणि लोकांना सदाचरणाचा मार्ग दाखविण्यास व बुद्धत्वप्राप्तीस योग्य असा कोणी मानवप्राणी आहे काय ? हें ज्ञान-दृष्टीनें पाहिल्यावर तसा एक पुरुष त्याला आढळला तोच शाक्य गौतम या नावानें पुढें प्रसिद्धीस आला

ब्रह्मदेवाची दृष्टि त्याच्याकडे गेली, तेव्हा तो अत्यंत दरिद्रावस्थेंत होता. त्याची एक वृद्ध आई होती गौतम हा वाणिज्य-व्यवसाय करून कसें तरी आपलें व आपल्या आईचें पोट भरीत असे अशा कष्टमय स्थितींत आयुष्य काढण्यापेक्षा सुवर्णभूमीस जाऊन नशाब उघडलें तर पहावें, असा विचार करून तो आपल्या जवळ होतें नव्हतें तें सगळें घेऊन वृद्धमातेसह निघाला, आणि नावाड्याच्या हातावर थोडेसें द्रव्य ठवून व त्याच्या हातांपायां पडून सुवर्णभूमीस जाण्यासाठीं तो नावेंत जाऊन बसला थोड्या वेळानें

तथागत म्ह० 'त्यापदवाला पोंचलला' अर्थात् पूर्णताविशिष्ट, ही संज्ञा बुद्धाला किंवा त्याच्या योग्यतेच्या दुसऱ्या थोर व्यक्तीला लावात.

भयंकर वादळ होऊन नाव वर खालीं होऊं लागली. तेव्हां आपल्या स्वतःच्या जिवापेक्षां आपल्या आईच्या जिवाची त्याला विशेष काळजी वाटूं लागली. शेवटीं नाव आतां बुडणार असें पाहून त्यानें आईला पाठीशीं बांधलें, आणि पैल-तीराला तरून जाण्यासाठीं समुद्रांत उडी टाकली. गौतमाची शक्ति केवढी व समुद्राचा विस्तार केवढा! पण त्याचा तो दृढनिश्चय पाहून ब्रह्मदेवाला कौतुक वाटलें, आणि त्याच्या प्रसादानें गौतम पैलतीराला सुरक्षित पोंचला. इतकेंच नाहीं तर ब्रह्मदेवाच्या कृपाकटाक्षानें त्याच्या हातून अनेक सत्कृत्यें घडलीं तथापि बुद्धत्वप्राप्ति त्याला या जन्मांत घडली नाहीं.

सर्वभद्र-कल्पांत गौतम एका राजाच्या पोटीं जन्माला आला. या जन्मीं त्याला बुद्धत्वप्राप्तीची इच्छा होती, पण ती सफळ झाली नाहीं. सारमन्द-कल्पांत तो पुष्पवती नगरीच्या राजकुलांत जन्माला आला. या जन्मीं तृष्णा-गुरबुद्धाच्या जवळून 'अनियत-विवरण' व दीपंकर-बुद्धाजवळून 'नियत-विवरण' काय असतें याची त्यानें माहिती करून घेतली. सारमंदकल्पांत त्यानें चारदां ब्राह्मणाचे जन्म घेतले. वर-कल्पांत यक्ष, सिद्ध, सन्यासी, देव, मनुष्य, पशु वगैरे जन्म झाले. अशा एकंदर ५५० जन्मांची यादी व त्यांचे वृत्तांत पालिग्रंथांत दिलेले आहेत. या प्रत्येक जन्मांत त्यानें कांहींना कांहीं सत्कृत्य करून ठेवलेलें आढळतें. एका जन्मांत दान, तर दुसऱ्यांत शील, तिसऱ्यांत नैष्कर्म्य, तर चौथ्यांत प्रज्ञा, याप्रमाणें निरनिराळ्या सद्गुणांची पराकाष्ठा त्यानें संपादिली. या गुणांना 'पारमिता' म्हणतात. उदाहरणार्थ, खदिरांगार जन्मांत त्यानें आपले नेत्र, मस्तक, मांस, स्त्रीपुत्र व सर्वस्व यांचें दान करून दान-पारमिता दाखविली. भूरिदत्त जन्मांत त्रिविध शील-पारमिता संपादन केली. युध्यमुतसोम जन्मांत त्यानें परदार, जडजवाहिर, नोकरचाकर, या सर्वांचा त्याग करून व संन्यास-ग्रहण करून उत्तम निष्क्रमपारमिता दाखविली. सत्तुभस्त्र जन्मांत प्रज्ञा-पारमिता, महाजनक जन्मांत वीर्य-पारमिता, क्षान्ति-वादि जन्मांत क्षांति-पारमिता, महासुतसोम जन्मांत सत्य-पारमिता, तेमि-जन्मांत अधिष्ठान-पारमिता, निग्रोधमृग जन्मांत मैत्रा-पारमिता, व त्यत्जन्मांत उपेक्षा-पारमिता, या प्रमाणें एकेका जन्मांत एकेक पारमिता अथवा एकेका

गुणाची पराकाष्ठा त्यानें संपादली प्रत्येक जन्मात या प्रमाण एकेका सद्गुणाची जोड गौतमानें केल्यामुळे पशु-योनात सुद्धा त्याची वृत्ति साधूसारखा राहिली, व सत्य, क्षमाशीलता, दया, मैत्री इत्यादि धर्मापासून तो स्वत कधीं टळला नाहा, इतकेंच नाहीं तर त्यानें इतरांनाही सन्मार्गाकडे वळविण्याचा यत्न केला, हें पुढील कित्येक मनोरंजक व बोधप्रद कथावरून दिसून येइल

१ मर्कट जन्मात असताना त्याच्या कळपातला हजारो माकडें शेजारच्या गावातील एका मोठ्या चिंचेच्या झाडावर चिंचा खाण्यासाठा जाऊ लागलीं तेव्हा बुद्धानें त्याना म्हटलें, 'गड्यानो, तुमचा हा विचार ठीक नाहीं हें चिंचेचें झाड रानात असतें व त्यावर कोणाची मालकी नसती तर गाष्ट निराळी होती मग तेथें आपणास फुकट पाहण्याम हरकत नव्हती पण हें झाड या गावकऱ्याचें आहे आपण त्याच्या चिंचा खाऊन टाकल्या तर त्याचें नुकसान होऊन ते आपल्या नावानें रडतील परंतु या हितोपदशाकडे कोणा लक्ष दिलें नाहीं, आणि त्याच रात्रा ५०० माकडें मुकाट्यानें चिंचा खाण्याला निघून गेलीं त्याची गडबड ऐकून सगळ गावकरी त्याना मारण्यासाठा सोटे घेऊन आले इकडे बुद्धाला ही गोष्ट समजला, तेव्हा आपल्या सोबत्याच्या जिवा घरलें संकट टाळाण्यास काय युक्ति करावी या विचारात तो पडला अखेर एक युक्ति सुचली तो स्वत मुकाट्यान त्या गावात गेला गावांतले सगळे लोक सोटे घेऊन बाहेर पडले होते फक्त एक म्हातारी राहिली होता, आणि तिलाही डोळ्याना दिसत नव्हतें. बुद्धानें तिच्या घराला आग लावून दिली. जेव्हां धुरानें सगळें घर भरून गेल, तेव्हा 'घराला आग लागला, कोणी विझवा रे' असें मोठ्यानें ओरडत ती घरांतून बाहेर पडली तिची आरोळी ऐकून गावकरी माकडाचा नाद सोडून आग विझविण्यासाठीं धांवले ही सधी साधून माकडे पळून गेली. या जन्मात बुद्धानें प्रज्ञा-पारमिता म्हणजे चातुर्याची पराकाष्ठा संपादिली

२ एकदा मांजराचा जन्म आला असता मांजराचें पिल्लू नदींत पडून वाहत गेलें तेव्हां बुद्धानें तें परत आणण्याची प्रतिज्ञा केली, आणि आपली शेपटी पाण्यात बुडवून तिनें कांठावर पाणी शिंपडण्याचा सपाटा चालविला

वरून देवराज इंद्र हें पाहत होता त्याला हा प्रकार पाहून आश्चर्य वाटलें, आणि 'तू हें काय करीत आहेस?' असें त्यानें विचारिलें. तेव्हां नदी कोरडी करण्याची ही युक्ति आहे असें माजरानें सांगितलें त्यावर इंद्र हसून म्हणाला, 'अशा रीतीनें शेंकडों वर्षे जरी उद्योग चालविलास तरी नदी कोरडी व्हावयाची नाहीं तुझी शक्ति किती अल्प आणि तू हातीं घेतलेला उद्योग केवढा प्रचंड!' हे त्याचे शब्द ऐकून माजर म्हणाले, 'तुझ्यासारखा अधीर, भित्रा आणि मूर्ख कोणी नसेल! अरे, साहस केल्यावाचून या जगात कोणतेंही महत्कार्य व्हावयाचें नाहीं तुझ्या अंगात तें नसलें तर निदान दुसऱ्याला तरी धीर खचवू नकोस हातीं घेतलेलें काम तडीस नेल्याशिवाय राहावयाचें नाहीं, हा माझा तर दृढ-निश्चय आहे' हें त्याचें धीराचें भाषण ऐकून इंद्र शरमला, आणि अशा प्राण्याला मदत करणें योग्य आहे असें पाहून त्यानें त्या माजराचें पिहू नदींतून काढून आणून दिलें या जन्मीं बुद्धानें वीर्यपारमिता म्हणजे वीरत्वाची पराकाष्ठा संपादन केली

३ सिंह-जन्मांत बुद्ध एकदा पर्वतावर राहत असता जवळच्या एका सरोवराचें पाणी पिण्यासाठीं हरीण येत असत एकदा सिंहरूपी बुद्ध हरणाचे मागें पळतां पळतां चिखलांत फसला व जवळून एक कोल्हा जात होता, त्याला म्हणाला, 'गड्या, मी भुकेनें अतिशय पीडित होऊन हरणाच्या मागें लागून पळत असतां या चिखलांत फसलों आहें येथून माझी सुटका करशील तर मोठे उपकार होतील' कोल्हा म्हणाला, 'बाबारे, तुझी मला खरो-खर कींव येते, पण काय उपयोग? तू पहलास बळवान् प्राणी, तशांतून भुकेला मी तुझी सुटका करण्यासाठीं जवळ येताच तू मला फाडून खाशील' सिंहानें आणा-शपथा वाहून तसें कांहीं एक करणार नाहीं, याविषयीं कोल्ह्याची खात्री केली तेव्हां कोल्ह्यानें सिंहाच्या सुटकेसाठीं पुढील युक्ति केली त्यानें जव-ळच्या सरोवरापासून सिंहाच्या पायापर्यंत पाणी जाण्यासारखी मातीची पाळी काढली; आणि मग हातानें पाणी लोटून त्या पाळींतून काढून दिलें. त्यामुळें चिखल पातळ होऊन त्यांतून सिंहाचे पाय मोकळे झाले सिंहानें आपलें वचन पाळलें, व कोल्ह्याचे उपकार तो जन्मभर स्मरत राहिला याप्रमाणें या जन्मीं त्यानें सत्य-पारमिता म्हणजे सत्यवादित्वाची पराकाष्ठा संपादिली.

४ राजाववादजन्मांत युद्ध वाराणशी नगरींत मल्लदत्त राजाच्या पोटीं जन्मास आले होते राजकुमाराचें वय तेरा चौदा वर्षांचें झालें, तेव्हां तक्षशिला येथील महापाठशाळेंत सर्व प्रकारच्या विद्या व कला यांचें शिक्षण घऊन व नीति आणि शास्त्रें यांचें अध्ययन करून ते परत आले शिक्षणाचा फार चागला सस्कार त्याच्या मनावर झाला होता रागद्वेषाचा त्याग करून धर्मशास्त्राप्रमाणें प्रजापालन करण्याचें व्रत त्यानीं धरिलें होतें यामुळें प्रजेचें त्याच्यावर अति-प्रेम असे सर्व लोक त्याचे गुणानुवाद गात चोहोंकडून गुणाची प्रशसा ऐकू येत, पण आपल्या अगचे दोष कोणा दाखवितो कीं नाहीं तें पहावें, असा विचार करून ते देशाटनासाठी रथात बसून निघाल चोहोंकडे फिरत फिरत एका अरुद अडचणाच्या मार्गांत ते आले समोरून कोसल देशच्या राजाचाहा रथ येत होता दोन्ही रथाला जाण्यासारखी हर वाट नव्हती कोण्या तरी एकानें माघार घेत. याशिवाय दुसरा मार्गच राहिला नव्हता तेव्हा आता कोणी माघार घ्यावयाची? दोन्ही रथावरच्या सारथ्याना आपापल्या यजमानाच्या वैभवाचा अभिमान वाटत होता त्याच्यांत अर्थातच पुष्कळ बोलाचाली झाली राज्याचा विस्तार, बल, सपत्ति, कीर्ति, कुलीनता, वगैरे सगळ्या बाबतात दोन्ही राजे सारखे होते कोणी कोणाला हार जाणारे नव्हते तेव्हा शेवटीं तुलना एका मुद्यावर करण्याचा प्रसग आला तो मुद्दा म्हणजे शील हा होय 'तुमच्या राजाचें शील कसें आहे?' असें वाराणशीच्या सारथ्यान कोसलाच्या सारथ्याला विचारलें, तेव्हा त्यानें उत्तर केलें —

दल्हं दल्हस्स खिपति मल्लिको मुदुना मुदम्
साधुपि साधुना जेति असाधुपि असाधुना ।
एतादिसो अय राजा मग्गा उय्याहि सारथाति ॥

अर्थ-(कोसलराज) मल्लिक मलवानाला बलानें, गरीबाला सौम्य उपायानें, साधूला साधुपणाच्या मार्गानें व असाधु (दुष्ट) जनाला दुष्टपणानें निर्जित असतो आमच्या महाराजाचा असा शीलाचार आहे (म्हणून) हे सारथी, तू आमची वाट सोड.

यावर वाराणशीच्या सारथ्यानें उत्तर केलें, 'तुझ्या यजमानाचे हे गुण म्हटले, तर त्याच्या अगचे दोष तरी कोणते आहेत साग पाहू?'

सारथी उत्तर करतो-'आमच्या महाराजाच्या या वर्तनाला तूं गुण समज वा दोष समज. पण तुझ्या यजमानाचें वर्तन कसें आहे तें तरी एकदाचें कळू दे'

वाराणशीचा सारथी उत्तर करतो –

''अक्कोधेन जिने कोधं असाधुं साधुना जिने
जिने कदरियं दानेन सच्चेन अलिकवादिनम्
एतादिसो अयं राजा मग्गा उय्याहि सारथीति ॥''

अर्थ –( वाराणशी-नृपति ) रागावलेल्या माणसाला अक्रोधानें ( शातपणानें ), असाधु ( दुष्ट ) माणसाला साधुपणानें व खोटें भाषण करणारास सत्यानें वश करतात आमचे महाराज असे आहेत. ( म्हणून ) हे सारथि, तू आम्हाला वाट दे'

हें सारथ्याचें भाषण ऐकून रथात बसलेला कोसलाधिपति व त्याचा सारथी या दोघानी रथाखाली उतरून वाराणशीच्या राजाला वाट दिली याप्रमाणें या राजकुमाराच्या जन्मात बुद्धानें शीलपारमिता म्हणजे सुस्वभावाची पराकाष्ठा सपादिली होती

गौतम बुद्धाच्या अगची अपूर्व नीतिमत्ता आणि चारित्र्यशुद्धता ही यदृच्छेनें प्राप्त झालेली नसून पूर्वजन्मपरपरेंत महत्प्रयत्नानें सचित करून ठेवलेल्या पुण्याईचा व सपादलेल्या गुणाचा साठा तिच्या मुळाशीं होता हें मुख्यत दाखविण्यासाठीं या जातककथाची रचना करण्यात आली असावी असें दिसतें. या जातककथाची विशेष माहिती पुढील प्रकरणात दिली आहे.



# प्रकरण पांचवें.



## जातक कथा.

[ विषय — 'जातक' शब्दाचा अर्थ-पूर्वजन्माचें स्मरण-जातक कथा सांगण्याचा उद्देश-त्यांचें इतर कथांशीं साम्य-कठ्यहारी जातक व दुष्यंतशाकुंतलोपाख्यान-जातक कथांचें महत्व व त्यांचा उपयोग-त्यांची मूळ लिपि-त्यांतलीं नीतिविषयक अवतरणें-या कथांचा एक मासला ]

'जातक' म्हणजे जन्म संबंधाच्या आणि कथा म्हणजे गोष्टी शाक्य गौतम बुद्ध यानें आपल्या पूर्वजन्माविषयींच्या गोष्टी आपल्या शिष्यांना वेळोवेळी सांगितल्या, त्याच 'जातक कथा' या नांवानें प्रसिद्ध आहेत. पूर्वजन्मीं आपण कोण होतों हें जाणण्याची अलौकिक शक्ति कित्येक महात्म्याच्या ठायीं असते, असा समज पूर्वीच्या काळीं आपल्या लोकांतच तेवढा होता असें नाहीं, तर ग्रीक लोकांमध्यें सुद्धा तशा प्रकारचा समज रूढ होता ग्रीस देशच्या इतिहासात भारतीय युद्धासारखें सुप्रसिद्ध असें जे रणकंदन ट्रॉय येथें झालें, त्यात युफार्बस या नांवानें आपण लढत असता मेनेलास यानें आपणास ठार केला होता, वगैरे गोष्टी पिथागोरस सांगत असे शुद्ध व निष्कलंक मन, पवित्र आचरण, व्यवहारपराङ्मुखता ( अथवा संसार-निवृत्ति ) आणि आध्यात्मिक चिंतन ( अथवा गुह्य योगविद्या ) यांच्या योगानें मनुष्याला इंद्रियातीत गोष्टींचें ज्ञान होऊं शकतें, अशी अद्यापही पुष्कळ लोकांची समजूत आहे * मग

* अर्लीनडे रिव्ह्यु आफ रिव्ह्युज या मासिक पुस्तकाचे सुप्रसिद्ध संपादक मि डब्ल्यु टी स्टेड यांचा अशा इंद्रियातीत गोष्टींच्या ज्ञानावर पूर्ण विश्वास बसत चालला आहे असें त्यांच्या कित्येक लेखांवरून दिसतें सद्दा वर्षांपूर्वी युरोपांत घडलेल्या एका राजकुलीन पुरुषाच्या अंताची अगाऊ सूचना एका भविष्यज्ञ बाईनें अगोदर कित्येक दिवस नक्की देऊन ठेविली होती, असें त्यांनीं म्हटलें आहे

गौतम बुद्धासारख्या सत्त्वस्थ, सच्छील, अध्यात्मचिंतनपर, आणि निष्कलंक, साधुवर्तनी पुरुषाला अनेक पूर्व जन्मांचें ज्ञान होतें, असा भाव पूर्वीच्या लोकांच्या मनात दृढ होऊन बसला तर त्यात मोठेंसें नवल नाहीं.

ज्या कालीं बौद्धधर्म आपल्या इकडे जारीनें प्रचलित होता, त्या काला बुद्धाच्या 'जातक कथा' लोक विश्रुत होत्या, असें म्हणण्यास पुष्कळ आधार सापडतो सर्व लोकाना त्या माहित व्हाव्या एतदर्थ बौद्धधर्मी राजानीं चिरकाल टिकणाऱ्या सोयीही करून ठेविल्या होत्या असें दिसतें. सुत्त–पिटक व चरिय–पिटक यासारख्या बौद्ध धर्मग्रथातून तर त्या आढळतातच, पण सांची, अमरावती, बहारत वगैरे ठिकाणा ही त्या गोष्टींची निदर्शक चित्रें खोदून ठेवलेली आढळतात आपल्या अवलोकनात सुमारें पावशें गोष्टींचीं याप्रमाणें कोरलेला किंवा खोदलेलीं चित्रें आलीं होती असें प्रसिद्ध चिनी प्रवासी फा–हयान म्हणतो दुसरा चिनीप्रवासी हुएनत्सग यानेंहा जातक कथांचा उल्लेख आपल्या प्रवासवर्णनात दोन ठिकाणीं केला आहे त्या उल्लेखावरून जातक कथा सुमारें दोनअडाच हजार वर्षांइतक्या जुन्या असून एकेकाळीं त्या बऱ्याच लोकप्रिय झाल्या असाव्या असें दिसतें.

या कथा आपल्या पूर्व जन्माच वृत्त सागण्याच्या हेतूनें बुद्धानें सागितल्या आहेत ह्याविषयीं शंका नाहीं पण त्या सागण्यात बुद्धाचा याशिवाय अन्य काहीं हेतु होता असें दिसतें धर्म किंवा नीति यांचीं तत्त्वें सूत्र-रूपानें लोकापुढे माडण्यापासून त्याच्या मनावर विशेषसा संस्कार होत नाहीं, पण तीच तत्त्वें गोष्टीमध्ये गोवून सागितलीं असता आबाल-वृद्धाना त्या गोष्टी ऐकाव्याशा वाटून त्या ऐकता ऐकता सहजासहजी तीं तत्त्वें त्यांच्या हृदयपटलावर बिंबतात मनुष्य स्वभावातली ही खुबी ओळखून बुद्धानें आपल्या धर्मातली व नीतिपर तत्त्वें या जातक कथाच्या रूपानें मोहक वाटतील अशा तऱ्हेनें लोकापुढे मांडलीं असावीत असें वाटतें. या जातककथा जो कोणी बाचल्या लक्षपूर्वक वाचून पाहील, त्याला मी म्हणतों त्याची सत्यता पटल्यावाचून राहणार नाहीं, अशी माझी खात्री आहे. इसापनीति, पंचतंत्र,

हितोपदेश यातील कथा व दुसऱ्या कित्येक इंग्रजी भाषेतल्या गोष्टी याच हेतूनें निरनिराळ्या काळीं निरनिराळ्या पुरुषाच्या हातून रचिल्या गेल्या जातक कथाप्रमाणें त्याचाही हेतु गोष्टींच्या द्वारें नीतिबोध करण्याचा असल्यामुळे कित्येक वेळा एकच नीति तत्त्व श्रोत्याच्या मनात ठसविण्याकरिता निरनिराळ्या लेखकांनीं कल्पिलेल्या गोष्टींत विलक्षण साम्य दिसतें या जातक कथांपैकीं पुष्कळ गोष्टी हुबेहुब इसापनीतींतल्या गोष्टींसारख्या आहेत * तसेंच चॉसर, हिराडोटस, वगैरे पाश्चात्य ग्रंथ काराच्या कृतींत सुद्धा कित्येक जातक कथा जशाच्या तशा उतरून घेतलेल्या दिसतात। कित्येकांचें तर महाभारतातील कथाशीं विलक्षण साम्य दिसतें उदाहरणार्थ, पुढील गोष्ट घ्या —

## कत्थहारी जातक व दुष्यंत-शकुंतलोपाख्यान.

जातककथा ग्रंथात कत्थहारी जातकाची कथा दिली आहे ती अशी आहे. —

एकदां काशीचा राजा ब्रह्मदत्त शिकारीस गेला असतां वनाची शोभा पाहत पाहत एके स्थळीं आला तेथें एक सुंदर स्त्री त्याच्या नजरेस पडली ती त्या ठिकाणीं समिधा गोळा करीत करीत एकीकडे आपल्या मधुर कंठानें सुस्वर गाणें गात होती राजाचें मन तिच्यावर जडलें परस्पराचें प्रेम जुळून राजा तेथें कांहीं काल रममाण झाला, व त्या स्त्रीला त्याच्या पासून गर्भ राहिला पुढें राजा जाऊं लागला, तेव्हां त्यानें खुणेसाठीं तिला आपल्या हातातली अंगठी देऊन म्हटलें, 'तुला मुलगी झाली तर ही अंगठी विकून तिचें मोल येईल त्यावर या मुलीचें पालन-पोषण तू कर, पण मुलगा झाला तर मात्र त्याला घेऊन माझे दरबारीं ये, व येताना बरोबर खुणेकरिता ही अंगठी आण.'

पुढें योग्य काळीं ती स्त्री प्रसूत झाली, मुलगा झाला, त्याचें नाव बोधिसत्व ठेविलें मुलगा चांगला बोलू, चालू, व खेळू लागल्यावर त्यानें एके

---

* इसापनीति हा ग्रंथ या जातक कथावरूनच रचिला असें प्रो॰ हिस् डेविड्स् म्हणतात

दिवशीं 'माझा बाप कोण व तो कोठ आहे'? म्हणून आपल्या आईला विचारलें, आणि 'मला त्याच्याकडे घेऊन चल' म्हणून हट्ट धरला मुलाचा हट्ट होता व तिलाही आपल्या पतीच्या भेटीची लालसा होती, म्हणून ती मुलाला घेऊन राजद्वारीं गेली काशी एक स्त्री आपल्या मुलाला घेऊन आली आहे अशी वर्दी राजाला पोंचली, तेव्हा तिला आत आणण्याचा हुकूम झाला तिनें राजाला वंदन केलें, आणि 'हा आपला मुलगा हजर आहे,' असें म्हणून ती उभी राहिली

राजानें तिला व मुलाला ओळखलें पण लोकापवादाच्या भीतीमुळें तिला आपली स्त्री म्हणण्याचें राजाला धैर्य होईना 'मी तुला ओळखीत नाहीं, व हा माझा मुलगाही नाही' अशा तऱ्हेचा उडवाउडवीचा भाषण राजानें केलें तेव्हा खूण पटण्यासाठीं राजानें दिलेला अंगठा तिनें पुढे केला, पण "ही अंगठी माझी नव्हे, हें सगळेंच कुभांड आहे" असें राजानें म्हटलें तेव्हा ती म्हणाली, 'महाराज, आता मात्र माझा उपाय खुंटला आता दिव्य करून सत्य कसोटीला लावण्यापलीकडे माझ्या हाती काही उरलें नाहीं मी या मुलाला वर फेकतें जर हा तुमचाच खरा मुलगा असेल तर तो हवेंत लटकत राहील जर नसेल तर भुईवर आपटून डोकें फुटून मरेल' असें म्हणून तिनें बोधिसत्वाचे पाय धरून त्याला हवेंत उंच फेकलें मुलगा जो वर हवेंत गेला तो तेथेंच आनंदानें मांडी घालून बसला, आणि म्हणाला 'राजा, मी खरा तुझाच पुत्र आहें सर्वांचें पालन-पोषण करणारा तू आपल्या स्वतःच्या पुत्राचें पालन कसा करीत नाहीस?' बोधिसत्वाचें हें भाषण ऐकून राजाच्यानें राहवेना त्यानें आपले दोन्ही हात मुलाला घेण्यासाठीं वर केले दुसरेही हजारों हात वर झाले पण मुलगा तेथून खाली उतरला, तो नेमका राजाच्याच हातीं आला राजानें त्याला आपल्या अंकावर घेतलें, आणि त्या स्त्रीस पट्टराणी करून अंतःपुरांत पाठविलें ब्रह्मदत्त राजाच्या मागून हा मुलगा राजा कट्ठ-वाहन या नावानें गादीवर बसला

या कथेंत आणि महाभारतांतल्या दुष्यंत-शकुंतलोपाख्यानांत अत्यंत सादृश्य आहे, हें कोणीही सांगेल शकुंतलोपाख्यानांत अंगठीचें नाव नाहीं

ह्या अंगठीचा संबंध कालिदासानें स्वतःच्या कल्पनेनें जोडून लाविला, अशी लोकांची समजूत आहे, पण ती सत्य आहे असें या जातक-कथेवरून दिसत नाहीं। दुर्वासाचा शाप, त्यामुळें अंगठी तळ्यात पडणें, व पुढें ती धीवराला सापडणें, वगैरे गोष्टी घालून कथानकाला रंग आणण्यात कालिदासाचें अप्रतिम कौशल्य दिसतें ही गोष्ट खरी पण त्या अंगठीची कल्पना मूळची त्याची नसून 'जातक कथा' कारांची असली पाहिजे हें निर्विवाद आहे कारण, कालक्रमाच्या दृष्टीनें पाहता जातक कथा कालिदासाच्या फार अगोदरच्या म्हणजे निदान पांचसातशें वर्षांअगोदरच्या असाव्या असें दिसतें *

जातक कथा नीतिपर आहेत, किंवा त्यांत बौद्धधर्माचीं तत्वें गोंविलीं आहेत एवढ्याच साठीं त्यांचें महत्व मानण्यात येतें असें नाहीं। त्यांची उपयुक्तता व योग्यता स्थापित करण्यास हीं कारणें तर सबळ आहेतच पण याशिवाय तत्कालीन बौद्ध समाजाच्या इतिहासाचें साधन म्हणून त्यांचें महत्व विशेष आहे बौद्धकालीन समाजाच्या चालीरीतींचें व त्या काळच्या लोकांच्या समजुती, विचार, लोकस्थिति इ० गोष्टींचें प्रतिबिंब सदर गोष्टींत दृग्गोचर झाल्यावाचून राहत नाहीं। बौद्ध वाङ्मयांत तर जातक कथांचा समावेश बुद्धवचनांत्य

---

* जातक कथा मूळ केव्हा लिहिल्या गेल्या तें नक्की सांगता येत नाहीं, परंतु कान्यकुब्ज येथील सम्राट हर्षवर्धन शिलादित्य याचे वेळीं आर्यशूर नामक कोणा विद्वान् पंडितानें त्यांचें संस्कृत भाषेंत भाषांतर केलें असें चिनी प्रवासी इत्सिंग हा इसवी सनाच्या सातव्या शतकांत लिहितो आर्यशूर हा पांचव्या खिस्ती शतकांत झाला असें कलकत्त्याचे पालिभाषाभिज्ञ महामहोपाध्याय डा० सतीशचंद्र विद्याभूषण यांचें मत आहे

जातक कथांपैकीं आणखी काहीं गोष्टींचें महाभारतांतल्या आख्यानांशीं साम्य आहे उदाहरणार्थ बककापोतक जातक नांवाची गोष्ट आणि भारतांतील आदिपर्वांतल्या २२९ व्या अध्यायांतील शार्ङ्गकोपाख्यान पहा उन्मादयन्ती जातकाचें कथासरित्सागरांतील उन्मादिनीच्या कथेशीं व विश्वंभर जातकाचें त्याच ग्रंथांतल्या तारावलोकाच्या कथेशीं असलेलें साम्य सहज लक्षांत येण्याजोगें आहे.

नऊ मुख्य अंगात केलेला आहे. म्हणून इसापनीतीतल्या गोष्टीप्रमाणें निवळ कथाभागासाठीं व तात्पर्यासाठीं त्या वाचल्या तर त्याच्यापासून मनोरंजन होऊन त्याबरोबर बोधही मिळतो, आणि या पेक्षा निराळी तात्विक दृष्टि ठेवून त्या आपण वाचू लागलों, तर तत्कालीन समाजाचें चित्र आपल्या डोळ्यांसमोर उभें राहतें.

या गोष्टी मूळ कोणत्या लिपीत लिहिल्या गेल्या तें सांगता येत नाहीं सिंहलद्वीपांत अशी दंतकथा आहे कीं, त्या मूळ सिंहली भाषेंत लिहिल्या होत्या व पुढें बुद्धघोष यानें इ० स० ४३० च्या सुमारास त्याचें पाली भाषेंत भाषांतर केलें. पाली भाषेंत भाषांतर होऊन आल्यावर मूळ सिंहली ग्रंथ कालांतरानें नष्ट झाला. पुढें पालीभाषेंतल्या ग्रंथाचें संस्कृतांत भाषांतर झालें हें संस्कृत भाषांतर आर्यशूर नामक कोणी प्राचीन महापंडितानें केलें असावें असें दिसतें. अमेरिकेंत बोस्टन येथ संस्कृत भाषेंत देवनागरी लिपींत छापलेलें ' जातकमाला अथवा बोधिसत्वावदानमाला ' या नावाचें हार्वर्ड युनिव्हर्सिटीनें प्रसिद्ध केलेलें पुस्तक माझ्या पाहण्यांत आलें. त्यावरून पाहता जातक कथा म्हणजे हुबेहुब संस्कृत भाषेंतील 'पंचतंत्र' किंवा 'हितोपदेश' यांतील कथाप्रमाणें सोप्या, लहान, सरळ, मनोरंजक व उपदेशपर गद्यात्मक गोष्टी असून त्यांत मधून मधून पद्यांत कांहीं नीतिवचनें अथवा व्यवहारज्ञान सांठविलें आहे असें दिसतें. उदाहरणार्थ थोडीशीं वचनें येथें देतों —

महत्स्वपि स्वदुःखेषु व्यक्तधैर्याः कृपात्मका ।
मृदुनाप्यन्यदुःखेन कम्पन्ते यत्तदद्भुतम् ॥ १ ॥
दानं नाम महानिधानमनुगं चौराद्यसाधारणम् ।
दानं मत्सर-लोभ-दोष-रजसः प्रक्षालनं चेतसः ॥
संसाराध्वपरिश्रमापनयनं दानं सुखं वाहनम् ।
दानं नैक सुखोपधानसुमुख सन्मित्रमात्यन्तिकम् ॥ २ ॥
न कश्चिद्दुर्लभा वृत्तिः संतोष-नियतात्मनाम् ।
कुत्र नाम न विद्यन्ते तृणपर्णजलाशयाः ॥ ३ ॥

अविस्मयः श्रुतवतां समृद्धानाममत्सर. ।
संतापश्च वनस्थानां गुणशोभाविधि. पर. ॥ ४ ॥

दानाभिलाप. साधूनां कृपाभ्यास-विवर्धित ।
नैति सकोच-दीनत्व दुखे प्राणान्तिकैरपि ॥ ५ ॥

प्रायेण खलु मन्दानाममर्पज्वलितं मन. ।
यस्मिन् वस्तुनि तत्कीर्त्यां तद्विशेपेण दह्यते ॥ ६ ॥

असत्प्रवृत्तेरनिवृत्तमानस. शुभेपु कर्मस्वविरूढनिश्चय. ।
पशुर्दिव (?) यास्यति केन हेतुना हतोऽपि यज्ञे स्वकृताश्रयाद्विना ७

हतश्च यज्ञे त्रिदिव यदि व्रजेत्ननु व्रजेयुः पशुतां स्वय द्विजा ॥
यतस्तु नायं विधिरीक्ष्यते क्वचिद्वचस्तदेपां न कथ ग्रहीष्यति ॥८॥

पापं समाचरति वीत-घृणो जघन्यः
प्राप्यापदं सघृण एव तु मध्यबुद्धिः ।
प्राणात्ययेऽपि न साधुजन स्ववृत्तिं
वेलां समुद्र इव लङ्घयितु समर्थ ॥ ९ ॥

शेवटीं मद्यपानाच्या दोषासबधाचा एकच श्लोक येथें देतों तो श्लोक असा मद्य काय काय करतं? तर—

शील निमीलयति हन्ति यश. प्रसह्य
लज्जां निरस्यति मतिं मलिनीकरोती ।
यद्धाम पीतमुपहन्ति गुणाश्च तांस्तां
स्तत्पातुमर्हसि कथ ननु मद्यमद्य ॥ १० ॥

जातक कथाचें स्वरूप चागल लक्षात यावें म्हणून त्यांतली एक लहानशी कथा येथें देतों शाक्य गौतमबुद्ध यानीं जेठवनांत असताना ही आपल्या शिष्यांना सांगितली ही कथा सागण्याचा प्रसग कसा उद्भवला तहा या कथेच्या प्रारभीं थोडक्यांत सांगितलें आहे तें अस कीं, कुमार

काश्यप याच्या आईच्या हातून पापाचरण घडल्याविषयींचा बोभाट चोहोंकडे झाला होता. पण हा बोभाट अगदीं अन्यायमूलक आहे अशी खात्री करून घेतल्यावर बुद्धानें स्वत:चें वजन खर्च करून तिच्यावर निष्कारण लादला गेलेला लोकप्रवाद दूर केला. शिळोप्याच्या वेळीं बौद्धभिक्षु बोलत बसले असतां त्यांच्यात या गोष्टीची चर्चा चालली होती, इतक्यात बुद्ध स्वत: तेथें आले आणि त्यांनीं ती चर्चा ऐकून म्हटलें, 'तथागतानें याच जन्मीं त्या विचाराचें रक्षण केलें आहे असें नाहीं, तर मागच्या जन्मींसुद्धां असाच प्रकार घडला होता' असें बोलून मागच्या जन्माची गोष्ट सांगण्यास त्यांनीं प्रारंभ केला. ती गोष्ट अशी —

पूर्वी ब्रह्मदत्त राजा काशी येथें राज्य करीत असतां बोधिसत्व हरणाच्या जन्माला आला होता. राजाच्या शिकारखान्यात हरणाचे दोन कळप ठेविले होते. राजा रोज तेथें जाई व त्यातल्या एखाद्या हरणाची शिकार करी. या कळपांपैकीं एक कळप मोठा होता व दुसरा लहान (पहिल्या कळपाचीच शाखा) होता. मोठ्या कळपाचा नायक लहान कळपाच्या मुख्याकडे जाऊन म्हणाला कीं, राजा रोज येऊन आपल्यातल्या कोणाला तरी मारून रोज नेतोच. त्यापेक्षां आपणच आपसात ठरवून आळीपाळीनें रोज एका हरणाला राजाच्या मुदपाकखान्यात पाठवीत जाऊं म्हणजे झालें अशानें बाण वर्मी लागून एखानें विव्हळत बसावें, आणि बाकीच्यांना त्याची ती अवस्था पाहून मनातल्या मनात तळमळावें असें तरी होणार नाहीं. जें काय होईल तें दृष्टीआड तरी होईल' दुसऱ्याला ही गोष्ट पसत पडली, आणि लागलीच अंमलातही आली.

एके दिवशीं धाकट्या कळपांतल्या एका गर्भिणी हरणीवर बळी जाण्याची पाळी आली. पण तितक्यात तिला आपला जीव वाचविण्याची एक युक्ति सुचली ती म्हणाली कीं, 'राजाला रोज एक प्राण अर्पण करण्याचा आपला ठराव आहे. पण मी गेल्यें म्हणजे दोन प्राण बळी पडतील. यासाठीं माझ्याबद्दल दुसऱ्या कोणाला तरी पाठवावें' पण तिच्या कळपाचा नायक तिचें म्हणणें कबूल करीना. तेव्हां ती मोठ्या कळपाच्या नायकाकडे गेली, आणि त्याला

तिनें आपल म्हणणें कळविलें त्याला तिची दया आली, आणि त्यानें स्वत तिच्या बद्दल मुदपाकखान्यात जाऊन आपली मान कापण्यासाठी पुढें केली

हरणाच्या कळपांच्या मुख्य नायकाना राजाकडून माफी असता हा नायक प्राण देण्यास आलेला पाहून पाकशाळवरील अधिकाऱ्याला आश्चर्य वाटलें, आणि त्यानें राजाला ती गोष्ट कळविली राजानें येऊन 'तू आपले प्राण कां देतोस ?' असें त्या नायकाला विचारलें तेव्हां त्यानें घडलेलें सारें वर्तमान राजाला निवेदन केलें त्यावरून राजाचें अत करण सद्गदित झालें व त्यान 'तुम्हा दोघांनाही जीवदान दिलें आहे ना' असें सागितलें पण तो नायक उठून जाईना तो म्हणाला आम्हा दोघाचे प्राण महाराजाना कृपालु होऊन वाचविले खरे पण बाकीच्या हरणांचें कस होणार ?' तेव्हा राजानें हिंसा न करण्याचें अभिवचन देऊन सर्वांच प्राण वांचविले तेव्हां त्या नायकानें उठून अहिंसाधर्माची महती सागितली

पुढें ती हरणी प्रसूत होऊन तिला पुत्र झाला तो हरणाचा पोत दुसऱ्या मोठ्या लहान कळपांतील हरणाशी खेळण्यासाठी जाऊ लागला तेव्हा त्या हरणीनें आपल्या पुत्रास उपदेश केला का बाळा, आपापल्या कळपात खेळ दुसऱ्या कळपात जाऊ नकोस दुसऱ्या कळपात जाऊन दीर्घ काळ जगण्या पेक्षां आपापल्या कळपात मरण आलें तरी तें श्रेयस्कर आहे

याप्रमाणें गोष्ट सागून बुद्धानें आपण मागल्या जन्मा मोठ्या कळपाचे नायक होतों देवदत्त (ज्यान बुद्धाशी मत्सरभाव ठेविल्याची हकीगत पुढें येणार आहे) हा धाकट्या कळपाचा नायक होता गर्भिणी हरणी ती कुमार काश्यपाची आई व राजा तोच आनद वगैरे गोष्टींची फोड करून सांगितली

प्रा० ऱ्हीस डेव्हिड्स यांचें असें मत आहे कीं या कथांतला मुख्य भाग –म्हणजे उदाहरणार्थ वरील कथेंतली हरिणीची गोष्ट–हा अशोकाच्याही पूर्वी

---

१ या उपदेशात गीतेंतल्या 'श्रयान् स्वधर्मो विगुण ' इ० श्लोकाची बरीचशी छाया दृष्टीस पडन

अनेक शतकें लोकांत प्रचलित असलेल्या गोष्टी होत, आणि हा भाग बौद्धानीं घेऊन त्याला आपणांस हवा तसा कथाभाग आरंभीं व शेवटीं जोडून दिला. जातक कथांतूनही ज्या अगदीं प्राचीन आहेत त्यांत गौतमबुद्धाचे पूर्वजन्म मनुष्येतर प्राण्याचे होते असें सांगितलें नसून कोठें राजपुत्र, तरकोठें ऋषिपुत्र, अशांचे जन्म असल्या विषयांचे उल्लेख सांपडतात दुसरी गोष्ट–वर दिलेल्या कथेंत शेवटीं जीं उपदेशपर वाक्यें आहेत तशा प्रकारचीं पद्यात्मक वाक्यें अलीकडच्या काळांतल्या कथांतून मात्र सांपडतात, प्राचीन कथांतून नाहांत तिसरी गोष्ट–मूळ जातक कथा फक्त दहाच असून पुढें त्याच्या संख्येंत भर पडत गेली, आणि या दहा जातक कथा बौद्धकालाच्याहि पूर्वी लोकांत प्रचलित होत्या उदाहरणार्थ, महासुदस्सन जातक ही मूळची सूर्यपूजसंबंधाची कथा होती एकंदर ५४७ जातक कथांपैकीं पुष्कळशा कथा त्याच्या मूळच्या स्वरूपांत अगदीं प्राचीन काळीं लोकांत प्रचलित असलेल्या दंतकथा (folk-lore) होत्या या दृष्टीनेंही त्या कथांचें जें महत्त्व आहे तें विचारी वाचक दृष्टीआड करणार नाहीत



# प्रकरण सहावें.



## बुद्धकालीन भरतखंडाची स्थिति.

[ विषय—क्रांतीची तयारी–राजकीय स्थिति–स्थलाभिमान, ग्रामाभिमान, वर्णाभिमान–कुलाभिमानामुळें झालेले अनर्थ–राजसत्तेचीं मुख्य ठिकाणें–कोसल व मगध यांचे संबंध–धार्मिक स्थिति इ० ]

बौद्ध धर्मानें नुसत्या हिंदुस्थानातच नव्हे, तर हिंदुस्थानाबाहेरही कित्येक देशांत राहणाऱ्या लोकांच्या आचारा विचारांत, धर्मविषयक मतांत, सामाजिक चालरीतींत, वाङ्मयांत, कलेंत, सारांश सर्व बाबतींत क्रांति करून लोकांच्या मनांत नव्या विचारांची व कर्तव्याची जागृति उत्पन्न केली हें पुढें निरनिराळ्या प्रकरणांतून दाखविण्यांत येईल कोणतीही क्रांति घडण्यापूर्वी

तिला अनुकूळ अशी परिस्थिति लागत असते आणि ही अनुकूळ परिस्थिति एकाएकी जमून येते असें नाहीं तीं हळूहळूं क्रमाक्रमानें बनत जाते हें परिस्थिति जमवून आणण्याचें काम कित्येक वर्षे-केव्हां केव्हां कित्येक शतकें-चाललें असतें बौद्ध धर्मासारखी क्रांति घडवून येण्यास अनुकूल परिस्थिति हिंदुस्थानाला एक दोन वर्षांत आली नाहीं तें काम अगोदर कित्येक शतकें पर्यंत सुरू होतें. तें कशा प्रकारें, तें या प्रकरणात दाखविण्याचा यत्न करीत आहे.

राजकीय स्थिति —बुद्धाचा जन्म होण्याच्या काळीं म्हणजे इ. स. पूर्वी ६ व्या किंवा ७ व्या शतकात आर्य लोकाच्या टोळ्या पंजाबातून खालीं उतरत उतरत व गंगेच्या दोन्ही तीरावर आपला अमल बसवीत बसवीत थेट बंगालपर्यंत जाऊन पोंचल्या होत्या चांगली हवा, स्वच्छ पाणी, व सुपीक जमीन पाहून तेथेंच आपला कायमचा तळ देण्याचा त्याचा विचार ठरला होता गुरें व मेंढया चारण्याचा अस्थिर धंदा सोडून देऊन शेतकीसारखा एके जागीं स्थाइक राहून करण्याचा धंदा त्यानीं स्वीकारला होता त्यानां राहण्यासाठा लहान लहान पक्कीं घरें बांधलीं होतीं, व या घरांचे लहान लहान समुदाय होऊन गावें वसलीं होतीं एके जागीं राहण्याची सवय झाल्यामुळें त्या गवयी बरोबर त्यांच्या विचारातही फरक पडला होता पूर्वी फिरत्या स्थितींत त्याना स्थलाभिमान ठाऊक नव्हता, तो आता उत्पन्न झाला होता, इतकेंच नाहा तर त्याच्या पुढचा पायरी जा ग्रामाभिमान तोही त्यांच्यात दिसत होता मूळच्या रानटी रहिवाशाना त्यानीं हांकून लाविलें होतें किंवा आपलें दास करून ठेविले होते त्यांच्यापेक्षा आपण श्रेष्ठ-ते जित व आपण जेते-असा वर्णाभिमानहा त्याच्या विचारात व कृतात व्यक्त होत असे आपण आर्य, ते अनार्य, हा भेद त्यांच्या वाङ्मयातही स्पष्टपणे दिसतो एकदां अभिमानाचें विन्हाड मनांत घुसलें म्हणजे तें निरनिराळ्या दिशांना आपला विस्तार करतें आर्यांतहा सगळे शेताचाच धंदा करणारे नव्हते. श्रमविभागाच्या तत्वावर आपापल्या सोयीप्रमाणें कोणी शेतकी, कोणी व्यापार व कोणी शिपाईगिरीचें काम करणारे होते कोणी या सर्वांना लागणारें अध्ययनाचें व अध्यापनाचें काम करीत सर्व धंदे सुरक्षितपणावर अवलंबून राहणारे असल्याकारणानें तो सुरक्षितपणा

ठेवण्याची जबाबदारी ज्यांनीं आपल्यावर घेतली होती त्यांना साहजिकच महत्त्व आलें व आपल्या अंगच्या क्षात्र-तेजावर हा सगळा माणसें अवलंबून आहेत असा विचार शिपाइबाण्याच्या लोकांच्या ( क्षत्रियांच्या ) अंगात आपल्या वर्णाविषयींचा अभिमान उत्पन्न करण्यास कारण झाला ज्यांनीं अध्ययनाचें व अध्यापनाचें काम आपलेकडे घतलें होत, त्यानाही असें वाटू लागलें कीं सर्व शास्त्राच्या मुळाशीं विद्या आहे, ती जर आमचे हातीं आहे तर परपरेनें समळ्या लोकांच्या दैवाची किल्ली आमचे हातीं आहे असेंच म्हटलें पाहिजे अशा रीतानें यानाही अभिमान वाटू लागला सारांश, प्रथम स्थलाभिमान, नतर ग्रामाभिमान, नतर वर्णाभिमान, असे एकामागून एक उत्पन्न झाले त्यात आणखी कुलाभिमानाची भर पडला अमके कुळ उच्च तमकें नीच, असे मानण्याकडे लोकांची प्रवृत्ति होऊं लागली क्षत्रियांत हा कुलाभिमानाची प्रवृत्ति फार प्रबळ झाली पूर्वी आपण सगळे आर्य सारखे आहों ही समतेची भावना जाऊन तिची जागा विषमतेच्या भावनेनें पटकावल्याबरोबर तिचे वाईट परिणाम दृग्गोचर होऊं लागले देशात लहान लहान वसाहतींची लहान लहान संस्थानें बनली होती त्याच्यात आपआपसात क्षुल्लक कारणावरून वैर माजून लढाया होऊं लागल्या या संस्थानांपैकीं काहीं ठिकाणीं राजसत्ता, काहीं ठिकाणीं प्रजासत्ता, व काहीं ठिकाणीं दोहोंचें कमजास्त मिश्रण होतें मगध, कोसल, वत्स, काशी आणि अवंती ही मुख्य राजसत्तेचीं ठिकाणें होतीं, आणि शाक्य भर्ग, कालाम कोलीय, मारिय, मल्ल, विदेह लिच्छवी, वगैरे लोकांचीं लहान लहान प्रजासत्ताक राज्यें होतीं हा प्रजासत्ताक राज्यें पादाक्रांत करून आपल्या अमलाखालीं आणण्याचा कित्येक राजांचा प्रयत्न होता. याचेळी उत्तर हिंदुस्थानांतील मुख्य मुख्य शहरें म्हणजे कोसल देशाची राजधानी अयोध्या ( नतर श्रावस्ती ही झाली ), काशी राज्याची वाराणशी, अग देशाची चंपा, उत्तर पांचालाची कंपिला, वत्साची कोशांबी, शूरसेनाची मथुरा, विदेहाची मिथिला, मगधाचा राजगृह, सौवीराची रोरुक, माळव्याची अवंती, व लिच्छवी लोकांची वैशाली हीं होतीं त्या वेळच्या कोसल राज्याच्या नक्की मर्यादा कळण्यास आता मार्ग नाही पण सध्याचा संयुक्त प्रांत व नेपाळचा

बहुतेक भाग त्यांत अंतर्गत असावा असें वाटतें. पूर्वी त्या राज्याची राजधानी अयोध्या असे, पण ती बदलून उत्तरेस नेपाळच्या डोंगरी मुलुखांतील श्रावस्ती नगरी ही कोसल राजानें आपली राजधानी केली. कोसल राज्य फार विस्तृत होतें. त्याची दक्षिणोत्तर लांबी ३०० मैल व पूर्वपश्चिम रुंदी जवळ जवळ तितकीच होती. या कोसल राज्याला प्रतिस्पर्धी असें मगधाचें राज्य होतें. बाकीचीं राज्यें लहान होतीं. कोसल व मगध राज्याच्या आपसांत नेहमी लढाया चालत. या लढायांचा स्वल्प मासला येथें देतों, म्हणजे त्यावरून तत्कालीन राजकीय स्थितीचा चांगला बोध होईल.

बुद्धाचा जन्म झाला त्या काळीं कोसलच्या गादीवर आणेमी ब्रह्मदत्त नावाचा राजा राज्य करीत होता. त्यानें आपली मुलगी (हिला बौद्धग्रंथांत कोसलराजदुहिता असें नाम म्हटलें आहे) मगधाचा राजा बिंबिसार याला देऊन आणि राज्याचा भार पुत्र प्रसेनजित् (पालिग्रंथांत पसेनादि असें नांव वारंवार येतें तो हाच) याजवर टाकून आपण वृद्धपणा ईश्वरचिंतनांत कालक्षेप करण्यास सुरवात केली. हा सासऱ्याचा कित्ता बिंबिसार यानेंही वळविला, आणि आपली वडील राणी विदेहराजदुहिता हिचा पुत्र अजातशत्रु याला यौवराज्याचा अभिषेक करून आपल्या देखरेखी खालीं त्याच्या हातून राज्यकारभार करवूं लागला. पण वडिलांची देखरेख व तिच्या बरोबरच काडक निर्बंध अजातशत्रूला नको होते. त्याला स्वतंत्र सत्ता पाहिजे होती. या साठीं त्यानें बापाला ठार मारलें असें सांगतात कीं, बुद्धाचा आप्त व गुरुद्रोही शिष्य जो देवदत्त त्यानें अजातशत्रूला ही दुष्ट मसलत दिली होती. आपल्या मेहुण्याला ठार मारल्याबद्दल खेद येऊन प्रसेनजित् यानें मगध राजाला आंदण म्हणून दिलेलें काशी नगरीचें उत्पन्न जप्त केलें. त्यावरून अजातशत्रु युद्धास उभा राहिला. या युद्धांत अनेक झटापटी होऊन अजातशत्रु प्रसेनजिताच्या हातीं लागला. पण अजातशत्रूनें दीन वदनानें प्रार्थना केल्यावरून प्रसेनजितानें त्याची सुटका केली, इतकेंच नाहीं तर त्याला आपली मुलगी देऊन काशीनगरीचें जप्त केलेलें उत्पन्न सोडलें. पुढें तीन वर्षांनीं प्रसेनजित् कांहीं कामासाठीं देशा बाहेर गेला असतां मागें त्याचा पुत्र विरु

दाभ यानें बापाच्या विरुद्ध बंड केलें, तेव्हां प्रसेनजिताला आश्रयार्थ आपल्या जावयाकडे (अजातशत्रूकडे) जावें लागलें पण अत्यंत शारीरिक व मानसिक क्लेशामुळे राजगृहाला पोंचण्या पूर्वीच त्याचें प्राणोत्क्रमण झालें. हा प्रसेनजित् फार चांगला राजा होता. लहानपणीं तक्षशिला येथील विश्व-विद्यालयात यानें विद्यार्जन केलें होतें. तेव्हापासून विद्वान् लोकांची संगति त्याला अत्यंत प्रिय असे. याचा स्वभाव नम्र असून बुद्धाचे उपदेश ऐकण्यास तो नेहमीं आतुर असे. यानें आपल्या बहिणींसह बौद्ध धर्माचा स्वीकार केला होता स्वत बौद्धधर्मी स्त्रीशीं विवाह करण्याचें त्याचे मनात फार होतें. म्हणून विवाहास योग्य अशी शाक्य कुळातली राजकुमारी शोधून काढण्याची त्यानें फार खटपट केली, पण शाक्यांचे मनात कोसलाचे वंशात मुलगी देण्याचें नव्हतें 'नाहीं' म्हणावें तर प्रसेनजिताला राग येऊन लढाईचा प्रसंग यावयाचा! तो टाळण्यासाठीं शाक्यराजानें आपली दासी पुत्री-वासवक्षत्रिया-ही राजकुमारी म्हणून त्याला दिली. वर जो विदूदाभ म्हणून प्रसेनजिताचा पुत्र सांगितला तो या वासवक्षत्रियेचाच मुलगा. शाक्य राजानें आपल्या पित्याशीं (प्रसेनजिताशीं) प्रतारणा केली याबद्दल त्याचा सूड घेण्यासाठीं विदूदाभानें कपिल वस्तूवर स्वारी करून तेथील लोकांची निर्दयपणानें अशी कत्तल केली कीं, त्याच्या रथाचे पाट वाहिले. या दुष्ट कृत्याचें फळही त्याला लवकरच मिळालें. त्याच्या वाड्याला एकाएकीं आग लागून तींत तो राजा व त्याचा प्रधान दोघेही जळून मेले या एका गोष्टीवरून तत्कालीन राजकीय स्थितीविषयीं चांगला बोध होतो.

झालेल्या होत्या. पहिली पायरी वैदिककाळाच्या प्रारंभापासूनची. या काळात सृष्टीची केव्हां गंभीर, केव्हा चित्तवृत्तीला उल्हसित करणारी, केव्हा पाहणाऱ्याच्या हृदयात भीतीची धडकी उत्पन्न करणारी, व केव्हा शांत अशीं नानाविधस्वरूपें पाहून आर्यांच्या मनांत आश्चर्य, भीति, स्वत च्या बलाची क्षुद्रता, अदृश्य शक्तीविषयी पूज्यभाव इत्यादि निरनिराळ्या भावना उत्पन्न होऊन धर्मकल्पनेवर सृष्टि-चमत्काराचें आवरण घालण्यात येत असे. आर्यांचा अत्यंत प्राचीन धर्मग्रंथ जो ऋग्वेद त्यात निरनिराळ्या सृष्टि शक्तींना इंद्र, मरुत, वरुण इ० देवतांचीं नावें, व त्याना प्रसन्न करून घेण्याचे मंत्र, प्रार्थना वगैरे गोष्टी दिल्या आहेत भारतीय धर्मकल्पनेची ही अगदीं पहिली पायरी. तथापि या काळींसुद्धा गहन तत्त्वज्ञानाचा उदय कित्येक ऋषींच्याठायीं झालेला होता असें दिसतें कारण, 'सृष्टि हें काय प्रकरण आहे? तिचा निर्माता कोण? हें आकाश, हा मनुष्य-प्राणी, ही पृथ्वी, नद्या, समुद्र वगैरे कोणीं केला? हें सृष्टीचें रहस्य कोण सांगेल? हीं इच्छामात्रें करून निर्मिला गेलीं का त्याच्या उत्पत्तीची अव-श्यकताच होती कोणास ठाऊक? स्वर्गलोकीं वास करणारा, जन्ममृत्युविरहित *अनादि पुराणपुरुषच हें गूढ उकलण्यास समर्थ असेल, आणि तो खरोखर आहे* *कीं नाहीं कोणास ठाऊक!'* अशा अर्थाचे उद्गार वैदिककालीन कवींनीं काढले आहेत.

'एकंहि सत् विप्रा बहुधा वदन्ति'

असें दुसऱ्या एका कवीचें वचन आहे. सगळ्या सृष्टींत एक चैतन्य तत्त्व भरलें असून सृष्टिचमत्कार ही त्याचीं निरनिराळीं स्वरूपें आहेत, असें तत्त्वज्ञान त्या काळींही प्रादुर्भूत होऊं लागलें होतें असें वरील वचनांवरून दिसतें. या तत्त्वज्ञानाचें स्फुलिंग पुढें परिणत होऊन तेजस्वी ब्रह्मज्ञानाच्या रूपानें ब्राह्मण आणि उपनिषद्ग्रंथातून तें चमकूं लागलें भारतीय धर्मविचाराची ही दुसरी पायरी होय. सृष्टिचमत्काराची भिन्नता मावळून चैतन्याची एकता-ब्रह्म हें सगळें चराचर विश्व व्यापून उरलें आहे ही भावना-स्थापित झाली तथापि हें ब्रह्म-ज्ञान अद्याप फक्त विचारातच होतें. त्याचें कृतींत रूपांतर करण्याचें काम ब्राह्मण-धर्मानें हातीं घेतलें. ब्राह्मणधर्मांत प्रथम कर्म शिरलें. मनुष्यमात्र कर्मानें-पूर्व-

जन्मींच्या बऱ्यावाईट कृत्याच्या परिणामानुबंधानें-बद्ध आहे, पूर्वकर्माचें फळ भोगल्यावांचून त्याची सुटका नाहीं, या जन्मातलें सुखदु:ख जसें पूर्वजन्मींच्या बऱ्यावाईट कृत्यावर अवलंबून आहे, त्याप्रमाणें भविष्यजन्माचें सुखदु:ख या जन्मीं हातून घडणाऱ्या बऱ्यावाईट कृत्यावर अवलंबून राहणार आहे, पूर्वसंचिताचा फडशा झाल्यावाचून ब्रह्माशीं जीवाचें तादात्म्य होणार नाहीं म्हणजे पुनर्जन्माचा फेरा चुकणार नाहीं, हें कर्माविषयींच्या मताचें सार आहे याचवरून सृष्टांत व्यवस्था व न्याय आहे असा विश्वास त्याकाळीं दृढमूल झालेला होता, आणि चौऱ्यायशींच्या फेऱ्यातून सुटका करून घेण्यास-मोक्षप्राप्ति करून घेण्यास-ब्रह्माशीं लीन होण्यास-कोणता सुलभ मार्ग सांपडेल त्याविषयींचा शोध त्या काळीं चालला होता असें दिसतें हा मार्ग म्हणजे देवतांना बळी अर्पण करणें, तपश्चर्या, उपासतापास वगैरे गोष्टींनीं देहास कष्टविणें हा होय, अशी याकाळीं समजूत होती. ही भारतीय धर्मविचाराची तिसरी पायरी. या काळांत ब्रह्माच्या मानस पूजेची जागा कर्मनिष्ठपणानें बळकाविली. मंत्र, तंत्र, संस्कार व क्रिया कलाप यांच्या प्रभावानें व खडतर तपश्चर्येनें अदृश्य अशा सिद्धि प्राप्त करून घेता येतात, ग्रह, नक्षत्रें वगैरेंचीं दानें दिल्यानें इष्टाची प्राप्ति व अनिष्ट फलाचा प्रतिकार करतां येतो, स्वप्नें, शकुन वगैरेंची सृष्टि दृश्यमान सृष्टीइतकीच खरी आहे, व मनुष्याला पुढच्या जन्मीं सुस्थिति प्राप्त होण्यास त्यानें नानात हेचीं अनुष्ठानें, उपासतापास व व्रतें उद्यापनें करून आणि ब्राह्मणांना दानें देऊन पुण्यसंचय केला पाहिजे, अशा प्रकारच्या समजुती क्रमानें रूढ होऊन बसल्या. मूळ मंत्राच्या अर्थाशीं आपल्यास कर्तव्य नाहीं, कर्मानुष्ठान हातून घडलें किंवा ब्राह्मण द्वारा तें करविलें म्हणजे धर्माचरणाचें पुण्य लागतें, अशी हळू हळू सामान्य जनसमूहाची समजूत होऊन बसली. धर्माचा खरा अर्थ पार लोपून क्रियाकर्मांतरानीं त्याची जागा बळकाविली. पूर्वीच्या उत्कृष्ट सामाजिक आणि नैतिक नियमांना फाटा मिळून समाजव्यवस्थेंत भेद उत्पन्न करणारे ब्राह्मणांचे विशेष हक्क आणि शूद्रांना लांछनास्पद स्थितीला नेऊन सोडणारे नियम पुढें आले. जाति भेदाचे कडक निर्बंध अमलांत असल्यामुळें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र यांचे वर्तनांत. प्रत्यक्ष द्वेष नसला तरी सख्याचा पूर्ण

अभाव दिसूं लागला वेदावरून मूळच्या आर्य लोकांच्या धर्मविचाराची व आचाराची जी उच्च कल्पना आपणास करता येते तिची छाया सुद्धा या काळच्या धर्मांत–प्रत्यक्ष आचरल्या जाणाऱ्या धर्मांत–दिसेनाशी झाली

खऱ्या कळकळीच्या जिज्ञासूस हा प्रकार पाहून चमत्कार वाटत असे शाक्य गौतम हाही लहानपणीं अशाच धर्मविचारात वाढलेला होता, पण त्याची जिज्ञासा प्रबळ होती धर्म म्हणजे काय? या प्रश्नाचा तात्त्विक व व्यावहारिक दोन्ही दृष्टींनी विचार करून पाहतां तात्त्विक धर्म व्यावहारिक धर्माहून अगदीं वेगळा आहे, किंबहुना धर्माचरणाच्या नावाखालीं चाललेल्या पुष्कळ गोष्टी धर्मतत्त्वाला अगदीं विरुद्ध आहेत, मनुष्यामनुष्यात जन्मत च अमुक श्रेष्ठ व कनिष्ठ, अमक्याला विद्येचा अधिकार व तमक्याला नाहीं, असल्या प्रकारची भेददृष्टी उत्पन्न झाली आहे, धर्माच्या नावाखाला दिवसाढवळ्या घोर अधर्म घडत आहे, खरीं धर्मतत्त्वें बाजूला राहून क्रियाकर्मांतरावेंच बड फार माजलेलं आहे, खऱ्या सदाचरणाला व निष्पाप विचाराना काहीं किंमत राहिलली नाहीं, असें त्याला आढळून आलें तेव्हा त्याचें अंत करण पिळवटलें आणि सदाचरण व परोपकार, मनुष्यामनुष्यांत समता आणि दुष्ट वासनांचा निरोध, विश्वमैत्री आणि शांतता यांच्या पायावर त्यानें आपल्या धर्माची इमारत उभारली त्याच्या दृष्टीनें ब्राह्मण आणि शूद्र, स्त्री व पुरुष, सर्वांची योग्यता सारखी, सगळे मोक्ष प्राप्तीला सारखे पात्र होते त्याच्या धर्माचा हा उदारपणा लोकाना पटून थोडक्या अवधींत लक्षावधि लोक बौद्धधर्माच्या निशाणाखालीं आले यात आश्चर्य नाहीं

बुद्धानें ब्राह्मणधर्मांतली कर्माची कल्पना जशीची तशीच घेतली फरक येवढाच केला का पुनर्जन्मापासून मुक्तता करून घेण्यास यज्ञयाग, उपासतापास, वगैरे बाह्यसाधनें जीं ब्राह्मणधर्मानें स्वीकारलीं होतीं त्यांचा निषेध करून मनुष्यानें स्वत:च्या प्रयत्नानं स्वत:ची आध्यात्मिक उन्नति करून घ्यावी–निर्वाणप्राप्ति करावी–असें विचाराअंतीं ठरवून तसा उपदेश केला यज्ञयाग नकोत, उपाध्ये नकोत, फार काय, पण ईश्वराविषयींची श्रद्धासुद्धां अवश्य नाहीं, फक्त आचरणाची पवित्रता–खरें खरें शील–पाहिजे, म्हणजे त्याच्या जोरावर त्याला

नानाप्रकारचे योगाभ्यास, ध्यान धारणा, आसनें, व शारीरिक क्लेशाचे प्रकार याचे पद्धतशीर शास्त्रच त्यानीं बनविलें होतें. हे दुसऱ्याला उपदेश करण्याला जात नसत, परंतु कोणी भाविक शिष्यत्व करण्यास आल्यास त्याला आपल्या तापसी मार्गात प्रविष्ट करीत. याचेविषयीं सामान्य लोकाचे मनात अतिशय पूज्य बुद्धि असे खुद्द गौतम बुद्धानें महाभिनिष्क्रमण (गृहत्याग) केल्यावर रामपुत्र उद्रक याच्या उपदेशानें अशा प्रकारची घोर तपश्चर्या करून पाहिल्या नतर तिची निरर्थकना त्याच्या ध्यानात कशी आली ती मनोरजक कथा पुढें एका प्रकरणात देण्यात येईल

**तत्वज्ञानविषयक स्थिति** —आपल्या भरतखडात धर्म आणि तत्त्व ज्ञान हीं इतकीं सबद्ध झालेलीं आहेत कीं, तीं वेगवेगळीं करून प्रत्यकाची *प्रगति अमक्या एका काळीं किती मर्यादेपर्यंत झाली होती तें निश्चयानें सागणें* बरेंच कठीण आहे तथापि काहीं पथात त्याचा निराळेपणा दाखविता आला नाहीं तरी दुसऱ्या काही पथातून तो अगदीं स्पष्ट दिसून येत असल्यामुळें बुद्धाच्या कालाच्या सुमारास तत्त्वज्ञानविषयक स्थिति कशी होती हें थोडक्यांत सागण्याची अवश्यकता आहे वर सागितलेंच आहे कीं, वैदिक कालीं सृष्टीच्या भिन्न भिन्न स्वरूपावरून त्या त्या स्वरूपात अधिष्ठित अशी एकेक देवता मानण्यात आली, पण पुढें उपनिषदकाळीं त्या देवतांचें भिन्नत्व जाऊन एकेश्वरीमत स्थापित झालें सर्व सृष्टींत एकच चैतन्यतत्व भरलें आहे, हें मत बुद्धाच्या काळीं बरेंच प्रचलित होतें पुढें श्रीशकराचार्यांनीं या मताला व्यवस्थित स्वरूप देऊन अद्वैत सिद्धात या नावाखालीं त्याचा प्रचार केला पण ही गोष्ट पुढें अनेक शतकानीं झाली बुद्धाच्या काळीं अद्वैतमत केवळ बीज-रूपान होतें या मताला त्या काळीं अनेक प्रतिस्पर्धी होते पचरात्र मता-वरील ग्रथ हल्लीं फारसे उपलब्ध नाहींत; पण हें मत त्यावेळीं बरेंच प्रचलित असावें असें वाटतें त्याचप्रमाणें बौद्ध ग्रथातून लोकामताविषयीं अनेक उल्लेख आहेत यावरून तेंही मत त्या काळीं प्रचलित असेल अस म्हणण्यास प्र यवाय नाहीं. जैन धर्म बौद्धधर्मापेक्षां प्राचीन आहे, हा गोष्ट निर्विवाद आहे. अर्थात जैन तत्त्वज्ञानही त्या काळीं थोड्या फार अशानें प्रचलित असलें पाहिजे.

मतें हा आत्मा कांहीं व्यक्तींच्या ठायीं जास्त पूर्णावस्थेंत असतो, आणि म्हणून ते देवतेचा मान पावतात (३) अद्वैत मत–सृष्टींत सर्वत्र एक चैतन्य तत्त्व भरलें आहे असें मत (४) सृष्टीला आदिकारण कोणी नाहीं, पण आत्म्याचें मात्र अस्तित्व आहे (५) सृष्टीला आदिकारण कोणी नाही, ती स्वयंभू आहे, आणि आत्माही नाही हीं मुख्य मुख्य मतें व त्यापासून झालेलीं असंख्य मिश्र मतें यांना बौद्धकालीन बुद्धिविषयक वातावरण इतकें गजबजून गेलें होतें कीं, काण-तेंही एक ठाम मत त्या कालीं सर्वसंमत होणें अशक्य होतें कोणतेंही एक मत त्याकाळच्या बहुसमाजाकडून स्वीकारलें जाण्याला लोकोत्तर बुद्धीच्या व खंबीर मनाच्या पुरुषाचा अवतार होण्याची अवश्यकता होती म्हणूनच याकाळीं शाक्य सिद्धार्थ गौतम याचा जन्म झाला

**सांपत्तिक स्थिति** —त्या वेळीं हल्लींच्या मानानें लोकसंख्या थोडी व जमिनी मुबलक असल्यामुळे बहुतेक लोक स्वतःच्या जमिनींत शेतकी करून राहात असत शेतीचे उत्पन्नाचा दहावा हिस्सा सरकाराला सारा म्हणून दिल्या-वर ते लोक अगदीं निर्भय असत काहीं जमिनी सरदारांना, सरकारी कामदारांना किंवा पुरोहितांना इनाम म्हणून दिलेल्या असत, पण या इनामाचा अर्थ इतकाच असे का, त्या जमीनीच्या साऱ्याचें उत्पन्न तेवढें त्यांनीं खावें, त्या जमीनीचा वहिवाट करणारे शेतकरी निराळेच असत बहुधा शेतकरी स्वतःची जमीन वहिवाटीत असे मजूरीचे पैसे घेऊन दुसऱ्याचें काम करण्यास लोक रिकामे नसत स्वतःच्या निर्वाहापुरतें उत्पन्न जमीनींतून काढल्यामुळें जशी कोणाजवळ श्रीमंती दिसत नसे, तशी अन्नाचीही पण ददात नसे शेतीशिवाय इतर धंदे करणारे लोक थोडेच असत मोठाले कारखाने बहुधा नसतच ज्यानें त्यानें आपल्या स्वतःच्यापुरता व कुटुंबापुरता एखादा लहानसा धंदा पतकरून आनंदांत राहावें असा बहुधा प्रकार असे श्रीमंतीची लोकांना हावही नव्हती, व तिच्या बरोबर येणाऱ्या अपायकारक चैनीच्या सवयीपासून ते मुक्त होते साधी राहणी त्यांचे अंगवळणीं पडली होती, यामुळे बौद्ध धर्माचे प्रसारास एक प्रकारें मदत झाली त्याग हें बौद्ध धर्माचें एक तत्त्व आहे तो त्याग करण्यास आणि संन्यास वृत्तीनें सुधात

राहून धर्म-प्रचार करण्यास हजारों स्त्रिया व पुरुष कसे प्रवृत्त होत होते, या गोष्टीचें चैनीच्या संवयी अंगीं जडलेल्या पाश्चात्य ग्रंथकाराना आश्चर्य वाटतें. परंतु साध्या राहणीची ही मूळची संवय तिच्या मुळाशीं आहे हें त्याच्या लक्षात येत नाहीं.

---

# प्रकरण सातवें.

## गौतम बुद्ध.

बुद्धाच्या मागील कित्येक जन्माची हकीकत मागच्या एका प्रकरणात दिली आहे या जन्मीं त्याचें नाव सिद्धार्थ गौतम असें *होतें, व तो पित्याच्या बाजूनें शाक्य वंशात आणि मातेच्या बाजूने कोलिय वंशात जन्मास आला होता म्हणून या दोन्ही वंशांची थोडीशी माहिती येथे देणें अवश्य आहे

महावस्तु नामक ग्रंथात शाक्य वंशाच्या उत्पत्तीविषयीं पुढील चमत्कारिक वृत्तात आढळतो --

सम्मत नावाचा एक राजा होता त्याचा पुत्र कल्याण, त्याचा पुत्र रव, रवाचा पुत्र उपोषथ व उपोषथाचा पुत्र मान्धाता या मान्धात्याच्या पुत्रपौत्रादिकानीं हजारों वर्षें पर्यंत राज्य केलें

---

* बौद्ध ग्रंथातून बुद्धाचीं दुसरीही पुष्कळ नावें आढळतात तीं त्याच्या कुळावरून, अंगच्या गुणावरून, किंवा त्याच्या विषयींच्या लोकाच्या मनातील ग्रहावरून पडलेलीं दिसतात. उदाहरणार्थ, शाक्यसिंह [ शाक्यकुळातील उत्तम पुरुष ], शाक्यमुनि [ शाक्यवंशातील थोर व विचारी पुरुष ], सुगत [ सुखी ], सर्वज्ञ [ सर्व जाणणारा ], शास्ता [ गुरु ], जिन [ जिंकणारा ], भगवा [ भगवान् अथवा पुण्यशील ], लोकनाथ [ लोकाचा पालनकर्ता ], धर्मराज [ धर्मशीलात मुख्य ], बोधिसत्त्व [ भावी बुद्ध ], तथागत [ त्या पदवीला पोहोंचलेला. ], इत्यादि.

इकडे पश्चिम साकेत[1] नामक महानगरांत सुजात नावाचा इक्ष्वाकु कुलोत्तला राजा राज्य करीत होता. त्याला ओपुर, निपुर, करकपुरु, उल्कामुख, व हस्तिकशीर्षक नावाचे पाच पुत्र व शुद्धा, विमला, वजिता, जला व जली अशा पाच कन्या होत्या.

राजा सुजात याचें मन जेन्ती नावाच्या एका विलासिनीवर बसलें होतें, आणि तिच्या पासून त्याला जेन्त नावाचा एक पुत्र झाला होता एकदा राजा प्रसन्नचित्त असता तिनें वर मागून घेतला तो असा कीं, त्यानें आपल्या पांचही औरस पुत्रास व कन्यास राज्याबाहेर घालवून जेन्ताला युवराजपद द्यावें. हा वर देण्याचें राजाच्या अतिशय जिवावर आलें, पण तोंडातून गेलेला शब्द खरा करावयास पाहिजे म्हणून अतिशय कष्टी होऊन त्यानें आपल्या पाच पुत्रांस हद्दपार केलें. हे पाचही राजकुमार आपल्या गुणाना प्रजेला अत्यंत प्रिय झाले होते. *त्यामुळ राजकुमार वनवासाला जाण्याला निघाले तेव्हा आता* राजधानींत राहण्यात काहीं अर्थ उरला नाहीं असा विचार करून तेही त्यांच्याबरोबर गृहत्याग करून निघाले जाता जाता उत्तरेस काशी कोसल येथें आले तेथील राजानें प्रथम त्याना आदरपूर्वक आग्रहानें ठेवून घेतलें. तेथील प्रजेलाही ते प्रिय होऊं लागले तेव्हा राजाला भीति वाटून त्यानें युक्तीनें त्यांची तेथून दुसरीकडे बोळवण केली तेथून ते उत्तरेस हिमालय पर्वताचे पायथ्याशीं शाकोट वनात कपिलऋषींच्या आश्रमापाशीं येऊन राहिले. तेथें

---

१ साकेत हें अयोध्येच दुसरें नांव होतें याविषयीं पुढाल आधार सापडतो "There can be no doubt of the identity of this place with Ayodhya, *the capital of Kosala* under the name of Saketa or Sageda Sakyamuni spent the best days of his life in this city and during his sojourn the ancient name of Ayodhya gave place to that of Saketa, the only one current. Hindu lexicographers give Saketa and *Kosala as synonyms* of Ayodhya" [ Mc Crindle's Ptolemy P 228 229 See also Cunningham's Geography of Ancient India P *401* ]

राहून धर्म-प्रचार करण्यास हजारों स्त्रिया व पुरुष कसे प्रवृत्त होत होते, या गोष्टीचें चैनीच्या संवयी अंगीं जडलेल्या पाश्चात्य ग्रंथकारांना आश्चर्य वाटतें. परंतु साध्या राहणीची ही मूळची संवय तिच्या मुळाशीं आहे हें त्यांच्या लक्षांत येत नाहीं.

---

# प्रकरण सातवें.

## गौतम बुद्ध.

बुद्धाच्या मागील कित्येक जन्मांची हकीकत मागच्या एका प्रकरणांत दिली आहे. या जन्मीं त्याचें नांव सिद्धार्थ गौतम असें व्होतें, व तो पित्याच्या बाजूनें शाक्य वंशांत आणि मातेच्या बाजूनें कोलिय वंशांत जन्मास आला होता. म्हणून या दोन्ही वंशांची थोडीशी माहिती येथें देणें अवश्य आहे.

महावस्तु नामक ग्रंथांत शाक्य वंशाच्या उत्पत्तीविषयीं पुढील चमत्कारिक वृत्तांत आढळतो.--

संमत नांवाचा एक राजा होता. त्याचा पुत्र कल्याण, त्याचा पुत्र रव, रवाचा पुत्र उपोषध व उपोषधाचा पुत्र मान्धाता. या मान्धात्याच्या पुत्रपौत्रादिकांनी हजारों वर्षे पर्यंत राज्य केलें.

राजाला अत्यानंद झाला व त्यानीं त्या ऋषिकुमारांना यथेच्छ धन देऊन अन्या वशांतील कुमारींशीं त्यांचे विवाह करून दिले याप्रमाणे कोल ऋषीपासून जो वंश झाला त्याला कोलिय असें नांव पडलें या कोलिय वंशात सुभूति नावाचा राजा झाला त्याला पांच मुली होत्या पैकीं माया व महाप्रजावती या दोघांचा विवाह शाक्य वंशातल्या शुद्धोदन राजाशीं होऊन मायेच्या पोटी गौतम बुद्ध जन्मास आला

सुप्रसिद्ध काश्मिरी बौद्ध कवि क्षेमेंद्र यानें आपल्या अवदान कल्पलता नामक ग्रंथात शाक्यांच्या उत्पत्तीसंबधानें दिलेली कथा वर दिलेल्या कथेशीं बहुतेक जुळते मात्र राजा सुजात याच्या जागा विरुढक असें नांव पाहिजे, आणि 'भावाबहिणींचा विवाहसंबंध घडणें शक्य आहे काय ?' या प्रश्नाऐवजीं 'माझे मुलगे स्वतंत्र राज्य स्थापून राहिले आहेत, त्यांना परत आणणें शक्य आहे काय ?' असा प्रश्न पाहिजे

सिंहलद्वीपांतल्या महावंस नावाच्या सुप्रसिद्ध इतिहासग्रंथात 'शाक्य' नांवाच्या व्युत्पत्तीची कथा दिलेली नाही तथापि त्या वंशांतल्या जयसेन राजानें कपिलवस्तु येथे राज्य केलें, व त्याचा मुलगा सिंहहनु आणि मुलगी यशोधरा हीं होतीं, या सिंहहनूचा विवाह शाक्यराज देवदह याची कन्या कांचना हिच्याशीं आणि कांचनेचा भाऊ अंजन याचा विवाह यशोधरेशीं झाला होता व या अंजनाच्या दोन मुली माया आणि महाप्रजावती या होत्या असें म्हटलें आहे

कोलिय वंशाच्या उत्पत्तीसंबधानें महावस्तु ग्रंथांतून जी माहिती वर दिली आहे तिला पुष्टि देणारी अशी माहिती ललितविस्तर वगैरे ग्रंथांतून मिळत

१ या नांवाच्या व्युत्पत्तिसंबधानें बरीच भिन्न मतें आहेत कित्येक विद्वान् ग्रंथकारांचें असें म्हणणें आहे की, हे कोलिय मूळचे या देशातले नव्हतच कोलि नावाचा प्रदेश कपिलवस्तु नगराच्या जवळच आहे तेथें जाऊन राहिलेले लोक तेच कोलिय कित्येकांच्या मतें कोलि प्रदेश म्हणजे मलबार किनाऱ्यावरील हल्लींचा दक्षिण प्रांत व कित्येकांच्या मतें तो मध्यावा बेटात आहे

'शाक्य' या नावाच्या व्युत्पत्तीसंबधानें बौद्धग्रथकारांचें मत वर दिलेंच आहे किंग्येशचें असें म्हणणें आहे की, शक अथवा सीथियन या पासूनच 'शाक्य' हें नाव निघालें हे शक अथवा सीथियन मूळचे अनार्य असता पुष्कळ दिवसाच्या साहचर्यानंतर ते आर्यांत मिसळले. खिस्ती शकाच्या दुसऱ्या शतकांत ग्रीक लोकानीं लिहिलेल्या भूगोलग्रथात त्यावेळा एशिया खंडाच्या मध्य व पश्चिम भागीं (हिंदुस्थानाच्या सरहद्दीवर) राहत असलेल्या जातींची पुढील नांवें दिलीं आहेत-Hyrkania, Margiane, Bactriane, Sakai, Skythia, Paropamisadai, Drangiane, Gedrosia वगैरे. यापैकीं कांहीं लोक हिंदुस्थानांत येऊन आर्यांत मिसळले व त्यानां शिशुनाग, मौर्य, कुशान, शाक्य इ० वंश स्थापिले पण हे मूळचे सीथियन ऊर्फ शकच होत असें पुष्कळ विद्वान् शोधकाचें मत आहे.

शाक्य कुळात सिद्धार्थ गौतम याचा जन्म खिस्ती शका पूर्वी ६२३ व्या वर्षी झाला याच्या बापाचें नाव शुद्धोदन व आईचे नाव मायादेवी होतें. गौतमाचें चरित्र अनेक ग्रथातून विस्तारानें वर्णिलेलें आढळतें. तथापि त्या ग्रथांतून काही भिन्न कथा आढळतात म्हणून ठळक ठळक गोष्टी संबंधानें भिन्न भिन्न ग्रंथकारांच काय म्हणणें आहे तें थोडक्यात सागतो.

महावंसो ग्रथात बुद्धचरित्र वर्णिलें आहे तें असें —

सिद्धार्थ (शाक्य गौतम) हा आपल्या वयाच्या एकुणतिसाव्या वर्षी बुद्धत्व प्राप्ति करून घेण्यासाठी गृहत्याग करून गेला, आणि ज्ञानसंपादन करून पसतिसाव्या वर्षी त्यानें बुद्धत्वाची प्राप्ती करून घेतली. नंतर तो मगधराज बिंबिसार याच्याकडे गेला. हा राजा त्याच्या भाऊबंदातला असून वयानेंही बरोबरी त्याच्या इतकाच (गौतमापेक्षां पाचच वर्षांनी लहान) होता या राजाचा

व सिद्धार्थाची अगदी लहानपणापासून दृढ मैत्री होती हा बिंबिसार त्याच्या वयाच्या ६७ व्या वर्षी त्याचाच पुत्र अजातशत्रु याच्या हस्तें मरण पावला अजातशत्रु गादीवर बसल्यापासून आठ वर्षांनी म्हणजे आपल्या वयाच्या ८० व्या वर्षी सिद्धार्थ अथवा गौतमबुद्ध निर्वाणाप्रत गेला

सिद्धार्थानें २९ व्या वर्षी गृहत्याग केला म्हणून वर सांगितलच आहे हा त्याग केल्यानंतर त्यानें सहा वर्षे ध्यान, समाधी वगैरे तपाचरणांत घालविला सहाव्या वर्षी मगध राज्यात उरुवेल नामक एका स्थळी बोधिवृक्षाखाली वैशाख शुद्ध १५ रोजी त्याला बुद्धत्वाची प्राप्ति झाली ती झाल्यानंतर सात आठवडे पर्यंत तेथेंच राहून मग तो वाराणसी येथें गेला त्या ठिकाणी त्याला साठ शिष्य मिळाले नंतर महाकाश्यप नावाच्या एका सुप्रसिद्ध पडिताला त्यानें आपल्या धर्माची दीक्षा दिल्यावर तो मगध देशाला परत गेला तेथून तो पुढें लकाद्वा पाला व अन्य देशाला गेला जय जयें ता जाइ तेथें तेथें सहस्त्रावधि लोक त्याचे शिष्य होत या प्रमाणें बौद्ध धर्माचा प्रचार करीत तो पन्नास वर्षे हिंडला आपल्या वयाच्या ८० व्या वर्षी म्हणन खि० श० पू० ५४३ व्या वर्षी वैशाख शुद्ध १५ रोजीं कुशी नगरात एका शालवृक्षाखालीं तो निर्वाणाप्रत गेला

जातक नामक पालिग्रथांत म्हटलें आहे की, सिद्धार्थाचा ज म कपिल वस्तु व दवदह या दोन नगरांच्या मध्यें असलल्या लुंबिनी नांवाच्या वनांत झाला आषाढ शु० १५ रोजीं गृहत्याग करून अनोमा नदीच्या तारीं एका आंबराईत एक मद्दिनाभर त्यानें मुक्काम केला नतर तेथून पन्नास कास चालून जाऊन राजगृह नावाच्या नगराला आला याठिकाणी रुद्रक नावाच्या गुरूपाशी कांहीं दिवस शिष्यत्व केल्यावर तो नैरजना ( सध्या हिला फल्गु म्हणतात ही नदी गयपाशीं आहे ) नदाचे कांठीं जाऊन राहिला या ठिकाणीं बोधि नामक वृक्षाखाली ६ वर्षेपर्यंत त्यानें तपश्चर्या केली सहाव्या वर्षाच अखेरीस माराशीं त्याचें घोर युद्ध झालें व त्यांत त्यानें माराचा पराजय केला त्याच रात्रीं त्याला पूर्वीच्या जन्माचें स्मरण होऊन दिव्य दृष्टी प्राप्त झाली उत्तर रात्रा या ससारांतील कार्यकारणभावासबधीं विचार करतां करतां प्रतीत्यसमुत्पादाच तत्त्व त्याला सांपडल

महावग्ग नामक पालिग्रंथांत जवळ जवळ अशीच कथा दिलेली आहे.

अश्वघोषरचित बुद्धचरित्रांत बुद्धाची कथा विस्तारानें वर्णिली आहे. ललितविस्तर ग्रंथांत व बुद्धचरितग्रंथांत विशेषसा भेद नाहीं. बुद्धचरिताच्या बाराव्या सर्गाचें नांव अराडदर्शन असें आहे. अराड नांवाचा एक ब्राह्मण पंडित राजगृह नगरांत होता. त्याच्याशीं सिद्धार्थाची जी भेट झाली तिचें वर्णन या सर्गांत केलें आहे. सिद्धार्थानें अराडाचें शिष्यत्व पतकरून त्याला प्रश्न केला कीं, जरा, मरण, दुःख इत्यादिकांपासून मुक्ति मिळण्याला कोणता मार्ग आहे? त्यानें उत्तर केलें कीं प्रकृति आणि विकार यांच्यांतल्या भेदाचें ज्ञान झालें पाहिजे. बुद्धि, अहंकार, पंचभूतें, विषय, इंद्रियें हे प्रकृतीचे विकार आहेत. ह्या प्रकृतीचें ज्ञान ज्याला होतें तो क्षेत्रज्ञ अथवा आत्मा होय. अज्ञान, कर्म व तृष्णा यांनीं संसारांतले सगळे लोक बद्ध आहेत. प्रकृतीपासून भिन्न, अहंकार-शून्य व निर्गुण अशा आत्म्याचें ज्ञान ज्यानें करून घेतलें तो जरामरणादि दुःखापासून मुक्त झाला असें समजावें.

बुद्धचरित काव्याच्या १४ व्या सर्गांत बुद्धत्व प्राप्तीची कथा विस्तारानें वर्णिली आहे. तींत म्हटलें आहे कीं, बुद्धत्व प्राप्तीच्या रात्रीं दुसऱ्या प्रहरानंतर दिव्य दृष्टी प्राप्त झाल्यावर सिद्धार्थ विश्वाच्या गूढाकडे पाहूं लागला. तेव्हां त्याला दिसून आलें कीं, प्राण्याला सत्कर्मानें ऊर्ध्वगति व असत्कर्मामुळें अधोगति मिळते. कर्माचें फळ विचित्र आहे. जरा-मरणादि दुःखभोगाचें कारण जन्म हें आहे. उपादान व आसक्ति हीं नसतील तर भवाची उत्पत्ति होणार नाहीं. तृष्णा ही उपादान व आसक्ति यांच्या मुळाशीं आहे. सुख, दुःख व अदुःखासुख ही त्रिविध वेदनाच तृष्णेचें कारण आहे, आणि इंद्रियांशीं विषयांचा संबंध हें त्या वेदनेचें मूळ आहे. चक्षु, कर्ण इ० षडायतन व रूपरस इ० विषय हे त्या संबंधाला कारण, त्याला पुनः संस्कार-समूह कारण, अशा रीतीनें कारणांची परंपरा लावतां लावतां प्रतीत्य-समुत्पादाचा शोध लागला. या प्रतीत्य-समुत्पादाची विस्तृत माहिती पुढें एका स्वतंत्र प्रकरणांत दिली आहे.

बुद्धत्व प्राप्तीनंतर सिद्धार्थाला बुद्ध हें नांव मिळालें. यानें ज्या धर्माचा प्रचार केला त्याचें नांव बुद्धचरितकाव्यकर्त्याच्या मतें महायान हें आहे. त्याच्या मतें

निवाण प्राप्तीचा हा उत्कृष्ट उपाय बुद्धाला सापडला निवाण शिखराला जाण्याला लागणारीं चार आयप्रमेयें व अष्टांगिक माग याच्या सोपानाचाही शोध लव करच लागला हीं चार आयप्रमेयें म्हणज दु ख, त्याची उत्पत्ति त्याचा नाश व ता नाश करण्याचा मार्ग हा होत सम्यक् दृष्टी, सम्यक सकल्प सम्यक् वाक् सम्यक् कमान्त सम्यक आजीव सम्यक् व्य याम, सम्यक स्मृति व सम्यक् समाधि मिळून अष्टाग माग होतो

शाक-नि-रोकु नावाच्या जपानी ग्रथ त बुद्धचरित या.ल आह त्यांत विश्वास न बसण्यासारख्या अलौकिक गाष्टी अनेक आहत त्या वगळल्या तर बाकीच्या गाष्टा ललितविस्तर ग्रथातल्या कथेशा जुळतात

सिद्धार्थाची सावत्र आइ र मावशी महाप्रजावता गौतमा इच्या सब धाचा एक विचित्र कथा या ग्रथात दिलेली आह तिला कितपत आधार आह तें सागता यत नाहा ता कथा अशी का सिद्धाथ गौतम याचा आइ माया-देवा हिला गभ राहिला तेव्हा तिची बहाण व सवत गौतमी हिला मत्सर वाटला व त्या गर्भाचा नाश करण्याच तिन कियेक उपाय कल पण ते व्यथ गलले पाहून शेवटी तिला पश्चात्ताप झाला सिद्धार्थाच्या ज मानतर सातव्याच दिवशीं मायादवी मरण पावली तव्हा गौतमीन आपल्या स इणीच्या पुत्राच प्रमपूर्वक पालन क रु बुद्धाच्या बालपणची, एक कथा या ग्रथात दिला आह ती अशा सिद्धाथ गौतम लहानपणापासूनच पशु हिंसचा निषध कर त अस त्याचा आतभाऊ व मेव्हणा दवदत्त शिकार करी तव्हा सिद्धाथ याला हिंसपासून पराङ्मुख करण्याचा यत्न करी एकदा सिद्धाथ व दवदत्त ह उप वनांत क्रीडा करीत असतां एक हरीण पाहून दवदत्तान याच्यावर बाण टाकिला तो बाण लागून त हरीण वि हळ होऊन पडलें त्याबरोबर सिद्धार्थाच मन कळवळल आणि त्यान धावत जाऊन त्या हरिणाला उचलून पाटाशा धरिल दवदत्त आपला शिकार मागू लागला सिद्धाथ त्या हरिणाला त्याच हाता दइना दवदत्त तिच्यावर आपला हक्क सागू लागला तव्हा सिद्धाथ शांतपणान त्याला म्हणाला 'बाबार तू क्रूरपणान याचा जीव घेण्यास पाहतास त्या तुझा यावरचा हक्क अधिक का मी याचा जीव वाचवू पाहतों त्याचा माझा हक्क अधिक,

याचा तूं आपल्या मनाशीं नीट विचार कर.' बुद्धाच्या दहा प्रमुख शिष्यांचीं नांवें या जपानी ग्रंथात दिलीं आहेत तीं अशीं –काश्यप, आनंद, सारिपुत्र मौद्गलायन, अनिरुद्ध, सुभूति, पूर्ण, कात्यायन, उपालि व राहुल.

ग-छेल-रोल-प नावाच्या तिबेटी भाषेंतल्या ग्रंथातही बुद्धाच्या चारित्राची पुष्कळ माहिती सांपडते. या ग्रंथात म्हटलें आहे कीं माराचर मिळविलेल्या विजयामुळें सिद्धार्थ गौतमाला 'अर्हत्' हें नाव मिळालें. अर्हत् हा शब्द 'अरिहन्' (म्हणजे शत्रुविजयी) या शब्दापासून झालेला आहे. तिबेटी भाषेंताल ग्रंथकाराच्या मतें गौतम बुद्धाचा जन्म खि. श. पू ५१४ या वर्षी झाला.

'फो-पान-शिन-रसी-शिन' नामक चिनी ग्रंथात व 'महावग्ग' नामक ब्रह्मी ग्रंथातही बुद्धाच्या चरित्रातल्या अनेक कथा दिल्या आहेत. पण त्या ललितविस्तर ग्रंथातल्या सारख्याच आहेत. प्रसिद्ध चिनी प्रवासी हु-एन –त्संग व दुसरे चिनी ग्रंथकार गौतम बुद्धाचा जन्म खि० श० पू० ८५० ह्या वर्षी झाला असावा असें ह्मणतात.

ललित-विस्तर नामक संस्कृत ग्रंथात बुद्धाचें चरित्र बरेंच विस्तारानें वर्णिलें आहे, पण त्यातलीं वर्णनें पुराणाच्या थाटावर अतिशयोक्ति, अलौकिक चमत्कार, व कल्पनेचें उड्डाण यांनीं इतकीं दूषित आहेत कीं, त्यातल्या कोणत्या गोष्टी विश्वसनीय व ग्राह्य मानाव्या, आणि कोणत्या 'स्वकपोल कल्पित' व त्याज्य समजाव्या हें ठरविणें फार मुष्किलीचें आहे. तथापि या ग्रंथात कशा प्रकारची माहिती आहे त्याविषयींची काहां कल्पना वाचकांना करता यावी म्हणून बुद्धाच्या चरित्रासंबधाची त्यातली माहिती संक्षेपानें पुढें देतों —

बुद्धाचा जन्म होण्यापूर्वी भगवान् बोधिसत्व हे तुषित नामक नामक स्वर्गातल्या धर्मोच्चय नावाच्या महान् प्रासादात बसले असता जगाच्या उद्धारार्थ अवतार घेण्याचा त्याचा निश्चय ठरला, आणि चालू कल्पाच्या प्रारंभाला अवतार घ्यावा कीं शेवटीं घ्यावा, ब्रह्मदेशात, पूर्व विदेह प्रांतात, उत्तर कुरूंत किंवा अन्य प्रांतात तो घ्यावा, उच्च ब्राह्मण कुलात उत्पन्न व्हावें कीं क्षत्रिय कुळांत व्हावें वगैरे गोष्टींचा विचार करून शेवटीं कपिलवस्तु नगरींत शाक्य कुलांत जन्म

घेण्याचा त्यानीं निश्चय केला, माया देवीला साक्षात्कार झाले, फल–ज्योतिषशर्नीं मायादेवीच्या पोटीं अवतारी पुरुष जन्माला येणार असें सांगितलें. दशमास पूर्ण होताच त्या प्रमाणें घडून आलें सिद्धार्थाच्या शरीरावर महापुरुषाचीं बत्तीस मुख्य लक्षणें व ८० उपलक्षणें स्पष्ट होता सिद्धार्थ आठ वर्षांचा झाल्या वर विश्वामित्र नावाच्या पुरोहिताच्या घरी विद्या शिकण्यासाठीं राहिला, आणि अल्पकाळातच ब्राह्मी, खरोष्टी, पुष्कर, सारी, अंग, वश, मागधी, शकारी, ब्रह्मवल्ली, अनुलोम, अर्धधनु, इ० ६४ चौसष्ट प्रकारच्या लिपि शिकला. सिद्धार्थ आपल्या सोबत्याबरोबर वनात गेला असता तेथें वनदेवता त्याचें दिव्य दैवी तेज पाहून त्याची स्तुति करू लागल्या पुढें सिद्धार्थाचा विवाह करण्याचा त्याच्या बापानें विचार ठरविला, तेव्हा ब्राह्मणाना त्याची पत्रिका पाहून सांगितलें कीं, हा मुलगा ससारात राहिला तर चक्रवर्ती होईल आणि विरक्त झाला तर जगाचा उद्धारकर्ता होईल सिद्धार्थ लवकर वेदवदागें, धर्मशास्त्रें, वगैरे हरएक विषेत प्रवीण झाला, इतकेंच नाहीं तर 'अ' हें अक्षर शिकत असतानाच 'अ' ने प्रारंभित अशा ' अनित्य सर्वससार ' या उक्तीचें मर्म त्याच्या हृदयात बिंबलें, व तेव्हा पासूनच वैराग्याचीं चिन्हें त्याच्या वर्तनात दिसू लागलीं ससार नि सार आहे हा विचार सदोदित त्याच्या डोक्यात घोळू लागला जगात सगळेंच काहीं विनाशी आहे, कल्पातीं अग्नि सर्वांना दग्ध करून टाकणार आहे, कुभात अडकून राहिलेला भ्रमर ज्या प्रमाणें आतल्या आत गरगर भ्रमण करतो, त्या प्रमाणें यच्चयावत् जीव या ससारात भ्रमण करीत आहेत, या पृथ्वीवर व देवलोकीं सुद्धा सगळ भव, तृष्णा आणि अविद्या या त्रिविध उपाधींना वश आहेत, पृथ्वीवरले सर्व पदार्थ सापेक्ष आहेत, स्वतत्रता अशी कोणालाच नाहीं, याप्रमाणें ससाराची अनित्यता सिद्धार्थाच्या मनात व्यापून राहिली होती ही गोष्ट त्याच्या बापाच्या नजरेस येताच त्यानें कुमाराचें मन ससाराकडे वळविण्यासाठीं नानाप्रकार यत्न केले त्याचें एका सुंदर कुमारीशीं लग्न करून दिलें नानाप्रकारचे विलासात त्याचें मन रमावें म्हणून अनेक उपाय केले ज्याच्या योगानें त्याच्या चित्ताचें रंजन होईल असेच पदार्थ त्याच्या दृष्टीस पडाव, चित्ताला वैराग्य उत्पन्न होईल

असे काहीं दिसूं नये, अशी खबरदारी शुद्धोदनानें ठेविली होती. तरी एकदां कुमार सिद्धार्थ रथांत बसून उपवनाला जात असतां पाय, लटलट कांपत आहेत व गात्रें शिथिल झालीं आहेत, असा एक वृद्ध पुरुष देवांनीं मायेच्या बलानें उत्पन्न करून त्याच्या मार्गांत उभा केला त्याला पाहून कुमाराच्या मनांत जरादु:खाची कल्पना प्रेरित झाली. त्याला टाळून सारथ्यानें दुसऱ्या दिशेनें रथ नेला तिकडे वाटेत एक शव दिसलें. त्यापासून मरणदु:खाची कल्पना कुमाराच्या मनांत येऊन त्याचें मन उद्विग्न झालें तीही दिशा सोडून तिसऱ्याच दिशेनें सारथ्यानें रथ नेला तिकडे शांत, दांत, संयत व ब्रह्मचारी असा एक भिक्षु दिसला पूर्वीच्या दोन देखाव्याशीं या देखाव्याची तुलना करून पाहिल्यावर कुमाराचें मन प्रसन्न झालें, आणि हें भिक्षूचें जीवन हेंच श्रेष्ठ जीवन अशी त्याची खात्री झाली गृहत्याग करण्याचा त्यानें मनांत संकल्प केला, व तो आपला संकेत त्यानें आपल्या पित्यास निवेदन केला

सिद्धार्थाच्या मनांत आतां अहोरात्र चार गोष्टी घोळू लागल्या—

१ या भवचक्रांत सापडलेल्या लोकांची त्यांतून सुटका कशी होईल ?

२ अविद्येच्या अंधकारांत चाचपडणाऱ्या लोकांना प्रज्ञाचक्षूची प्राप्ति कशी होईल ?

३ अहंकारानें आवृत झालेल्या लोकांना खरा मार्ग कसा दिसूं लागेल ?

४ 'पुनरपि जननं पुनरपि मरणं' अशा तऱ्हेच्या भवचक्राच्या फेऱ्यांतून कायमची मुक्ति देणारा असा प्रज्ञातृप्ति करणारा धर्म कसा कळेल ?

नगरांतून लवकर बाहेर पडावें म्हणून रथ तयार करण्याचा त्यानें आपल्या छंदक नावाच्या सारथ्यास आज्ञा केली. त्या वेळीं सिद्धार्थाला नुकताच पुत्र झालेला होता ज्या ऐश्वर्य प्राप्त व्हावें म्हणून लोक कठोर तपाचरणें करितात, त ऐश्वर्य, संतति आणि संपत्ति यांचा अनायासें प्राप्ति झाली असतां तिला झिडकारून आणि भरल्या लक्ष्मीची अवगणना करून जाणें योग्य नाहीं, असें छंदकानें पुष्कळ सांगून पाहिलें, पण सिद्धार्थानें साफ सांगितलें कीं,—

वज्राशनि परशुशक्ति शराश्मवर्षं
विद्युत्प्रभावज्वलितं क्वथितञ्च लोहम्।

आदीप्तशैलशिखराः प्रपतेयु मूर्ध्नि
नो वा अहं पुनर्जनेय गृहाभिलापम् ॥

*अर्थ* —कठोर वज्र, कुऱ्हाडीचे घाव, बाण व दगड यांचा वर्षाव, विद्युत्प्रभावानें तप्त झालेलें व वितळलेलें लोखंड आणि चकाकणारीं पर्वतशिखरें हीं जरीं डोक्यावर कोसळलीं तरी पुन. गृहाचा अभिलाष मी कधीं करणार नाहीं

या प्रमाणें सडेतोड उत्तर देऊन व मन कठोर करून सिद्धार्थ घरून मध्य रात्रीचे वेळीं निघाला त्या वेळीं पुष्यनक्षत्रयोग होता *

---

* पुत्र झाल्याची बातमी सिद्धार्थाला तो आपल्या बागेंत गृहत्यागाच्या गंभीर विचारांत निमग्न असता एका दूताकडून कळली तेव्हा तो शांतपणें स्वतःशी म्हणाला कीं, 'हा एक नवा पाश आता तोडावा लागेल ' इतकें बोलून तो खिन्न चित्तानें वाड्यात परत आला वाड्यात पुत्रजन्माबद्दल महोत्सव सुरू होता इत्तीवरून सागरा वाटीत होते सिद्धार्थ घरीं येताच त्याच्या बहिणीनें त्याचें अभिनंदन करून म्हटलें, 'असला पुत्र ज्याला प्राप्त झाला तो पिता सुखी (निवृत्त) होवो ' पाली भाषेंत 'निवृत्त' या शब्दाला दोन अर्थ आहेत एक सुखी व दुसरा मुक्त सिद्धार्थाला 'निवृत्त' हा शब्द ऐकून वैराग्य धारण करण्याच्या *आपल्या निश्चयाचें स्मरण झालें, आणि हें स्मरण दिल्याबद्दल कृतज्ञबुद्धीनें* त्यानें तिला आपल्या गळ्यांतलें मोत्यांचें पेंडें बक्षीस दिलें ती आनंदित होऊन चालती झाली पण इकडे सिद्धार्थाची काय स्थिति झाली ! त्याच्या जिवाला या गृहपाशातून केव्हा बाहेर पडेन असें झालें आग लागलेल्या घरातून जीव वांचविण्यासाठीं बाहेर पडण्याकरिता मनुष्य जसा तडफडतो, तसा सिद्धार्थ मनांत तळमळू लागला त्यानें छंदक नांवाच्या आपल्या सारथ्याला रथ तयार करून आणण्यासाठीं निरोप पाठविला ही मध्यरात्रीची वेळ होती त्याची पत्नी यशोधरा आपल्या सुंदर महालांत एक हात नूतन जन्मलेल्या आपल्या अर्भकाच्या डोक्यावर ठेवून पुष्पशय्येवर निजली होती मिणमिण जळणाऱ्या दिव्याच्या प्रकाशांत तिची मुखकांति पाहून सिद्धार्थाच्या मनाला पुन मोह प्राप्त झाला तिच्या अधरोष्ठाचें एकदा शेवटचें चुंबन घ्यावें, व नूतन अर्भकाला एकदा हातांत

काषाय वस्त्र धारण करणाऱ्या एका व्याधाला पाहून सिद्धार्थानें त्याला आपलीं रेशमी वस्त्रें दिलीं व त्याच्या मोबदल्यात त्याचीं काषाय वस्त्रें मागून घेतलीं. याही ठिकाणीं एक स्तूप बांधण्यात आला

छंदकाच्या तोंडून सिद्धार्थाच्या मातापितरांना झालेली सगळी हकीकत कळली, तेव्हा त्यांना अतिशय दु:ख झालें, आणि छंदकानें परत आणिलेले सिद्धार्थाच्या अंगावरील अलंकार त्यांनीं एका सरोवरात फेंकून दिले

---

विटा ठेवी प्रत्येक विटेच्या भोंवतीं कापडाचे १०८ तुकडे ठेवून मधाच्या भोंवती मातीचे आठ घट ठेवीत असत मग प्रधान एक वीट राजाचे हातीं देई ती घेऊन राजा पुष्पांनीं सुगंधित केलेल्या कुंडात बसवी राजाचे इतर प्रधानही याप्रमाणें विटा बसवीत इतका विधि झाला म्हणजे राजा भिक्षूंना व थेरांना नमस्कार करी व ते नयमपत्रकें म्हणून त्याला आशीर्वाद देत मग राजाच्या विनंतीवरून सदर विद्वान् मंडळी तशीच सात दिवस वास करून नंतर आपापल्या ठिकाणी जात

याप्रमाणें विधि झाल्यावर गवंड्यांना बोलावून त्यांच्या नायकाला पापारे देऊन राजा त्यांना कामाला सुरवात करण्यास सांगे स्तूपाचें काम अर्धवट राहू नये म्हणून त्याच्या खर्चासाठीं साठ हजार क्षपण ( हें एक नाणें असे ) इतके द्रव्य एका वडीपाशीं पुरून ठेविलेलें असे

स्तूप तयार होऊन त्यात बुद्धाची रक्षा वगैरे ठेवावयाच्या वेळीं पन एक विधि असे यावेळीं राजाची स्वारी ज्या पात्रात बुद्धाची रक्षा ठेवावयाची तें सुवर्णपात्र डोक्यावर धरून फार मोठ्या समारंभानें रथ, हत्ती, घोडे, चतुरंगसेना, सरदारमंडळी, पुष्पपात्र धारण करणाऱ्या स्त्रिया, यांसह येत असे मग पुरोहितानें आणिलेल्या रक्षेपुढें हात जोडून नम्रपणें राजा उभा राही, आणि बुद्धाला आपण आपलें राजवैभव वगैरे सर्वस्व अर्पण केलें आहे असें बोलून आपल्या अंगावरील रत्नालंकार व राजभूषणें त्या पात्रात घाली मग रक्षा ठेवलेलें पात्र हातात घेऊन तो स्तूपावर चढे आणि योग्य जागीं तें पात्र त्यात ठेविलें म्हणजे बाहेरचा गजर आणि स्तोत्राचा घोष होई येथें हा विधि समाप्त होई

इकडे सिद्धार्थ फिरत फिरत वैशाली नगरीत येऊन पोंचला तेथें आलार कालम नावाच्या एक ब्राह्मणाचें शिष्यत्व त्यानें पत्करलें या ब्राह्मणाचे तीनशें शिष्य होते तो ब्राह्मण आपल्या शिष्यांना अकिंचन्यायतन तत्त्वाचें शिक्षण देत होता विषयवासनाविरहित होऊन सर्व सगाचा त्याग करणें ह्मणजेच मुक्ति अशी या पन्थाची समजूत होती. पण हें शिक्षण घेऊन अनुभव पाहि त्यावर सिद्धार्थाच्या मनाचें समाधान त्या शिक्षणानें होइना ह्मणून तो तेथून निघून मगध देशात पाण्डवपर्वताच्या समीप येऊन राहिला तो भिक्षेसाठी रोज राजगृह नगरास जात असे त्याची तेज पुंज कांति पाहून हा कोणीतरी थोर पुरुष असावा असें लोकास वाटलें जाता जाता ही बातमी बिंबिसार राजापर्यंत गेली व तो त्याच्या दर्शनास आला तेव्हा आपण कोण, कोठें असता? वगैरे प्रश्न बिंबिसारानें केल्यावरून सिद्धार्थानेंही आपला साद्य वृत्तात सांगितला, आणि बुद्धत्वप्राप्ति हा आपल्या जीविताचा उद्देश आहे असें त्याला स्पष्ट कळविलें तेव्हा त्या राजानें सिद्धार्थाचें मन वळविण्याचा पुष्कळ यत्न केला पण यश येईना तेव्हा सिद्धार्थाच्या चरणावर मस्तक ठेवून तो चालता झाला *

* बिंबिसार राजा व सिद्धार्थ यांच्यामध्ये यावेळीं झालेला संवाद अतिशय बोधप्रद होता त्याचें सार असें —

**बिंबिसार**—श्रमणा, तुझे हात राजदंड धारण करण्यास योग्य असता त्यांनी भिक्षापात्र धरावें हें योग्य नाहीं अधिकारतृष्णा हीसुद्धा उदारचरितांना शोभणारीच आहे, धन ही तुच्छ मानण्यासारखी वस्तु नाहीं सारांश, धर्म, सत्ता, आणि धन या तिन्ही गोष्टींचा विचारपूर्वक आणि योग्य रीतानें उपयोग करून दाखवील तोच खरा थोर पुरुष होय

**सिद्धार्थ**—राजा, तू उदार आणि थोर मनाचा व शहाणा आहेस यात शंका नाहीं अल्प तृष्णा वाइट नाहीं खरी, पण तृष्णा ही मर्यादेत राहणारी नाहीं सत्ता म्हटली म्हणजे तिच्या बरोबर काळजी आलीच पृथ्वीवरील राज्याधिकार, स्वर्गवास, फार काय पण त्रिभुवनावरील स्वामित्व या सर्वांपेक्षा पवित्र आचरणाचें महात्म्य अधिक आहे सत्तांची चंचलता आणि मोहजाल मीं ओळखलें आहे आता अन्न म्हणून विषाचें सेवन मी उघड्या डोळ्यानीं कसें करावें?

या राजगृह नगरांत रुद्रक ( उद्रक ) नांवाचा कोणी ब्राह्मण आपल्या शिष्यांना 'नैवसंज्ञानासंज्ञायतन'' म्हणजे काय तें समजावून सांगत होता. श्रद्धा, वीर्य, स्मृति, समाधि व प्रज्ञा या पांच गोष्टींचा आश्रय करण्यानें मुक्ति मिळते हें त्याच्या सांगण्याचें तात्पर्य होतें. सिद्धार्थानें त्याच्यापाशीं कांहीं दिवस राहून धर्म-शिक्षण घेतल्यावर मग तो तेथून गयाशीर्ष नामक पर्वतावर गेला. तेथें विचार करतां करतां त्याला तीन गोष्टींचें ज्ञान झालें. पहिली गोष्ट ही कीं, कामवस्तु-विषयक राग, तृष्णा, किंवा वासना यांपासून ज्यांची निवृत्ति झाली नाहीं, त्यांना मानसिक किंवा शारीरिक दुःखापासून मुक्ति कधीं मिळणार नाहीं; दुसरी गोष्ट, ज्यांचे अंतकरणांत रागद्वेषादि विकार भरले आहेत, त्यांच्या मनांत ज्ञान-ज्योतीचा प्रकाश कधीं पडणार नाहीं; आणि तिसरी गोष्ट म्हणजे ज्यानें आपल्या अंतःकरणांतून रागद्वेषादिकांना पार घालवून दिलें आहे त्यालाच ज्ञानाचा लाभ होईल, इतरांना नाहीं.

नंतर सिद्धार्थ गया प्रांतांत उरुबिल्व गांवाजवळ नैरंजना नदीच्या रमणीय तीरीं गेला. तेथें पांच भिक्षु तपश्चर्या करीत होते. धर्मसाधनाचा हा मार्ग कदाचित् चांगला असेल, तेव्हां याचाही अनुभव पहावा म्हणून त्यानें त्या पांच जणांकडून त्यांच्या मार्गाची माहिती करून घेतली आणि कडक तपश्चर्या आरंभिली. प्रथम आस्फानक नांवाचें ध्यान त्यानें लाविलें. तें लाविल्यावर तोंड व नाकपुड्या यांतून श्वासोच्छ्वास येणें बंद झालें व कर्णरन्ध्रांतून महाशब्द होऊं

पाण्यातल्या माशानें आमिषाला, किंवा स्वतंत्रपणानें आणि स्वच्छंदानें उडणाऱ्या पक्ष्यानें पिंजऱ्याला, मोहित व्हावें काय? सर्पाच्या तोंडातून सुटलेल्या सशानें पुनः त्याच्या जबड्यांत जाऊन पडावें काय? आंधळ्या माणसानें दृष्टि प्राप्त झाल्यावर डोळे फोडून घ्यावे काय? त्यासाठीं विनाकारण हळहळूं नका. राज्यवैभव व संपत्ति यांच्या प्राप्तीबरोबर ज्यांचे अंगावर अहोरात्र चिंतेचा भार येऊन पडला आहे अशांसाठीं हळहळा. माझें मन या ऐहिक गोष्टींला विटलें आहे. त्यांत त्याला आतां मुळींच मौज वाटत नाहीं. यामुळेंच मी स्वतः राजभूषणांचा त्याग केला. मी आतां ज्ञान्यांना शरण जाऊन धर्मसाधन करण्याचा निश्चय केला आहे. दुःखापासून मुक्ति मिळविण्याचा मार्ग शोधणें हा माझा आतां जीविताचा उद्देश आहे.

लागला. पुढे तेंही द्वार बंद होऊन त्याच्या मस्तकांत शब्द घुमूं लागला. नंतर त्यानें आपला आहार कमी कमी करीत एका घासावर आणिला. त्यामुळें शरीर अत्यंत क्षीण झालें, तरी पर्वा न करतां ललित-व्यूह नांवाची समाधि त्यानें लाविली. ही लावताना 'या आसनावर बसल्या बसल्या माझें शरीर शुष्क होवो, व त्वचा, अस्थि, आणि मांस येथल्या येथें झडोत. पण बुद्धत्वाचा लाभ झाला नाहीं तोंपर्यंत हा माझा देह या आसनावरून ढळणार नाहीं'* असें तो म्हणाला.

याप्रकारें शरीराला कष्ट देऊनसुद्धां काय फलप्राप्ति झाली याविषयीं खुद्द बुद्धाचेंच उद्गार येथें देतों. सच्चक नांवाचा एक जैन पंडित वैशाली नगरींत राहत असे. त्याला अग्निवेन असेंही म्हणत. या पंडिताशीं संभाषण करीत असतां बुद्धानें सांगितलेला स्वतःचा अनुभव मज्झिमनिकायांतील महासच्चक सुत्तांत दिला आहे. तो असा —

" अशा स्थितींत माझा देह अत्यंत कृश झाला; हातापायांच्या काड्या झाल्या, पाठीचा कणा स्पष्ट दिसूं लागला, मोडक्या घराच्या वाशाप्रमाणें बरगड्या खिळखिळ्या झाल्या, पाण्यांत पडलेलीं नक्षत्रांचीं प्रतिबिंबें जशीं खोल गेलेलीं दिसतात, त्याप्रमाणें माझ्या डोळ्यांचीं बुबळें खोल गेलीं होतीं; कडू भोपळा कच्चा कापून उन्हांत टाकिला असतां जसा कोमेजून जातो, तशी माझी अंगकांति करपून गेली होती, पोट आणि पाठ एक झाली होती. त्यावेळा माझ्या मनांत असा विचार आला कीं, हा ज्या अत्यंत दुःखकारक वेदना मी सोशीत आहे तशा कोणाही श्रमणानें किंवा ब्राह्मणानें अनुभविल्या नसतील, परंतु या दुष्कर कर्मानें लोकोत्तर धर्मज्ञान प्राप्त होईल असें मला वाटत नाहीं. याहून दुसरा कोणता तरी निर्वाणप्राप्तीचा मार्ग आहे कीं नाहीं? ( घर सोडण्यापूर्वी

* " इहासने शुष्यतु मे शरीरं
त्वगस्थिमांसं प्रलयंच यातु ।
अप्राप्य बोधिं बहुकल्पदुर्लभां
नैवासनात् काय इतश्चलिष्यते ॥"

मी ) माझ्या बापाबरोबर शेतात गेलों असता जंबुवृक्षाच्या छायेंत बसून प्रथम ध्यानाची समाधि साधल्याची आठवण आहे तोच तर निर्वाणाचा मार्ग नसेल्ना? ह्या गोष्टीचें स्मरण झाल्याबरोबर, हे अग्निवेन, तोच मार्ग खरा असावा असें मला वाटू लागलें मी माझ्याशाच म्हणालों, 'त्या समाधि-सुखाला मी का भितों? तें काहीं चैनीनें मिळालेलें सुख नव्हे, किंवा पाप-कारकही नव्हे, अशा सुखाला मी भिता कामा नये परतु ह्या दुर्बल देहानें तें सुख साध्य होणार नाहीं तेव्हा देहाचें सरक्षण करण्यापुरतें तरी अन्न मीं खाल्लें पाहिजे

तदनंतर मा देहरक्षणाला लागणारें अन्न सेवन करू लागलों त्यावेळा माझ्या सेवेसाठीं पाच भिक्षु राहत असत मला जें धर्मज्ञान होईल, तें मी त्यास सागन अशी आशा त्याना वाटत होती परतु जेव्हा मी अन्नसेवन करण्यास आरभ केला, तेव्हा त्याची निराशा झाली, व मी ढोंगी आहें असें समजून ते मला सोडून चालते झाले त्या अन्न ग्रहणानें हळूहळू माझे अगीं शक्ति आली व मी समाधिसुखाचा अनुभव घेऊ लागलो"

---

१ या प्रसगाच्या सबधानें बौद्धग्रथात पुढील गोष्ट आहे ---घोर तपश्चर्येमुळें शरीर शुष्क होऊन सिद्धार्थ मूर्च्छित होऊन पडला असतां जवळच्या गावातल्या एका गवळ्याची नदा नावाची मुलगी वनदेवताना नैवेद्य दाखविण्या साठी दुधाची खीर घेऊन आली आवरारशाला सिद्धार्थ पडलेला पाहून वनदेवतेनें आज प्रत्यक्ष आपणास दर्शन दिलें असें तिला वाटलें, आणि तिनें वदन करून आणलेल्या खिरीचें सेवन करण्याविषयी सिद्धार्थाला तिनें विनति केली सिद्धार्थाला थोडी खायला पाहिजे होतेंच ते आयतें पुढें आलेलें पाहून त्याला फार सतोष झाला व त्यानें ती सगळी खीर पिऊन टाकली दुसऱ्या कित्येक ग्रथात 'नदा' या नावाबद्दल 'सुजाता' असें नाव आढळतें

२ मज्झिमनिकायातील महासच्चक सुत्ताच्या उताऱ्याचें हें भाषातर प्रो० धर्मानद कोसबीकृत 'बुद्ध, धर्म, आणि सघ' या पुस्तकातून घेतलें आहे

असमग्रहण करूं लागल्यावर हळूं हळूं सिद्धार्थाच्या अंगांत शक्ति येऊं लागली, व मनालाही हुषारी वाटू लागली. पण आपले पाच भिक्षु सोबती आपणास सोडून गेल्याबद्दल त्याच्या मनाला दुःख झालें, आणि तो निवाऱ्याची व परमार्थचिंतनास योग्य अशी जागा शोधण्यासाठीं हिंडूं लागला.

# प्रकरण आठवें.

## मारविजय.

मागच्या प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें हिंडत हिंडत सिद्धार्थ बोधिवृक्षापाशीं आला, व त्या वृक्षाखालीं चिंतन करीत बसला. या प्रसंगाला उद्देशून बुद्धचरितकाव्यांत 'मारविजय' नामक एक महत्त्वाचें व मनोरंजक प्रकरण आहे. त्यांत म्हटलें आहे कीं यानंतर सिद्धार्थाच्या खऱ्या परीक्षेची वेळ आली. त्याच्या ध्यानाचा भंग करण्यासाठीं कामलोकाचा अधिपति मार (मारणारा, सद्वासनाचा नाश करणारा, सैतान) हा आपल्या सहस्र कन्या आणि असह्य सैन्य बरोबर घेऊन सिद्धार्थाच्या तपश्चर्येच्या जागीं आला. याठिकाणीं सिद्धार्थाचें आणि माराचें जंगी युद्ध होऊन त्यांत पहिल्याचा विजय झाला. या युद्धाचें सुत्तनिपातांतील 'पधान सुत्तांत' दिलेलें वर्णन वाचनीय आहे. त्यांत या मारविजयाविषयीं भगवान् बुद्ध स्वतः म्हणतात —

---

१ बुद्धचरिताच्या तेराव्या सर्गांत या प्रसंगाचें रसभरित व विस्तृत वर्णन आहे. त्यांतून माराच्या विचारासंबंधाचे थोडेसे श्लोक पुढें देतों —

तस्मिन्बोधाय कृतप्रतिज्ञे राजर्षिवंशप्रभवे महर्षौ ।
तत्रोपविष्टे प्रजहर्ष लोकस्तत्रास सद्धर्मरिपुस्तु मारः ॥१॥
यं कामदेवं प्रवदन्ति लोके चित्रायुधं पुष्पशरं तथैव ।
कामप्रचाराधिपतिं तमेव मोक्षद्विषं मारमुदाहरन्ति ॥ २ ॥
तस्यात्मजा विभ्रमहर्षदर्पास्तिस्रो रतिप्रीतितृषश्च कन्याः ।
पप्रच्छुरेनं मनसो विकारं स तांश्च ताश्चैव वचो बभाषे ॥३॥

तं मं पधान पहितत्तं नदिं नेरंजनं पति ।
विपरक्कम्म झायन्तं योगक्खेमस्स पत्तिया ॥ १ ॥
नमुचि करुणं वाचं भासमानो उपागमि ।
किसो त्वमसि दुब्बण्णो सन्तिके मरणं तव ॥ २ ॥
सहस्सभागो मरणस्स एकंसो तव जीवितं ।
जीवं भो जीवितं सेय्यो जीवं पुञ्ञानि काहसि ॥ ३ ॥
चरतो च ते ब्रह्मचरियं अग्गिहुत्तञ्च जूहतो ।
पहूतं चीयते पुञ्ञ किं पधानेन काहसि ॥ ४ ॥

अर्थः—( १ ) "मी नेरंजरा नदीच्या काठीं निर्वाणप्राप्तीसाठीं मोठ्या उत्साहानें ध्यान करीत होतों माझें सर्व चित्त निर्वाणाकडे लागलें होतें

( २ ) ( असें असतां ) मार माझ्या जवळ आला आणि करुणामय वाणीनें मला म्हणाला, 'तू कृश झाला आहेस, तुझी अंगकांति फिकट झाली आहे, मरण तुझ्या जवळ आहे

( ३ ) हजार हिश्शानीं तू मरणार, एका हिश्शानें कायतें तुझें जीवित बाकी राहिलें आहे. भो ( गौतम ), जिवत रहा, जगलास तर पुण्यकर्में करूं शकशील.

---

असौ मुनिर्निश्चयवर्म बिभ्रत्सत्त्वायुधं बुद्धिशरं विकृष्य ।
जिगीषुरास्ते विषयान् मदीयान् तस्मादयं मे मनसो विषादः ॥४
यदि ह्यसौ मामभिभूय याति लोकाय चाख्यात्यपवर्गमार्गम्
शून्यस्ततोऽयं विषयो ममाद्य वृत्ताच्च्युतस्येव विदेहभर्तुः ५
तद्यावदेवैष न लब्धचक्षुर्मद्गोचरे तिष्ठति यावदेव ।
यास्यामि तावद् व्रतमस्य भेत्तुं सेतुं नदीवेग इवाभिवृद्धाः ॥६॥
ततो धनुः पुष्पमयं गृहीत्वा शरांस्तथा मोहकरांश्च पञ्च ।
सोऽश्वत्थमूलं ससुतोऽभ्यगच्छदस्वास्थ्यकारी मनसः प्रजानाम्
अथ प्रशान्तं मुनिमासनस्थं पारं तितीर्षुं भवसागरस्य ।
विषज्य सव्यं करमायुधाग्रे क्रीडन् शरेणेदमुवाच मारः ॥८॥

(४) (गृहस्थधर्मात विहित) कर्मांचें आचरण करून, अग्निहोत्र ठेवून होम केला असतां पुण्य संपादतां येतें, तर मग हें निर्वाण घेऊन काय करावयाचें आहे?"

मारानें बोधिसत्वाला असा उपदेश केल्यावर बोधिसत्व त्यास म्हणाला —

अणुमत्तेनवि पुञ्ञेन अत्थो मह्यं न विज्जति।
येसं च अत्थो पुञ्ञान ते मारो वत्तुमरहति॥ १॥
अत्थि सद्धा ततो विरियं पञ्ञा च मम विज्जति।
एवं मं पहितत्तंपि किं जीवितमनुपुच्छसि॥ २॥

अर्थ —(१) 'अशा प्रकारचें (अलौकिक) पुण्य अणुमात्रही मला नको आहे ज्यांना अशा पुण्याची आवश्यकता वाटत असेल त्यांना पाहिजे तर मारानें हा उपदेश करावा

(२) माझ्या अंगीं श्रद्धा आहे, उत्साह आहे आणि प्रज्ञाहि पण आहे इतकें असतां आणि माझें चित्त स्थिर असतां मरणाची भीति कशाला घालतोस?"

आणखी बोधिसत्व म्हणाला —

कामा ते पठमा सेना दुतिया अरति वुच्चति।
ततिया खुप्पिपासा ते चतुत्थी तण्हा पवुच्चति॥ १॥
पंचमी थीनमिद्धं ते छट्ठा भीरुपवुच्चति।
सत्तमी विचिकिच्छा ते मक्खो थम्भो ते अट्ठमो॥ २॥
लाभो सिलोको सक्कारो मिच्छा लद्धो च यो यसो।
यो चत्तानं समुक्कंसे परे च अवजानति॥ ३॥
एसा नमुचि ते सेना कण्हस्साभिप्पहारणी।
न तं असूरो जिनाति जेत्वा च लभते सुखं॥ ४॥

(१-२)(हे मार) इंद्रियांना सुखविणारे चैनाचे पदार्थ ही तुझी पहिली सेना होय आर्ति [कंटाळा] ही तुझी दुसरी सेना, तिसरी भूक आणि तहान, चवथी विषयवासना, पांचवा आळस, सहावी भीति, सातवी कुशंका, आणि आठवी गर्व ह्या तुझ्या सेना होत

(३) (याशिवाय) लाभ, सत्कार, पूजा ही तुझी नववी सेना आहे, आणि खोट्या मार्गानें मिळविलेली कीर्ति ही दहावी. या कीर्तीच्या योगानें मनुष्य आत्मस्तुति आणि परनिंदा करीत असतो.

(४) हे काळ्याकुट्ट नमुचि (मार), (साधुसंतावर) प्रहार करणारी ही तुझी सेना आहे. तिला भ्याड मनुष्य जिंकूं शकत नाहीं. परंतु जो शूर मनुष्य तो तिला जिंकतो, व तोच सुख लाभतो.

बोधिसत्व पुढें म्हणतातः—

**पगाळ्हा यत्थ न दिस्सन्ति एते समण ब्राह्मणा ।**
**तं च मग्गं न जानन्ति येन गच्छन्ति सुब्बता ॥ १ ॥**

अर्थ—"(हे मार) सगळे श्रमण आणि ब्राह्मण तुझ्या सेनेच्या तडाक्यांत सांपडले आहेत; त्यामुळें ते (शीलादि गुणांनीं) प्रकाशत नाहींत, व त्यास ज्या मार्गानें महर्षि जातात तो मार्ग ठाऊक नाहीं.

**यं तेतं नप्प सहानीं सेनं लोको सदेवको ।**
**तं ते पञ्ञाय गच्छामि आमं पत्तंव अम्हना ॥ २ ॥**

अर्थः—ह्या तुझ्या सेनेपुढें देव आणि मनुष्य उभे राहूं शकत नाहींत. दगडानें कच्च्या मातीचें भांडें फोडून टाकावें त्याप्रमाणें मी प्रज्ञेनें तिचा पराभव करून टाकतों."

या प्रमाणें माराशीं धैर्यानें झगडल्यावर सिद्धार्थानें त्याचा पराभव केला आणि वैशाख शु० १५ च्या दिवशीं तो बोधिवृक्षाखालीं (पिंपळाच्या झाडाखालीं) चिंतन करीत बसला असतां तेथें त्याला दिव्य ज्ञानाची प्राप्ति होऊन जगाच्या उद्धाराचा मार्ग सांपडला. पराभवामुळें दुःखित होऊन मार निघून गेला.

---

१ बोधिवृक्ष म्हणजे ज्या वृक्षाखालीं बसला असतां सिद्धार्थाला दिव्यज्ञान—मोक्षमार्गाचें ज्ञान—झालें तो वटवृक्ष होता असें कित्येक पाश्चात्य ग्रंथकारानीं लिहून ठेविलें आहे. पण ती चूक आहे. तो अश्वत्थवृक्ष होता असें बुद्धचरित्रांत व सुत्तांतांत स्पष्टपणें म्हटलें आहे, आणि अश्वत्थ म्हणजे पिंपळ, वट नव्हे. हा

बौद्धग्रंथात वर्णिलेल्या या मारविजयाचें कुमारसंभव व शिवपुराण या ग्रंथात वर्णिलेल्या कंदर्पविजयाशीं पुष्कळ साम्य आहे. कुमारसंभव व शिवपुराण हे दोन्ही ग्रंथ ललितविस्तर व पालि भाषेतले ग्रंथ यांच्या मागाहूनचे आहेत असें विद्वानांचें मत आहे. बुद्धचरितादि बौद्धग्रंथात माराशीं सिद्धार्थानें पुष्कळ युक्तिवाद करून मग त्याला जिंकलें असें वर्णन आहे पण शिवानें मदनाशीं फारसा युक्तिवाद न करतां एकदम तृतीय नेत्र उघडून त्याला जाळून भस्म करून टाकलें. या विषयींचा कुमार संभवातला पुढील श्लोक पहा—

क्रोधं प्रभो संहर संहरेति यावद्गिरः खे मरुतां चरन्ति ।
तावत्स वह्निर्भवनेत्रजन्मा भस्मावशेषं मदनं चकार ॥
(कुमारसंभवे ३-७२)

---

मूळचा बोधिवृक्ष बुद्धगया येथें अद्याप आहे असें भाविक लोक समजतात भाविक बौद्ध ग्रंथकारांनीं या वृक्षाबद्दल असें लिहून ठेविलें आहे कीं, हा वृक्ष चिरकाल हिरवागार राहील. हें त्याचें वाक्य अलंकारिक दिसतें बोधिवृक्ष हा बौद्धधर्माचें निदर्शक समजून या रूपकानें बौद्धधर्माचें अविनाशित्व सूचित केलें आहे या बोधिवृक्षाची एक शाखा अशोक राजाची कन्या संघमित्रा हिनें सिलोन बेटात नेऊन लाविली ती वृद्धींत होऊन अद्याप कायम आहे व तिकडे बौद्धधर्मही अद्याप प्रचलित आहे. तेव्हा वरील वाक्याचा स्पष्टार्थ व ध्वन्यर्थ दोन्ही सिंहलद्वीपापुरते खरे झाले आहेत. पण हिंदुस्तानातला मूळ बोधिवृक्ष इ स १८७५ सालीं नष्ट झाला असें म्हणतात, व बौद्धधर्मही या देशांत फारसा कोठें उरला नाहीं तेव्हा हिंदुस्तानासंबधानें दोन्ही अर्थ खरे नाहींत असें मोठ्या दुःखानें म्हणावें लागतें सध्याचा बोधिवृक्ष अस्सल नसून त्याजागीं लावलेली नवी शाखा आहे असें म्हणतात तथापि या वृक्षाविषयीं बौद्ध लोकांचे ठायीं पूज्यबुद्धि अद्याप इतकी आहे कीं या वृक्षाचे दर्शनासाठीं हजारों कोसावरून बौद्ध यात्रेकरू येतात बौद्धधर्माच्या अगोदरच्या काळापासून—किंबहुना वैदिक काळापासून—अश्वत्थवृक्ष पवित्र मानला जात असे. त्यात बुद्धाच्या चरित्रांतल्या या प्रसंगानें आणखी भर पडली

१ कुमारसंभवात म्हटलें आहे कीं —मदनानें सोडलेल्या शरानें शिव

आपल्या हिंदुपुराणातून मदनाच्या स्त्रीचें नाव रति असें आहे. बौद्ध ग्रंथात रति हें नाव माराच्या कन्येचें आहे.

आता हा मारविजय म्हणजे काय ? हें आपण पाहूं. हें एक रूपक आहे यात शंका नाही. मार म्हणजे मनातल्या सद्वासनाचा नाश करणारें आणि या संसारातल्या नानाविध पाशात चित्ताला गुंतवून ठेवणारें कारण होय. एकीकडे धन, मान, सत्ता, ऐश्वर्य, ऐहिक प्रेम, चैनीच्या व विलासाच्या वस्तु यानीं सिद्धार्थाचें मन आकर्षण करण्याचा प्रयत्न चालविला होता, आणि दुसरीकडे त्याच्या पाशात न अडकता शाश्वत सुखाचा व जगाच्या उद्धाराचा मार्ग शोधून काढावयाचा, मग त्या कार्यांत प्राण खर्ची पडले तरी हरकत नाही, असा त्याच्या मनाचा निश्चय झाला होता. कुवासना व सद्वासना याचें जें हें द्वंद्व तेंच माराशीं झालेलें युद्ध. मारानें आपल्या कन्या व असंख्य सैन्य बरोबर नेलें होतें म्हणजे मनाला भलतीकडे नेणाऱ्या शक्ती त्याला वैराग्याच्या मार्गांतून काढण्यासाठीं अजून आपली पराकाष्टा करीत होत्या. आपला मार्ग चुकीचा तर नसेलना? आपण भलतेंच वेड डोक्यात घेऊन आयती हातीं आलेलीं सुखाचीं साधनें दवडीत तर नाहींना ? अशी शंका एखादे वेळीं मनात येऊन त्याचें मन संसाराकडे पुन: आकर्षिलें जाई. पण कडकडीत वैराग्यापुढें हा क्षणिक विचार टिकत नसे. या

किंचित् काळपर्यंत विव्हळ होऊन त्याचें धैर्य सुटलें होतें, पण लागलीच त्यानें चित्ताची स्थिरता केली —

प्रतिग्रहीतुं प्रणयिप्रियत्वात् त्रिलोचनस्तामुपचक्रमे च ।
संमोहनं नामच पुष्पधन्वा धनुष्यमोघं समधत्त बाणम् ॥
हरंतु किंचित् परिलुप्तधैर्यश्चंद्रोदयारंभ इवांबुराशिः ।
उमामुखे बिंबफलाधरोष्ठे व्यापारयामास विलोचनानि ॥
विवृण्वती शैलसुतापि भावमङ्गैः स्फुरद्बालकदम्बकल्पैः ।
साचीकृता चारुतरेण तस्थौ मुखेन पर्यस्तविलोचनेन ॥
अथेंद्रियक्षोभमयुग्मनेत्रः पुनर्वशित्वाद्बलवन्निगृह्य ।
हेतुं स्वचेतोविकृतेर्दिदृक्षुर्दिशामुपान्तेषु ससर्ज दृष्टिम् ॥

गोष्टीचें मारविजय हें रूपक कविकल्पनेनें बनविलें आहे, असें विचारी बौद्ध भिक्षु कबूल करतात[1]

---

# प्रकरण ९ वें.

## मारविजयानंतर.

*माराचा पराभव करून चित्त स्वस्थ केल्यानंतर सिद्धार्थानें जगातल्या* दुःखाच्या कारणाचा विचार केला त्याच प्रमाणें बाह्य व अंतर्जगात होणाऱ्या क्रियामध्यें कांहीं कार्यकारणभाव आहे कीं काय? याचाही त्यानें बारीक दृष्टीनें विचार केला तेव्हां त्याला दिसून आलें कीं बाह्यजगात वस्तूंना उत्पत्ति, स्थिति व नाश हीं आहेत अंतर्जगात अथवा अध्यात्मिक जगातही कांहीं मानसिकवृत्ति कुशल ( मंगलकारक ) व कांहीं अकुशल ( अमंगलकारक ) आहेत व त्या अविद्येला वश होऊन दुःखाला कारण होतात ही दुःखाची कारणपरंपरा मोठी आहे बौद्धतत्त्वज्ञानाच्या भाषेंत बोलावयाचें म्हणजे अविद्यापासून संस्कार, त्यापासून विज्ञान, त्यापासून नामरूप, व त्यापासून क्रमानें षडायतन, स्पर्श, वेदना,

---

१ सुभद्र भिक्षु हे पर दिशाणा म्हणतात —

The holy books represent this inner struggle of the solitary ascetic in a magnificent richly coloured allegory as a struggle with Maro who with all his hosts the annihilating forces of nature add magically beautiful and attractive powers try to ensnare the world fleeting ascetic But he penetrates into their true nature and turns with loathing from their tempting forms This decides the battle *which forms the subject of the allegory* '

तृष्णा, उपादान, भव, जाति, जरामरण, शोक, परिदेव, दुःख, दौर्मनस्य, उपायास इत्यादिकांची उत्पत्ति होते[1]. अविद्या म्हणजे अज्ञान. या अज्ञानामुळेच प्रत्येकजण आपापला संसार निर्माण करतो. घट, पट, मनुष्य, वृक्ष, लता इ० कोणत्याही विषयाचें ज्ञान घेतलें तरी तें अज्ञानच. हें अज्ञान अनादि आहे. हें अज्ञान आपल्या अंतःकरणावर जो परिणाम करतें त्याचें नाव संस्कार. आम्हीं आतापर्यंत जे जे पदार्थ पाहिले ते ते सर्व आमच्या डोळ्यांपुढें प्रत्यक्ष नसले तरी त्यांची आकृति व प्रकृति आमच्या अंतर्यामीं संस्काररूपानें राहते. या संस्कारापासून विज्ञानाची उत्पत्ति होते. कोणी विज्ञानाचे सहा तर कोणी पांच प्रकार मानतात. ते प्रकार हे — दर्शन, श्रवण, घ्राण, स्वाद व स्पर्श. या शिवाय मन हें कित्येकाच्या मतें आणखी एक विज्ञान आहे. जर संस्कार नसते तर दर्शनश्रवणादि ज्ञान झालें नसतें. हें ज्ञान रूपरसादि पंचविषय व चक्षुकर्णादि सहा इंद्रियें यांच्याशीं दृढ संबद्ध आहे. विषयाचा इंद्रियांशीं जो संबंध त्याला स्पर्श म्हणतात. हा स्पर्श सुख, दुःख व अदुःखासुख या त्रिविध संवेदनाचें कारण आहे. संवेदनापासून तृष्णेची उत्पत्ति आहे, आणि तृष्णेपासून उपादान व कर्म हीं उत्पन्न होतात. शारीरिक, वाचिक व मानसिक या त्रिविध कर्मांपासून धर्माधर्माची उत्पत्ति होते, व धर्माधर्माच्या फलोपभोगार्थ जीवाला जन्म प्राप्त होतो. जन्माबरोबर जरा, मरण, शोक, परिदेवना, दुःख, दौर्मनस्य, इ० येतात. या कारणपरंपरेवरून अविद्या अथवा अज्ञान हेंच एकंदर दुःखाचें मूळ कारण, आणि तिचा नाश केला म्हणजे दुःखाचा नाश होईल असें सिद्धार्थानें आपल्या मनाशीं ठरविलें. हा मनाचा निर्णय जेव्हांपासून झाला तेव्हांपासून त्याच्या मनांत

---

१ "अविद्याप्रत्ययाः संस्काराः, संस्कारप्रत्ययं विज्ञानम्, विज्ञानप्रत्ययं नामरूपम्, नामरूपप्रत्ययं षडायतनम्, षडायतनप्रत्ययः स्पर्शः, स्पर्शप्रत्यया वेदना, वेदनाप्रत्यया तृष्णा, तृष्णाप्रत्ययमुपादानम्, उपादानप्रत्ययो भवः, भवप्रत्यया जातिः, जातिप्रत्यया जरामरणशोकपरिदेवदुःखदौर्मनस्योपायासाः संभवन्त्येव केवलस्य महतो दुःखस्कंधस्य समुदयो भवति समुदयः ।"

जागृति उत्पन्न झाली, आणि म्हणून त्याला 'बुद्ध' (जागृत) हें नाव प्राप्त झालं ही जागृति उत्पन्न होणें याचेंच नाव बुद्धत्वप्राप्ति

याप्रमाणे वैशाख शुद्ध पौर्णिमेच्या दिवशीं बुद्धत्वाची प्राप्ति झाल्यावर बुद्धाचे वचन त्याच्या तोंडून निघालें —

"अनेकजातिसंसारं सन्धाविस्सं अनिब्बिसम्।
गहकारकं गवेसन्तो दुक्खा जाति पुनप्पुनम्॥
गहकारक दिट्ठोसि पुन गेहं न काहसि।
सब्बा ते फासुका भग्गा गहकूटं विसंखितम्।
विसंखारगतं चित्तं तण्हानं खयमज्झगा॥"

(धम्मपद जरावग्ग ८—९)

अर्थ—देहरूपी गृह निर्माण करणारीचा शोध करतां करतां कित्येक जन्म गेले व कित्येक संसारांतून भ्रमण केलें (पण तिचा शोध लागला नाहीं) पुनः पुनः जन्म प्राप्त होणें हा गोष्ट किती भयंकर आहे! हे गृहनिर्मात्रि (तृष्णे), आज तुला मी पुरें ओळखलें आहे आतां पुनः तुला हें गृह निर्माण करतां येणार नाहीं घराचे वांसे व खांब सगळे मोडले आहेत माझ्या संस्कारविहित चित्तानें तृष्णेचा नाश केला आहे

बुद्धत्व पावल्यानंतर सात दिवसपर्यंत सिद्धार्थ बोधिसत्व तसाच मोक्षरसाचा अनुभव घेत आसनावर बसून राहिला होता या ठिकाणी दशसहस्र देवपुत्र आले आणि त्यांनीं त्या बुद्धाला व बोधिवृक्षाला गंधोदकानें स्नान घातलें मार पुनः आला आणि तुम्हाला जें पाहिजे होतें तें मिळालें, आतां तुम्ही अवतार समाप्त करा, असें म्हणूं लागला पण लोकांना माझ्या धर्माचा उपदेश केल्याशिवाय मी परिनिर्वाणाला जाणार नाहीं असें बुद्धानें त्याला स्पष्ट सांगितलें नंतर बुद्ध नागराजाच्या घरीं गेला तेथें मुचिलिंद व इतर नाग यांनीं त्याच्या डोक्यावर फणा धरली नंतर बुद्धाच्या प्रभावानें कोहा अलो

१ तृष्णेचा २ बुद्धाच्या चित्रांत त्याच्या डोक्यावर नागानें फणा धरल्याचें कित्येकवेळां दाखविण्यात येतें तें चित्र या प्रसंगाचें आहे असें समजावें

किक चमत्कार दाखविले वगैरे कथा भाविक बौद्ध ग्रंथकारांनी लिहून ठेविल्या आहेत, पण त्याच्याशीं आपणास कर्तव्य नाहीं मारांशीं बुद्धाचें यावेळीं झालेलें संभाषण हें सुद्धा रूपकच दिसतें 'आपला मतलब साधला तेवढा पुरा आहे, दुसऱ्याशीं आपणास काय कर्तव्य आहे? आपण मिळविलेल्या धर्म ज्ञानानें स्वत च्या मनाला शांति लाभली, कृतार्थ झालों, आतां लोकांना आपला धर्म सांगून काय उपयोग होणार? त्यांच्या समजुतीच्या विरुद्ध आपण कांहीं सांगू लागलों तर त्यापासून आपल्यालाच त्रास होईल, ते आपला उपहास करतील, आपणास छळतील, आणि आपला उपदेश कोणी ग्रहण करणार नाहीत त्यापेक्षा त्यांच्या वाटेलाच जाऊं नये हें बरें' असा विचार मनांत येणें हा मनुष्यस्वभाव मारांच्या रूपानें कविकल्पनेनें येथें चित्रित केलेला दिसतो, पण या मतलबी व निराशेच्या विचाराचें बुद्धाच्या दृढनिश्चयापुढें कांहीं चाललें नाहीं लोकांच्या छळाला भिऊन किंवा स्वत च्या लोभानें अंध होऊन कर्तव्यपराङ्मुख होणें हा अधमपणा आहे असें मानवप्राण्यांची शोचनीय स्थिति पाहून दयार्द्र झालेल्या बुद्धास वाटलें, आणि त्यानें आपणास प्राप्त झालेल्या दिव्यज्ञानाचा व सापडलेल्या सत्याचा लोकांत प्रसार करण्याचें व्रत निश्चयानें पतकरलें[1]

बुद्धत्वप्राप्तीनंतर सात आठवडेपर्यंत बोधिवृक्षाखालीं बसून बुद्धानें आपले विचार नीट तपासून पाहिले आणि नंतर लोकांना उपदेश करण्यासाठीं तो आषाढ शु० १५ रोजीं निघाला प्रथम रामपुत्र रुद्रक व ब्रा आपलीं धर्म तत्वें

---

१ महावग्ग ग्रंथांत लोकांना धर्मोपदेश करण्याविषयींची स्फूर्ति बुद्धाला महादेवाकडून मिळाली अशी कथा आहे ही कथाही रूपक असून महादेव म्हणजे मैत्री, करुणा, मुदिता आणि उपेक्षा या चार भावना (ज्यांना ब्रह्मविहार अशी संज्ञा आहे) होत महादेवानें म्हणणें बुद्धानें ऐकिलें म्हणजे 'त्याच्या अंत करणांत वास करणाऱ्या अमर्याद प्रेमानें, अगाध करुणेनें, सज्जनविषयींच्या मुदितेनें व जे कोणी त्याचें ऐकणार नाहींत किंवा अकारण शत्रु होतील अशांच्या उपेक्षेनें त्याला सद्धर्माचा प्रसार करण्यास प्रवृत्त केलें' असें प्रा० धर्मानंद कोसंबी यांचें मत आहे (बुद्ध, धर्म आणि संघ पृ १९।२०)

कळरावीं असें त्याच्या मनात आलें, पण तो परलोकवासी झाल्याचें कळलें. मग आलार कालाम याची त्याला आठवण झाली, पण त्याच्याही मृत्यूची खबर त्याला लागली तेव्हा मग आपले पूर्वाश्रमीचे सहाध्यायी (कौंडिण्य, भद्रजित्, वाप्प, महानाम, आणि अश्वजित्) या पाच भिक्षूंना भेटण्यासाठीं बुद्ध वाराणशी येथें गेला वाटेंत आजीवक नावाच्या वैष्णव साम्प्रदायातला उपाक नावाचा एक सन्याशी त्याला भेटला, व तुझी कोणत्या साम्प्रदायाचे सन्यासी आहा? असा त्यानें बुद्धाला प्रश्न केला बुद्धानें उत्तर केलें, 'मला साम्प्रदाय नाहीं जाति, वर्ण, वगैरे भेद न ठेवतां अखिल मानवजातींच्या दु खाचा नाश करण्याचा मार्ग मीं शोधून काढला आहे' तेथें मृगदाव नांवाच्या ऋषिपत्तनात वरील पाच भिक्षु होते त्यानीं दुरून बुद्धाला येतांना पाहिलें, आणि तपश्चर्या टाकून उठून गेलेला भ्रष्ट सिद्धार्थ तो हाच असें जाणून तिरस्कारानें त्याच्याकडे दुर्लक्ष करण्याचें ठरविलें पण जसजसा तो जवळ येत चालला, तसतसें त्याचें तेज पुन शरीर पाहून त्याच्या मनात त्याच्याविषयीं आपोआप आदर उत्पन्न झाला, आणि त्यानीं त्याचें स्वागत केलें बुद्धानें त्याना आपणास धर्मज्ञानाचा साक्षात्कार झाल्याचें सागून प्रवृत्ति व निवृत्ति या दोन्ही मार्गाचें अतिमात्र सेवन न करता म्हणजे शरीराला अत्यत क्लेश देणारीं चाद्रायणपराकादि कठोर व्रतें न करता व त्याचप्रमाणें ससारातल्या भोग्य वस्तूंच्या अतिमात्र सेवनात गर्क न राहता दोहोंमधला जो मध्यम मार्ग त्याने जाण्याविषयींचा उपदेश केला बुद्ध म्हणाला, 'या मध्यम मार्गाखेरीज निर्वाणप्राप्तीचा दुसरा उपाय नाहीं हा मध्यम मार्ग म्हणजे सम्यक् दृष्टि, सम्यक् सकल्प, सम्यक् वाक्, सम्यक् कर्मांत, सम्यक् आजीव, सम्यक् व्यायाम, सम्यक स्मृति व

---

१ यापूर्वी तप व भल्लुक असे दोघे व्यापारी दक्षिणेकडून उत्तरेकडे जात असता त्याला भेटले त्याना बुद्धानें आपल्या नव्या धर्माचा उपदेश केल्यावर ते त्याचे शिष्य झाले आणि हेच पहिले बुद्धोपासक होत अशी कथा कित्येक बौद्ध ग्रथात आढळते २ हा जैनधर्मी होता असें कित्येकांचें मत आहे

सम्यक् समाधि यांनी युक्त असा आर्य अष्टांगिक मार्ग हा होय.[1] त्याचप्रमाणें जन्म, जरा, व्याधि, मरण, अप्रियसंयोग, प्रियवियोग, ही सगळीं दुःखाला कारण होत. पुनर्जन्माला कारणभूत तृष्णा. हा दुःखाचा जननी आहे. या तृष्णेची निवृत्ति केली म्हणजे दुःखाचा नाश होईल, आणि हा नाश करण्याचा मार्ग म्हणजे आर्य अष्टांगिक मार्ग होय. याप्रमाणें दुःख (हेय), अज्ञान (हेयहेतु), दुःखनिरोध, आणि शेवटीं दुःखनिरोधगामिनी प्रतिपदा (अथवा हान म्हणजे ज्याच्यायोगानें दुःखाचा नाश होईल असा उपाय) हीं चार आर्यप्रमेयहा त्यानें त्या पांचजणांना समजावून सांगितलीं. बुद्धाच्या या पहिल्या उपदेशालाच बौद्धग्रंथकारांनीं **धर्मचक्रप्रवर्तन** असें नांव दिलें आहे. आणि याच वेळेपासून बुद्धाला तथागत, सम्यक्, संबुद्ध, नायक, विनायक, परिणायक, धर्मस्वामी, धर्मेश्वर, सिद्धमत, क्षेमकर, तमोनुद, महावैद्यराज, इत्यादि नांवें मिळालीं.

बुद्धत्वप्राप्तीपासून तों बुद्धाच्या परिनिर्वाणकालापर्यंतचा पंचेचाळीस वर्षांचा इतिहास सगतवार रीतानें लिहिलेला कोठेंही आढळत नाही. **त्रिपिटक** ग्रंथांत बुद्धानें ठिकठिकाणीं केलेल्या उपदेशाचें सार दिलेलें आहे. त्यावरून या काळांतील बुद्धाच्या चरित्राविषयींची जिज्ञासा भागवून घेणें भाग आहे.

वाराणशीहून बुद्ध उरुवेला (गया) येथें गेला. तेथें उरुवेलाकाश्यप, नदीकाश्यप, व गयाकाश्यप अशा तीन मोठ्या जटिल ब्राह्मणांना त्यानें आपल्या धर्माची दीक्षा दिली. तसेंच गयाशीर्ष येथें एक हजार अग्निहोत्र्यांना आदित्यपर्याय सूत्राचा उपदेश करून त्यांना आपले शिष्य बनविलें. नंतर राजगृह येथें जाऊन तेथील राजा बिंबिसार याला आपल्या धर्माची दीक्षा दिली. या

---

१ सम्यक्दृष्टी म्हणजे यथार्थ ज्ञान, सम्यक्संकल्प–कोणतीही गोष्ट करण्याविषयींचा मनाचा निश्चय, सम्यक्वाच्–योग्य शब्दांची (भाषेची) योजना, सम्यक् कर्मांत–योग्य कृत्यें, सम्यक् आजीव–उदरनिर्वाहाचें योग्य साधन, सम्यक् व्यायाम योग्य प्रकारचे यत्न, सम्यक्स्मृति–योग्य प्रकारचे विचार, सम्यक् समाधि–या प्रकारची मनाची शांतियुक्त स्थिति.

ठिकाणी संजय नावाचा एक परिव्राजक राहत होता त्याचे अडीचशें शिष्य होते. त्यांत सारिपुत्र व मोग्गलान ( मौद्गलायन ) हे दोन ब्राह्मण प्रमुख होते त्यांचें आपसांत असें ठरलें होतें कीं ज्याला मोक्षमार्ग आधीं सांपडेल त्यानें तो दुसऱ्यास सांगावा. एकदा बुद्धाचा अस्सजि ( अश्वजित् ) नावाचा शिष्य राजगृह नगरांत भिक्षाटन करीत असतां सारिपुत्राला भेटला तेव्हां सारिपुत्रानें त्याला विचारलें, "हे बंधा, तुमची मूर्ति प्रशांत व कांति शुद्ध आणि उज्वल आहे तुम्ही कोणाचे शिष्य आहां ? व तुमचा धर्मपंथ कोणता ?" अश्वजितानें उत्तर केलें, "शाक्यवंशी गौतमबुद्ध हे माझे गुरु आहेत, आणि त्यांचा धर्मपंथ तोच माझा" सारिपुत्रानें विचारिलें, "तुमच्या धर्माचें तत्व तरी कोणतें आहे ?" अश्वजितानें एका श्लोकांत तें सांगितलें तो श्लोक असा —

ये धम्मा हेतुप्पभवा हेतु तेसां तथागतो ।
तेसांच यो निरोधो एव वादी महासमनो ॥ १ ॥

अर्थः—सगळ्या वस्तु ज्या कारणापासून उत्पन्न झाल्या, तें कारण तथागतानें ( बुद्धानें ) आम्हांस सांगितलं आहे, व त्या कारणाचा नाश कसा करावा तेंही त्या महाश्रमणानें आम्हांस सांगितलें आहे

उत्पादशील वस्तूला क्षय आहे हें तत्व सारिपुत्राच्या लक्षांत तत्काळ आलें व दुःखाचा क्षय व अमृतत्वाचा साक्षात्कार कसा असतो हें त्यानें संजयापासून समजून घेतल्यावर तो मोग्गलान व इतर सहाध्यायी यांसह तथागताच्या दर्शनाला गेला तेथें तथागतानें आपल्या धर्माचें सार पुढील श्लोकांत सांगून त्यांना आपले शिष्य केले तो श्लोक असा —

सब्बपापस्स अकरणं कुसलस्स उपसंपदा ।
सचित्तपरियोदपन एतं बुद्धान सासनम् ॥ १ ॥

अर्थ—कोणत्याही प्रकारचें पाप न करणें, मंगलदायक कर्म आचरणें व आपलें चित्त शुद्ध ठेवणें हाच बुद्धाचा धर्म आहे

राजगृहात असताना बुद्धानें प्रवज्या (प्रव्रज्या) व उपसंपदा[1] याचे नियम ठरवून टाकले.

राजगृहाहून भगवान् बुद्ध कपिलवस्तूला गेले. तेथें असता त्याचा बाप राजा शुद्धोदन लवाजम्यासह त्याच्या भेटीस आला होता. पण बुद्धानें आपल्या हातात भिक्षापात्र घेतलेलें पाहून तो अत्यंत लज्जित व कोपायमान झाला, आणि

---

१ प्रवज्या म्ह० गृहस्थाश्रमाचा त्याग प्रव्रज्येचा स्वीकार करण्याबद्दलचे जे नियम यावेळीं ठरले त्यातले मुख्य मुख्य हे होते —(१) प्रव्रज्या घेऊ इच्छिणारानें प्रथम कोणातरी भिक्षुला बोलावून त्याला एक काषायवस्त्र द्यावें व प्रव्रज्या घेण्याची आपली इच्छा त्याच्याजवळ त्रिवार बोलून दाखवावी (२) मग 'मला त्रिशरण व दशशील द्या' अशी नम्रभावानें प्रार्थना करावी (३) मग 'मी बुद्ध, धर्म, आणि संघ याचा आश्रय करतों' असें त्रिवार म्हणावें (४) त्यानंतर दशशील म्हणजे पुढील दहा आज्ञा द्याव्या-(अ) मी प्राणिवध करणार नाहीं, (आ) परद्रव्याचा अपहार करणार नाहीं, (इ) व्यभिचार करणार नाहीं, (ई) खोटें बोलणार नाहीं, (उ) मद्य वगैरे मादक पदार्थ पिणार नाहीं, (ऊ) अपरात्रीं भोजन करणार नाहीं, (ऋ) नृत्य, गान, वाद्य व उत्सव पाहणार नाहीं. (ॠ) अगावर भूषणें घालणार नाहीं, पुष्पमाला धारण करणार नाहीं, व गंध लेपनही करणार नाहीं, (ए) उच्चासन व उच्चशय्या, महासन व महाशय्या, याजवर बसणार नाहीं, (ऐ) सुवर्ण व रौप्य याचें दान घेणार नाहीं. या दशशीलाच्या आज्ञा विनयपिटक ग्रंथावरून घेतल्या आहेत महावस्तु, अष्टमाहस्रिका वगैरे महायान ग्रंथात या थोड्याशा निराळ्या रीतीनें दिल्या आहेत. मनुसंहितेंतही 'धृति क्षमा दमोऽस्तेयं शौचमिन्द्रियनिग्रह । धीर्विद्यासत्यमक्रोधो दशकं धर्मलक्षणम्' असें सांगून हीं दहा कर्तव्यें चारी आश्रमांच्या मार्गे मारखीं लावून दिलीं आहेत ख्रिस्ती लोकांच्या दहा आज्ञा बायबलांत Exodus chapter XXमध्यें दिल्या आहेत त्या जवळ जवळ अशाच आहेत त्या पहाव्या.

२ उपसंपदा म्हणजे भिक्षूंच्या संघात प्रवेश. ज्याला उपसंपदा घ्यावयाची असेल त्याला एक भिक्षापात्र, एक अंतर्वास (आतील वस्त्र), एक बाहेर पांघरण्याचें

म्हणाला हे 'वत्स! तू आमच्या राजकुलाला बट्टा लाविला आहेस तुला व तुझ्या शिष्यमंडळीला अन्न देण्याइतकी आमची शक्ति नाही असें तू समजतोस काय ?' बुद्धानें उत्तर केलें, 'महाराज भिक्षा मागणें हा आमचा कुलधर्मच आहे' हें उत्तर ऐकून राजा चकित झाला, आणि 'हें कसें?' असें त्यानें विचारलें बुद्ध म्हणाला 'पूर्वी होऊन गेलेले बुद्ध हे माझे पूर्वज होत त्यांनीं भिक्षा मागण्याचा जो संप्रदाय घालून दिला तोच मी पुढें चालवीत आहे एखाद्याला गुप्त धन प्राप्त झालें तर त्यानें त्यांतलें उत्कृष्ट रत्न असेल तें आपल्या पित्याला अर्पण करणें उचित आहे म्हणून मला जो अमूल्य रत्नसंग्रह प्राप्त झाला आहे त्यांतील एक दोन निवडक रत्नें मी आपणास अर्पण करतों त्यांचा आपण स्वीकार करावा तीं रत्नें हीं —

> उत्तिट्ठे नप्पमज्जेय्य धम्मं सुचरितं चरे।
> धम्मचारी सुखं सेति अस्मिं लोके परम्हि च ॥ १ ॥
> धम्मं चरे सुचरितं न तं दुच्चरितं चरे।
> धम्मचारी सुखं सेति अस्मिं लोके परम्हि च ॥ २ ॥

*अर्थ —उठा आळशी होऊं नका सद्धर्माचें आचरण करा धर्माचें आचरण करणाराला इहपरलोकीं सुख मिळतें सत्कर्म करा असत्कर्म करूं नका; धर्माचरण करणारा इहपरलोकीं सुखी होतो*

---

वस्त्र व एक अंगावर घेण्याचें उत्तरीय याप्रमाणें चार वस्तु उपाध्यायापुढें ठेवाव्या लागतात मग तो उपाध्याय भिक्षूंच्या संघापुढें नेऊन 'तुम्हाला कांहीं रोग नाहींना? तुम्ही राजांलुचीनें उपसंपदा घेता ना? तुम्हाला कोणाचें ऋण नाहीं ना? तुम्हीं वडील माणसांची परवानगी विचारली आहे ना?' वगैरे प्रश्न विचारतो, आणि त्याचीं योग्य उत्तरें मिळाल्यावर 'याला संघांत घेतां काय?' असें भिक्षूंना विचारतो कोणी हरकत केली नाहीं तर स्तब्धता म्हणजे संमति असा अर्थ घेऊन त्याला संघांत प्रविष्ट करतो मग त्याला भिक्षान्न जीर्णवस्त्र वृक्षतलवास, गोमूत्र हें घ्यावें लागतें संघांत प्रवेश केल्यावर तो नवें नांव धारण करतो

येथें निर्देश करतों बौद्धधर्माचा दीक्षा घेतलेला एक शिष्य धर्मोपदेश करण्यासाठीं दशातरास जाण्यास निघाला असतां बुद्धानें त्याला म्हटलें, 'हे शिष्य! तू ज्या देशीं उपदेश करण्यास जात आहेस, तेथाल लोक दुष्ट, कडवे, व अत्याचारी आहेत ते तुझा निंदा करू लागले किंवा अपशब्द बोलू लागले, तर तू काय करशील?' त्यानें उत्तर केलें, 'मी चूप बसेन' बुद्धानें म्हटलें, 'आणि त्यानीं तुला धरून मारिलें तर?' शिष्य म्हणाला, 'मी त्यांना उलटून मारणार नाहीं,' 'आणि त्यानीं तुला धरून ठार मारण्याच्या प्रयत्न चालविला तर?' शिष्य म्हणाला, 'मी त्याचे आभार मानीन, कारण कीं त्यामुळें या ससारात जे त्रिविध ताप भोगावे लागतात त्यातून माझी आयतीच सुटका होईल म्हणून मी त्यांच्या प्रयत्नाला विरोध करणार नाहीं' शिष्याचें हें उत्तर ऐकून बुद्ध फार सतुष्ट झाला, आणि धर्मोपदेश करण्यास हाच पुरुष योग्य आहे असा विचार करून त्यानीं त्या शिष्याला आशिर्वाद देऊन कामगिरीस पाठविलें

किसा गौतमी या नावाची एक स्त्री होती तिचा एकुलता एक मुलगा सर्पदंशानें मरण पावला कोणी तरी सर्पदंशावर औषध सागा म्हणून ती दारोदार हिंडली पुत्रशोकानें ती इतकी वेडी झाली होती कीं, मेलेल्यास औषध कोठून जिवंत करणार ही गोष्ट तिच लक्षांत येईना आणि ती धाय मोकलून रडत, येणाऱ्या जाणाऱ्याचे पाया पडत, आपलें दुःख सगळ्यास सागू लागली तेथें काहीं टवाळखोर मडळी होतीच त्यानीं बुद्धाकडे बोट दाखवून तिला सागितलें कीं, तू आपले मुलाला घेऊन त्याच्याकडे जा त्याप्रमाणें गौतमी बुद्धाजवळ आली आणि पुत्राच्या प्राणदानार्थ हातापायां पडून याचना करूं लागली बुद्धानें तिची समजूत पडण्याकरितां म्हटलें, 'ठीक आहे मला एक मूठभर मोहऱ्या आणून दे म्हणजे मी औषध करून देतों मात्र शर्त ही कीं, ज्या घरून मोहऱ्या आणशील, त्या घरच्या माणसापैकीं बाप, आई, नवरा, मुलगा, बायको, चाकर कोणीही पूर्वी मेलेलें असू नये' गौतमीं ही अट लक्षात ठेवून मोहऱ्या आणण्यासाठीं निघाली, पण ज्या ज्या घरीं ती जाई, त्या त्या घरीं कोणीना कोणी तरी पूर्वी मेलेलें आहेच व जिवंत असलेल्या माणसापेक्षा

मृत माणसाचीच संख्या मोठी आहे असें जिकडे तिकडे तिचे दृष्टीस पडलें. तिला पाहिजे होतें तशा प्रकारचें घरच तिला कोठें सापडेना. तेव्हां अर्थात च ती हात हालवीत परत आली, आणि कोणीही मेलें नाहीं अशा प्रकारचें एकही घर नाहा असें ती सांगूं लागली. तेव्हा हा जन्म किती क्षणभंगुर आहे याचा उपदेश करून बुद्धानें तिचें शांतवन केलें

काहीं बौद्ध भिक्षु एके दिवशीं बुद्धाकडे येऊन त्याला म्हणूं लागले कीं, 'भगवन्, भिक्षूनीं स्त्रियाशा कशा प्रकारें आचरण करावें तें कृपा करून सांगावें.'

बुद्धः—त्याच्याकडे पाहूं सुद्धा नये.

भिक्षुः—आणि त्या आपल्या डोळ्यासमोर येऊन उभ्या राहिल्या तर?

बुद्धः—तरीही त्यांच्याकडे पाहू नये, व त्याच्याशीं बोलूं नये.

भिक्षुः—आणि त्या आपण होऊन आमच्याशीं बोलू लागल्या तर?

बुद्धः—तर मनात कोणताही वाईट भाव न धरता पद्मपत्रावरील जलबिंदूप्रमाणे मनाला स्वच्छ व निर्लिप्त राखावें. आपल्याहून वडील असतील अशा स्त्रियांना मातेप्रमाणें, तरुण असतील त्याना भगिनीप्रमाणें, व लहान असतील त्याना मुलीप्रमाण समजावें परस्त्रीकडे कामदृष्टीनें पाहण्यापेक्षा लोखंडाच्या तापलेल्या सळ्या भोसकून अशा पापी डोळ्यांच्या खांचा केलेल्या बऱ्या. स्त्रियांचे हावभाव व लावण्य मनुष्याचें अंत करण कितीही कठोर असलें तरी त्याला वश करून घेतात. म्हणून त्याचें हास्य व अश्रु हे पुरुषाचे शत्रु होत त्यांचा भुजलताबंध सोडविणे अशक्य आहे. त्यांचा केशपाश तर मुनिजनांचे सुद्धां चित्तास विक्षोभ उत्पन्न करतो. यासाठीं सावधान असा, आत्मसंयमन करा, कामवासनेला चित्तांत बिलकुल थारा देऊं नका, स्त्रियांचे सान्निध्यास उभे राहू नका, आणि आपलें श्रमणाचें मन ढळूं देऊं नका.'

याप्रमाणें बुद्ध आपल्या शिष्यांना पोडक्यांत पण मनांत भटकर बिंबणारे उपदेश करीत असे.

याप्रमाणें बुद्धानें ४५ वर्षे लोकांना धर्मोपदेश करून त्यांना सन्मार्गास लावण्यांत घालविलीं. या ४५ वर्षांचे अवधींत त्याची दिनचर्या कशी असे तें जाणण्याची उत्सुकता वाचकांना असणें साहजिक आहे. म्हणून त्याविषयीं थोडेसें सांगून हें प्रकरण संपवितों.

**बुद्धाची दिनचर्याः**—बुद्ध भगवान् पहाटेस उठत असत. त्यावेळीं ते ध्यान करीत किंवा विहाराच्या बाहेरच्या बाजूस चंक्रमण (इकडून तिकडे शांतपणे फिरणें) करीत. सकाळीं उठून भिक्षेसाठीं ते गांवांत प्रवेश करीत. तेथें कोणीं कांहीं प्रश्न विचारला तर त्याचें त्याला उत्तर देत, व मग त्याला उपदेश करून सन्मार्गाला लावीत. कृषि, भारद्वाज, शृगाल इत्यादिकांना त्यांनीं अशाच प्रसंगीं उपदेश करून सन्मार्गाला लाविलें. भिक्षापात्रांत जी ओली भिक्षा एकत्र होई, ती घेऊन ते विहारांत परत येत असत. व दुपारचे बारा वाजण्यापूर्वी भोजन करीत असत. भोजनोत्तर थोडाशी विश्रांति घेऊन मग ध्यान करीत. संध्याकाळीं गृहस्थाला किंवा भिक्षूला उपदेश करीत. रात्रीं पुनः ध्यान करीत अथवा चंक्रमण करीत. मध्यरात्रीचे सुमारास ते उजव्या कुशीवर पायावर पाय ठेवून व उशाला हात घेऊन निजत असत. या त्यांच्या निजण्याला सिंहशय्या असें म्हणतात. ज्यावेळीं ते प्रवासास जात, त्यावेळीं बहुधा त्यांच्याबरोबर भिक्षूंचा बराच मोठा समुदाय असे. सकाळीं एका गांवामध्यें भिक्षाग्रहण करून दुसऱ्या गांवामध्यें रात्रीं मुक्कामाला जात. जेथें विहार नसेल तेथें ते धर्मशाळेंत किंवा एखाद्या बागेमध्यें रहात. कोणी पूर्वदिवशीं आमंत्रण केलें असतां भिक्षूंच्या समुदायासह ते त्याच्या घरीं भिक्षा ग्रहण करीत असत.

बुद्धाच्या चारित्र्याच्या बाह्यस्वरूपाचें वर्णन येथपर्यंत झालें. आतां त्याच्या भोंवतालीं जी त्याची शिष्यमंडळी असे त्यांचा व त्याचप्रमाणें त्याचे जे प्रतिपक्षी व समकालीन होते त्यांचा थोडासा परिचय पुढल्या प्रकरणांत करून देऊं.



# प्रकरण १० वें.



## बुद्धाचे शिष्य, शत्रु आणि समकालीन पुरुष.

[ विषय—बुद्धाचे शिष्य आणि जात्यभिमान-शिष्य व शिष्यिणी यांचे दोन वर्ग-आनंद-सारिपुत्र व मोग्गलान-राहुल-राजा बिंबिसार-कोसलाधिपति पसेनादि-जीवक-अनाथपिंडक-पूर्ण-शिष्यिणी-महाप्रजावती गोतमी-खेमा-उत्पलवर्णा-किसा गोतमी-विशाखा-इतर शिष्यिणींचीं नांवें-बुद्धाचे शत्रु-बौद्ध-धर्म व ब्राह्मणधर्म याच्या मधील संबंध-देवदत्त-नंद-मागधी-चिंचा-सुप्रबुद्ध-समकालीनव्यक्ति-पूरणकाश्यप-मस्करीगोशाल-अजित केशकंबल-ककुधकात्यायन-संजयबेलाठ्ठिपुत्र-निर्ग्रंथज्ञातिपुत्र. ]

जिकडे जिकडे भगवान् बुद्ध जात तिकडे तिकडे त्यांच्या अंगच्या तेजस्वितेमुळें म्हणा किंवा आकर्षणशक्तीमुळें म्हणा, बौद्धधर्माच्या अंगच्या चांगुलपणामुळें अथवा नावीन्यामुळें म्हणा, अगर ब्राह्मणधर्माला उतरती कळा लागल्यामुळें त्याला कंटाळून म्हणा, पण घरेच लोक त्याचें शिष्यत्व पतकरण्याला पुढें येत. स्त्रियेंच तर संसाराचा त्याग करून बुद्धासारखें संन्यस्तवृत्तीनें राहण्यास सुखी असत संन्याशाला काषायवस्त्रपरिधान व शिरोमुंडन या दोन गोष्टी कर्तव्य म्हणून ब्राह्मणधर्मांत सांगितलेल्या होत्या बुद्धानें त्या बऱ्या आहेत असें पाहून आपल्या शिष्यांपैकीं जे संन्यास धर्मानें राहण्यास कबूल होते त्यांच्यामागें त्या लावून दिल्या. फरक येवढाच केला कीं, भगव्या वस्त्राऐवजीं पिवळीं वस्त्रें बौद्धसंन्याशांनीं वापरावीं असें ठरविलें. बुद्धाच्या शिष्यांत सर्व जातींचे व दर्जाचे लोक होते, आणि त्यांच्यांत भेदाभेद न करतां सर्वांना सारख्या रीतीनें वागविण्यांत येत असे. बौद्धधर्मांतला हा विशेष तो धर्म सामान्यजनसमूहास प्रिय होण्याला मुख्यत. कारण झाला. बुद्धाला जो कोणी शरण येईल त्याचा जात्यभिमान गळाला पाहिजे , । विषयीं बुद्धाचा विशेष कटाक्ष होता असें दिसतें राजा अजातशत्रु यानें

बुद्धाला एकदा विचारलें कीं घरदार सोडून, बौद्धधर्म स्वीकारणाराला या जन्मीं कोणतें बक्षीस मिळणार आहे? यावर बुद्धानें म्हटलें कीं "समजा, एखाद्या अगदीं हलक्या प्रतीच्या नोकरानें प्रपंचाचा त्याग करून पिवळीं वस्त्रें धारण केलीं, आणि बौद्धसंन्याशाच्या नियमाप्रमाणें काया, वाचा, व मन यांना न विटाळतां शुद्ध आचरण ठेविलें तर अशा स्थितींत तुम्ही त्याच्या संबधानें, 'तो माझा नोकर आहे, त्यानें माझ्या पुढें वाकलेंच पाहिजे, माझी सुकी झल ण्याला तयार राहिलें पाहिजे, आणि माझ्या चैनी चालविण्याला लागतील त्या गोष्टी त्यानें आणून दिल्या पाहिजेत असें म्हणण्यास तयार व्हाल काय?" यावर, 'अशा शुद्ध व पवित्र आचरणाच्या माणसें कडून वर सांगितल्या प्रका रची सेवा घ्यावी असें कोणालाही वाटणार नाहीं, उलट त्याचा सत्कार करावा, त्याच्या उपयोगीं पडावें, तो आजारी पडल्यास औषधपाणी द्यावें, व एरव्हीं त्याचा योगक्षेम चालविण्यास मदत करावी असें मला वाटतें' अशा अर्थाचें उत्तर अजातशत्रूनें दिलें, आणि प्रत्येक विचारी मनुष्य वरील प्रश्नाचें उत्तर अशाच रीतीनें देईल यांत शंका नाहीं गौतमबुद्धाला समाज सुधारकाचा अग्रणी असें सामान्य पद कित्येक ग्रंथकार लावितात वास्तविक बुद्धानें एकंदर समाजांतला जातिभेद मोडण्याचा यत्न कधीं केलेला दिसत नाहीं त्यानें आपल्या भिक्षुसंघात मात्र जातिभेदाला तिळमात्र जागा दिली नाहीं ही गोष्ट खरी आहे जातिभेद प्रपंचात वागणारानें अवश्य पाळला पाहिजे कीं काय याविषयीं बुद्धाचें मत काय होतें तें आपणास ठाऊक नाहीं पण ज्यानें प्रपंचाचा त्याग करून संन्यासदीक्षा घेतली त्यानें हा जातीभेदाचा पाश काय म्हणून लावून घ्यावा? असें त्याचें विचारणें असे

बुद्धाच्या शिष्यमंडळांत सारीपुत्र, मोग्गलान, कौंडिण्य व कात्यायन यांच्यासारखे विद्वान् व तेजस्वी ब्राह्मण होते, आनंद, राहुल, अनुरुद्ध, यांसारखे उच्चकुलीन क्षत्रिय होते, यशासारखे धनाढ्य व्यापारी व अतिशय सन्मान्य असे शेटसावकार होते, आणि त्याचप्रमाणें सुनीत हा भंगी, अंगुलीमाल हा रामोशासारखा चोरींचा धंदा करणारा, स्वाति हा कोळी, नंद हा गवळी, आणि उपाली हा न्हावी, असे हीन जातींचे लोक होते बुद्धाच्या शिष्यिणींत

कित्येक हलक्या जातीच्या स्त्रिया होत्या उदाहरणार्थ—चपा ही एका पारध्याची मुलगी होती, पूर्णा ही दासीची मुलगी होती, विमला ही वेश्येची मुलगी असून अवपाली ही स्वत वेश्या होती या शिष्यांपैकी आणि शिष्यिणींपैकी काही ठळक व्यक्तिविषयीची माहिती बुद्धचरित्राचे खरे ज्ञान होण्यास अवश्य असल्यामुळे ती येथे सक्षेपत देतो

बुद्धाच्या शिष्याचे व शिष्यिणींचे असे दोन वर्ग होत ज्यानी प्रपच सोडून सन्यासदीक्षा घेतली होती त्याना भिक्षु व भिक्षुणी म्हणत व जे प्रापचिक होते पण बुद्धाला गुरुस्थानी मानीत, त्याना उपासक व उपासिका अशी सज्ञा होती.

१ आनंद —पहिल्या म्हणजे भिक्षूच्या वर्गात प्रमुख शिष्य आनद हा होता हा शाक्यवशीय क्षत्रिय असून बुद्धाच्या भाऊबदापैकी होता ह्याने पचवीस वर्षे बुद्धाची एकनिष्ठपणे सेवा केली जसा रामदासाचा पट्टशिष्य कल्याण, तसा बुद्धाचा आनद हा होता बुद्धाला कोणीही भेटण्यास, त्याचा उपदेश घेण्यास, किंवा प्रश्न विचारण्यास आला, तरी आनद हा सदोदित त्याच्याजवळ असे बुद्धाने आपले अनेक मनोगत विचार आनदाला कळविले होते त्यामुळे बुद्धाच्या पश्चात् धर्मविषयक मुद्यासबधाने वाद होत, तेव्हा बुद्धाचे मनोगत त्याविषयी काय होते हे आनदाने सांगितले म्हणजे वादाचा निकाल बहुधा लाग

केलें, 'महाराज, तें काम म्हणजे मोठेसें कठीण आहे असें नाहीं पण त्या मानगर्दीत पडण्याचें मला प्रयोजन नाहीं कारण, माझ्या पूर्वकर्मफलामुळें येत्या आठवड्यातच मला देहत्याग करावा लागणार आहे ' असें म्हणून त्यानें राजाला आपल्या अगच्या अलौकिक धीरपणाची प्रतीति दाखविली आणि म्हटल्याप्रमाणें सातव्या दिवशीं त्याला निर्वाणाची प्राप्ति झाली.

सारीपुत्र हा नालद येथें राहत असे ज्या दिवशीं मोग्गलान निर्वाणाला गेला, त्याच दिवशीं सारिपुत्रानेंही देह ठेविला. हे दोघेहा बुद्धाचे प्रमुख शिष्य होते म्हणून यांना अग्रश्रावक म्हणत असत

४ **राहुल**—बुद्धाचा पुत्र राहुल हाही शिष्यापैकीं एक होता याला संन्यासदीक्षा केव्हा, कोणत्या प्रसगीं व कशा प्रकारें देण्यात आली त्याविषयाची अत्यत हृदयद्रावक कथा मागचे प्रकरणीं देण्यात आलीच आहे याचा गणना बुद्धाच्या प्रमुख शिष्यामध्ये कोणत्या कारणास्तव करण्यात येते त्याविषयीं जास्त माहिती उपलब्ध नाहीं ही मोठी दु खाची गोष्ट म्हटली पाहिजे

याशिवाय कात्यायन, व कौंडिण्य असे दोघे शिष्य होते पण याच्याविषयीं काहींच माहिती मिळत नाही

उपासकांत प्रमुख म्हटले म्हणजे मगधाचा राजा बिंबिसार, कोसलाधिपति पसेनादि, जीवक, अनाथपिंडिक, व पूर्ण हे होत या प्रत्येकाची थोडथोडी माहिती येथें देणें अवश्य आहे.

१ **राजा बिंबिसार**—बुद्धाच्याकाळीं उत्तर हिंदुस्तानात जे राजे अत्यत बलिष्ठ होते त्यांत राजा बिंबिसार याची गणना होते सिद्धार्थानें महाभिनिष्क्रमण ( गृहत्याग ) केल्यानतर दोनदां त्याची व बुद्धाची गांठ पडली होती पैकीं पहिल्या भेटीच्या प्रसगीं त्यानें घरीं परत जाऊन राज्यसुख भोगण्याविषयीं सिद्धार्थाचें मन वळविण्याचा प्रयत्न केला होता, पण सिद्धार्थाचा निश्चय ढळला नाही. दुसऱ्या प्रसगीं बुद्धानें त्याला आपल्या धर्माचीं तत्त्वें समजावून दिलीं वगैरे हकीगत पूर्वीच्या प्रकरणांत आलेलीच आहे बिंबिसाराचें बुद्धावर विशेष प्रेम होतें तो अत्यत भाविक व धार्मिक वृत्तीचा होता.

१ कोसलराज पसेनादि (प्रसेनजित)—हा मगधराज बिंबिसार याचा मेहुणा (बायकोचा भाऊ) होता याच्या संबधाची हकीकत मागें पृ० ६११६२ येथें दिली आहे ती पहावी हा बौद्धधर्मी होता हा रोज ५०० भिक्षूना अन्नदान करीत असे पण काहीं केल्या त्या भिक्षूचा तृप्ति होईना तेव्हा एके दिवशीं त्यानें त्या भिक्षूना म्हटलें, "हे भिक्षूनो, आपण दरिद्री लोकांच्या घरीं भोजनाला जाता, आणि तेथें जी कांहा ओलीकोरडी भाकरी मिळते तिनें तुमचा तृप्ति होते, आणि मी येथें तुम्हाला रोज सुग्रास भोजन देतों तरी तुमची तृप्ति होत नाहा याचें कारण काय ?" तेव्हा भिक्षूनीं उत्तर केलें, 'महाराज, श्रद्धा ही अन्नाला गोडी देणारा असते दारद्री मनुष्य जे देतो तें श्रद्धायुक्त असतें अर्थात् त्याला गोडी अधिक, म्हणून लवकर तृप्ति होते' ही स्पष्टोक्ति ऐकून प्रसेनजित् राजाचा श्रद्धा बौद्धभिक्षूचे ठायीं विशेष जडली प्रसेनजित् व बिंबिसाराचा पुत्र अजातशत्रु यान्यामध्यें झालेल्या युद्धाची हकीकत मागें ६ व्या प्रकरणात आलाच आहे तें युद्ध करून प्रसेनजित् आपल्या राजधानीला परत येत असता वाटेत मल्लिका नावाचा माळिणीची एक मुलगा त्याच्या दृष्टास पडली तिच्या सौंदर्याला व अगत्या गुणाना लुब्ध होऊन प्रसेनजितानें तिच्याशा विवाह करून तिला महिषीपद (पट्टराणीचें पद) दिलें या मल्लिकेची बुद्धाचे ठायीं विशेष श्रद्धा त्याचे पूर्वी पासून जडली होती असें वर्णन आढळतें

२ जीवक—याचें संबध नाव जीवक कुमारभच्च (कुमारभृत्य) असें होतें हा बिंबिसाराचा पुत्र अभय, याचा पुत्र होता आपणास आपले भाऊ-बद राज्याची गादी मिळू देणार नाहींत असें वाटून तो अगोदरपासूनच सावध होता, आणि चरितार्थाचें साधन म्हणून तक्षशिला येथील विद्यापीठात त्यानें आचार्य अत्रेय याचे पाशीं आयुर्वेदाचें उत्कृष्ट अध्ययन केलें होतें अशी गोष्ट

१ तक्षशिला ही गाधार (अर्वाचान कदाहार) देशाची राजधानी होती जीवक हा मगध देशातला (सध्याचा बहार प्रात) राहणारा असें असतां इतका दूर विद्या शिकण्यासाठीं गेला होता तक्षशिलाविद्यालयाची ख्यातिच

सांगतात की त्याचें अध्ययन सपल्यावर आचार्यांनीं शिष्याची परीक्षा करण्या साठीं त्याला म्हटलें कीं 'या विद्यालयाच्या आसपास १६ मैलांत औषधाच्या उपयोगीं नसतील अशा वनस्पति तू धरून ये ' जीवक पुष्कळ हिंडला, पण अशी वनस्पति त्याला सापडेना तो हात हलवीत आला, आणि निरुप योगी वनस्पति सापडत नाहीं ' असें सांगू लागला तेव्हां आचार्य प्रसन्न झाले, आणि त्यानीं त्याला आशीर्वाद देऊन घरीं जाण्यास परवानगी दिली याच्या हाताला विलक्षण प्रकारचें यश होतें यानें हातीं धरलेला असाध्य रोगी सुद्धा सहसा दगावत नसे ही त्याची कीर्ति एकून राजा बिंबिसार यानें त्याला आपल्या पदरीं राजवैद्य म्हणून ठविलें होते याची बुद्धाचे ठायी विल क्षण श्रद्धा जडली होती व त्यानें आपलें एक आम्रवन बुद्धाला अर्पण केलें होतें राजा अजातशत्रूचें मन अखेर अखेर बुद्धाकडे वळण्यास तोच कारण झाला होता या विषयींची एक कथा आहे ती अशी की राजा अजात शत्रु एकदा आपला दरबारचा वगैरे कामें आटोपून राजा आपल्या उद्यानांत आराम करण्यासाठीं बसला होता चांदणी रात्र होती कमलें विकसलीं होतीं सुगंधि पुष्पाच्या परिमळानें दशदिशा व्यापिल्या होत्या उंच उडणारीं कारंजीं उद्यानाच्या रमणीयतेंत भर टाकून मनाला प्रसन्न करीत होतीं पण राजा अजातशत्रु याच्या हातून घडलेल्या अनेक दुष्ट कृत्यांनीं त्याच्या मनाला

---

तशी हाती ज्याप्रमाणें सध्याच्या काळचे ठळक इंग्रजी मुत्सद्दी इटन किंवा हॅरो या नामांकित विद्यालयांतलेच बहुधा असावयाचे तसे त्या काळचे प्रसिद्ध विद्वान् तक्षशिला किंवा नालंदा येथील विद्यालयांतले बहुधा असत असें दिसतें सुप्रसिद्ध व्याकरणा चार्य पाणिनि व राजनीतिज्ञ चाणक्य हे तक्षशिला येथील विद्यालयाचे छात्र होते असें म्हणतात या ठिकाणीं प्रत्येक शास्त्राचे अध्यापक आपापल्या विषयांत पूर्ण निष्णात असेच असत वैद्यक शास्त्राचे आचार्य अत्रेय यांच्याविषयीं वाग्भटाच्या अष्टांगहृदय नामक सुप्रसिद्ध ग्रथांत म्हटलें आहे—'अथाः स्मृत्वायुषो वद प्रजा पतिमजीमहृद् । सोऽश्विनौ तौ सहस्राक्ष सोऽत्रिपुत्रादिकान् मुनीन्' ॥ शिवाय आणखी ग्रहीं या अत्रेयाचा (अत्रिपुत्राचा) जो उल्लेख आहे त्यावरून हा इ स पूर्वी ६०० वर्षे झाला असावा असें दिसतें

एक सारखी रोचणी लाविली होती. ती त्याला चैन पडूं देईना. ऐहिक सुखाच्या साधनानीं त्याचें मन रमेना. चित्त शांत करण्याला पारमार्थिक उपदेशाची अवश्यकता त्याला वाटू लागली. राजवैद्य जीवक हा जवळच होता. त्यानें राजाचे मनाची अस्वस्थता ओळखून बुद्धाची थोरवी वर्णन करण्यास सुरवात केली, आणि त्याच्या उपदेशानें हजारों माणसांच्या आयुष्यक्रमाला कसें निराळें वळण लागलें आहे तें रसभरित शब्दानीं सांगून बुद्धाला शरण जाण्याविषयीं राजाचें मन वळविलें. राजा लागलीच गजारूढ होऊन बुद्धाकडे गेला, आणि जीवकानें म्हटल्याप्रमाणें खरोखरच बुद्धाचा उपदेश ऐकून राजाचें मन स्वस्थ झालें व त्यानें बुद्धाचें शिष्यत्व पतकरलें

वैद्यकीच्या कामात जीवकाचा हातखंडा असे यामुळें अपस्मार, यक्ष्मा, कुष्टरोग वगैरे असाध्य रोगानीं पीडित झालेले रोगी शेंकडो कोसावरून त्याच्याकडे येत. त्यातले जे सुखवस्तु होते ते त्याच्यापुढें द्रव्याच्या राशी ठेवीत, पण द्रव्याला वश होणारा तो नव्हता बौद्धधर्मावर त्याची श्रद्धा असल्यामुळें बौद्ध भिक्षूकडे त्याचा विशेष ओढा असे, आणि त्याना तो अगोदर पाहून फुकट औषधपाणी देई ही त्याच्या मनाची प्रवृत्ति पाहून गरजू लोक त्याच्याकडे येण्यापूर्वी बौद्ध मठात प्रवेश करीत, आणि बौद्ध भिक्षु होऊन मग त्याच्याकडे जात, म्हणजे त्याच्या मनाप्रमाणें काम होत असे. पण हे बोलून चालून मतलबाकरितां भिक्षु झालेले लोक रोगमुक्त होतांच मठाचा त्याग करून पूर्ववत् संसारी बनत. यामुळे यक्ष्मा, अपस्मार, कुष्टरोग वगैरे रोगानीं पीडित असलेल्याना संघात घेऊ नये असा कडक निर्बंध घालणें बुद्धाला भाग पडलें

## अनाथपिंडिक.

हा श्रावस्ति येथील एक श्रीमान् श्रेष्ठी ( सावकार ) होता. बुद्धाचे उपदेश ऐकून याचें मन त्याचेठायीं इतकें जडलें कीं, बुद्धाला राहण्यासाठी

१ श्रावस्ती (सावथी) ही उत्तरकोसल राज्याची राजधानी होती बुद्धाच्यावेळीं जीं सहा मोठाली भरभराटीचीं शहरें होतीं त्यात श्रावस्ती हें एक होतें

म्हणून गावाबाहेर पण जवळच असें एक उपवन त्यानें तेथील राजकुमार जेत याचेपासून १४ कोट रुपयाला विकत घेतलें व त्यांत एक उत्तम विहार बांधून तें बुद्धाला अर्पण केलें हें जेठवन या नांवानें बौद्धग्रथात प्रसिद्ध आहे या ठिकाणीं बुद्धानें शिष्याना कित्येक वेळा सुंदर उपदेश केले होते

या अनाथपिंडिकानें आपली अपार संपत्ति बुद्धाला वाहिली इतकेंच नाही तर, आपल्या दोन कन्या-महासुभद्रा व चुल्लसुभद्रा-याही संघाच्या सेवेला अर्पण केल्या असें बौद्ध ग्रथात लिहिलें आहे

## पूर्ण.

बुद्धाचा दुसरा एक अत्यन्त निष्ठावान् उपासक म्हणजे गुरापरान्त देशचा व्यापारी पूर्ण हा होता हा धंद्याच्या निमित्तानें श्रावस्ति येथें आला असता तेथें जेठवनात बुद्धाचा उपदेश ऐकण्याचा योग त्याला सुदैवानें प्राप्त झाला आणि तेथेंच त्याला उपरति होऊन त्यानें दीक्षा घेतली तेथें काहीं काळ राहिल्यावर बौद्ध धर्माचा प्रचार आपल्या देशात करावा म्हणून तो जाऊं लागला, तेव्हां पृ० १०७ वर सांगितलेला संवाद तो व बुद्ध यांच्यामध्यें झाला ज्या निश्चयानें तो निघाला, तो निश्चय त्यानें अक्षरशः पाळून बौद्ध धर्माच्या प्रचारकाचें काम फार आस्थेनें केलें

## शिष्यिणी.

स्त्रियाना सन्यास दीक्षा देऊन त्याना भिक्षुणीच्या वृत्तीनें संघात राहू देण्याचें प्रथम बुद्धाचे मनात नव्हतें तसें केलें असता संघांत अनाचार वाढेल व ती गोष्ट त्या संस्थेच्या नाशाला अखेर कारण होईल असें बुद्धाचें मत होतें. म्हणून त्याची मावशी व सावत्र आई महाप्रजापती गौतमी ही पतीच्या मरणा-नतर सन्यासदीक्षा घेण्यासाठीं बुद्धाकडे आली, तेव्हा बुद्ध तिला दीक्षा देईना पण तिनें आपल्या हातानें आपले केश कापून काषाय वस्त्रें परिधान केलीं व आनंदाच्या मार्फत बुद्धाला ती गोष्ट कळविली, तेव्हा तिचा दृढनिश्चय पाहून त्यानें स्त्रियाच्या सदाचारासाठीं व रक्षणासाठीं काहीं कडक निर्बंध घालून परवानगी[1]

---

१ ते निर्बंध हे—(१) भिक्षुणींनीं भिक्षुला नमस्कार करावा (२) ज्याठिकाणीं भिक्षु नसेल त्याठिकाणीं भिक्षुणीनें पावसाळ्यात राहू नये, (३)

एक सारखी टोचणी लाविली होती. ती त्याला चैन पडूं देईना ऐहिक सुखाच्या साधनांनीं त्याचें मन रमेना. चित्त शांत करण्याला पारमार्थिक उपदेशाची अवश्यकता त्याला वाटू लागली. राजवैद्य जीवक हा जवळच होता. त्यानें राजाचे मनाची अस्वस्थता ओळखून बुद्धाची थोरवी वर्णन करण्यास सुरवात केली, आणि त्याच्या उपदेशानें हजारों माणसाच्या आयुष्यक्रमाला कसें निराळें वळण लागलें आहे ते रसभरित शब्दांनीं सांगून बुद्धाला शरण जाण्याविषयीं राजाचें मन वळविलें. राजा तागलीच गजारूढ होऊन बुद्धाकडे गेला, आणि जीवकानें म्हटल्याप्रमाणें खरोखरच बुद्धाचा उपदेश ऐकून राजाचें मन स्वस्थ झालें व त्यानें बुद्धाचें शिष्यत्व पतकरलें.

वैद्यकीच्या कामात जीवकाचा हातखंडा असे. यामुळें अपस्मार, यक्ष्मा, कुष्टरोग वगैरे असाध्य रोगानीं पीडित झालेले रोगी शेंकडो कोसावरून त्याच्याकडे येत त्यांतले जे सुखवस्तु होते ते त्याच्यापुढें द्रव्याच्या राशी ठेवीत, पण द्रव्याला वश होणारा तो नव्हता बौद्धधर्मावर त्याची श्रद्धा असल्यामुळें बौद्ध भिक्षूकडे त्याचा विशेष ओढा असे, आणि त्याना तो अगोदर पाहून फुकट औषधपाणी देई ही त्याच्या मनाची प्रवृत्ति पाहून गरजू लोक त्याच्याकडे येण्यापूर्वी बौद्ध मठात प्रवेश करीत, आणि बौद्ध भिक्षु होऊन मग त्याच्याकडे जात, म्हणजे त्याच्या मनाप्रमाणें काम होत असे पण हे बोलून चालून मतलबाकरिता भिक्षु झालेले लोक रोगमुक्त होताच मठाचा त्याग करून पूर्ववत् संसारी बनत. यामुळें यक्ष्मा, अपस्मार, कुष्टरोग वगैरे रोगानीं पीडित असलेल्याना संघात घेऊं नये असा कडक निर्बंध घालणें बुद्धाला भाग पडलें

## अनाथपिंडिक.

हा श्रावस्ति[1] येथील एक श्रीमान् श्रेष्ठी ( सावकार ) होता बुद्धाचे उपदेश ऐकून याचें मन त्याचेठायीं इतकें जडलें कीं, बुद्धाला राहण्यासाठी

१ श्रावस्ती ( सावत्थी ) ही उत्तरकोसल राज्याची राजधानी होती. बुद्धाच्यावेळीं जीं सहा मोठ्या भरभराटीचीं शहरें होतीं त्यात श्रावस्ती हें एक होतें

म्हणून गावाबाहेर पण जवळच असें एक उपवन त्यानें तेथील राजकुमार जेत यावेपासून १४ कोट रुपयाला विकत घेतलें व त्यात एक उत्तम विहार बांधून तें बुद्धाला अर्पण केलें हें जेठवन या नांवानें बौद्धग्रंथात प्रसिद्ध आहे या ठिकाणीं बुद्धानें शिष्याना कित्येक वेळां सुंदर उपदेश केले होते

या अनाथपिंडिकानें आपली अपार संपत्ति बुद्धाला वाहिली इतकेंच नाहीं तर, आपल्या दोन कन्या–महासुभद्रा व चुलसुभद्रा–याही संघाच्या सेवेला अर्पण केल्या असें बौद्ध ग्रंथात लिहिलें आहे

## पूर्ण

बुद्धाचा दुसरा एक अत्यंत निष्ठावान् उपासक म्हणजे सुरापरान्त देशचा व्यापारी पूर्ण हा होता हा धंद्याच्या निमित्तानें श्रावस्ति येथें आला असता तेथें जेठवनात बुद्धाचा उपदेश ऐकण्याचा योग त्याला सुदैवानें प्राप्त झाला आणि तेथेंच त्याला उपरति होऊन त्यानें दीक्षा घेतली तेथें कांहीं काळ राहिल्यावर बौद्ध धर्माचा प्रचार आपल्या देशात करावा म्हणून तो जाऊं लागला, तेव्हां पृ० १०७ वर सांगितलेला संवाद तो व बुद्ध यांच्यामध्यें झाला ज्या निश्चयानें तो निघाला, तो निश्चय त्यानें अक्षरशः पाळून बौद्ध धर्माच्या प्रचाराचें काम फार आस्थेनें केलें

## शिष्यिणी

स्त्रियांना संन्यास दीक्षा देऊन त्यांना भिक्षुणींच्या वृत्तीनें संघात राहू देण्याचें प्रथम बुद्धाचे मनात नव्हतें तसें केलें असता संघात अनाचार वाढेल व ती गोष्ट त्या संस्थेच्या नाशाला अखेर कारण होईल असें बुद्धाचें मत होतें म्हणून त्याची मावशी व सावत्र आई महाप्रजावती गौतमी ही पतीच्या मरणानंतर संन्यासदीक्षा घेण्यासाठीं बुद्धाकडे आली, तेव्हां बुद्ध तिला दीक्षा देईना पण तिनें आपल्या हातानें आपले केश कापून काषाय वस्त्रें परिधान केलीं व आनंदाच्या मार्फत बुद्धाला ती गोष्ट कळविली, तेव्हां तिचा कृतनिश्चय पाहून त्यानें स्त्रियांच्या सदाचारासाठीं व रक्षणासाठीं कांहीं कडक निर्बंध घालून परवानगी

१ ते निर्बंध हे—(१) भिक्षुणींनीं भिक्षूंना नमस्कार करावा (२) ज्याठिकाणीं भिक्षु नसेल त्याठिकाणीं भिक्षुणींनें पावसाळ्यात राहू नये, (३)

दिली. बौद्धधर्म स्त्रियांना हलका लेखतो, आणि म्हणून स्त्रियांना संन्यास-दीक्षा देण्याविषयीं बुद्धाचा अनमान प्रथम दिसला असें विधान कित्येक पाश्चात्य ग्रंथकारांनीं केलें आहे. पण खरा प्रकार तसा नाहीं. स्त्रियांचा प्रवेश संघांत झाल्यास भिक्षूंचा आचार बिघडण्यास तें एक मोठें प्रबळ निमित्त होईल अशी भीति बुद्धाला वाटत होती. परवानगी दिल्यावर सुद्धां ही भीति त्यानें आनंदा-जवळ बोलून दाखविली होती. तो म्हणाला—' हे आनंद, स्त्रियांना भिक्षुणी होण्याची परवानगी मीं दिली नसती तर फार बरें होतें. माझा धर्म त्या योगें चिरकाळ टिकला असता. पण आतां माझा धर्म पांचशाहून अधिक वर्षें पवित्र व निष्कलंक राहणार नाहीं. धर्म दूषित होऊं नये यासाठीं आठ-निर्बंध घालण्याची खबरदारी मला घ्यावी लागली.'

अशा रीतीनें बुद्धाच्या आईनें भिक्षुणी होण्याचा मार्ग स्त्रियांना खुला करून दिल्यानंतर ज्या शेकडों स्त्रिया वैराग्यवृत्तीनें भिक्षुणींच्या संघांत प्रविष्ट झाल्या, त्यांतल्या पुष्कळांनीं आपलें नांव अमर करून ठेविलें आहे. अशा स्त्रियांत महाप्रजावती गौतमी, यशोधरा, खेमा, उत्पलवर्णा, किसा गौतमी, विशाखा, अम्बपाली, या प्रमुख आहेत. थेरींचीं (दहावर्षेंपर्यंत भिक्षु-णींचे नेमधर्म ज्या निष्कलंक रीतीनें पाळीत त्यांना 'थेरी' हें बहुमानाचें पद प्राप्त होई) नांवें व त्या प्रत्येकीविषयीं थोडथोडी माहिती येथें देणें अवश्य आहे.

---

कोणत्या दिवशीं उपोसथ आहे व कोणत्यावेळीं उपदेश होणार आहे या दोन प्रश्ना-पलीकडे भिक्षुणींनीं भिक्षुमधाशीं बोलूं नये, (४) भिक्षुणींनीं पावसाळा संपताच प्रवारणा नावाचें अनुष्ठान करावें, (५) हातून एखादा मोठा अपराध घडल्या-बरोबर संघासमक्ष प्रायश्चित्त घ्यावें; (६) बौद्धधर्माची दीक्षा घेतल्यानंतर दोन-वर्षेंपर्यंत जर एखाद्या स्त्रीनें आपले नेमधर्म नीट रीतीनें पाळले आहेत असें आढ-ळून आलें तर तिला भिक्षुणीची दीक्षा देऊन संघांत घेण्यांत यावें. (७) भिक्षु-णींनें भिक्षूंची निंदा किंवा अपमान केव्हांही करूं नये. (८) भिक्षूंचा संघ भिक्षुणींवर देखरेख ठेवील.

१ **महाप्रजावती गोतमी**—ही बुद्धाची आई मायादेवी हिची बहीण व शुद्धोदन राजाची स्त्री होती. हिनेच बुद्धाचें लहानपणीं पालन केलें होतें. हिनें पतीच्या निधनानंतर संन्यासदीक्षा घेऊन भिक्षुणींचा संघ कसा निर्माण केला त्याविषयीची कथा वर आलीच आहे.

२ **यशोधरा**—ही बुद्धाची स्त्री होती. बुद्धत्वप्राप्तीनंतर सिद्धार्थ कपिलवस्तु येथें आला व त्यानें पुत्र राहुल याला संन्यासदीक्षा दिली, तेव्हांच संन्यासिनी होण्याची तिची इच्छा होती, पण शुद्धोदनानें तिला तसें करूं दिलें नाहीं. पुढें तिची सासू महाप्रजावती गौतमी हिनें भिक्षुणीची दीक्षा घेतल्याचें तिनें ऐकलें. तेव्हां तिनें वैशाली येथें जाऊन बुद्धाकडून संन्यास दीक्षा घेतली. यानंतर सासू व सून दोघीजणी स्त्रियांमध्यें बौद्धधर्माचा प्रचार करूं लागल्या. बुद्धाच्या अगोदर दोनच वर्षें तिचें परिनिर्वाण झालें होतें.

३ **खेमा**—ही मगधराज बिंबिसार याची राणी होती. ही स्वरूपानें अत्यंत सुंदर असून तिला आपल्या स्वरूपाचा मोठा गर्व वाटत असे. पतीनें तिला बुद्धाच्या दर्शनासाठीं वेणुवनांत जाण्यास सांगितलें असतां सौंदर्याच्या व वैभवाच्या आढ्यतेमुळें ती गेली नाहीं. त्यावरून तिचा गर्वपरिहार होण्यासाठीं बुद्धानें सुंदर स्त्रीच्या तरुण, रुग्ण व वृद्ध अशा तीन अवस्था तीन स्त्रियांच्या रूपानें दाखविल्या, तेव्हां तिला वैराग्य प्राप्त होऊन ती भिक्षुणींच्या संप्रदायांत प्रविष्ट झाली अशी कथा बौद्धग्रंथांतून दिली आहे.

खेमा नावाची दुसरी एक स्त्री भिक्षुणी झालेली होती. ही अतिशय विद्वान् होती. हिचा व राजा प्रसेनादि याचा मनुष्याच्या मरणोत्तर अवस्थे संबंधानें चाललेला एक मोठा गमतीचा संवाद संयुत्त-निकायांत दिलेला आहे. कित्येकांच्या मतें बिंबिसार राजाची राणी ती हीच होय.

४ **उत्पलवर्णा**—ही श्रावस्ती येथील एका श्रीमंत गृहस्थाची मुलगी होती. हिच्या अप्रतिम सौंदर्यामुळें हिला अनेक राजेरजवाडे व धनिक यांनीं मागणी घातली होती. पण त्यांतल्या कोणाशीं तिचा विवाह केला तर इतर

राजे क्रुद्ध होऊन आपला नाश करतील, अशी तिच्या बापाला भीति वाटत असे म्हणून त्यानें तिला बरेच दिवसपर्यंत अविवाहित ठेविलें होतें पुढें तिलाही स्वत विवाह करण्याविषयीं अनिच्छा उत्पन्न होऊन ती भिक्षुणी झाली, आणि कठोर व्रतें व नेमधर्म यांचें पालन करून अर्हत्पदाला पावला खुद्द बुद्धाचें मन धर्माचरणावरून परावृत्त करण्याचा मारानें जसा यत्न केला होता, तसा उप्पलवर्णेलाही विषयसुखाकडे नेण्याचा त्यानें यत्न केला, पण माराला तिनें सणसणीत जबाब देऊन गप्प बसविलें असें थेरीगाथेंत आहे

७ किसागोतमी—गोतमी ही श्रावस्ती येथील एका गरीब माणसाची मुलगी होती ही शरीरानें अत्यंत कृश होती यामुळें तिला किसा (कृशा) म्हणत असत सुदैवानें हिला अत्यंत धनवान् पति मिळाला व मोठ्या भाग्यानें एक पुत्रही झाला एकुलता एक मुलगा असल्यामुळें ती त्याला जीव कीं प्राण करी मुलगा हिंडता खेळता झाल्यावर एकाएकी मरण पावला त्याच्या शोकानें ती अगदी वेडी झाली, आणि पुत्राचें प्रेत हातात घेऊन ज्याच्या त्याच्याजवळ औषध मागू लागली काहीं दयाळ मंडळींनें तिला बुद्धाकडे पाठवून दिलें बुद्धानें मोहऱ्या आणण्यास सागून तिचें कसें शातवन केलें हें मागें पृ० १०८ वर सागितलेंच आहे तिनें पुढील गाथा रचिली आहे —

१ या गाथांचें इग्रजी भाषातर मिसस हिस रुहिडस यानीं आपल्या Psalms of Sisters या ग्रथात येणेंप्रमाणें केलें आहे —

Were there an hundred thousand seducers—e n such as thou art,
Ne'er would a hair of me stiffen or tremble—alone what canst thou do?
For all my mind is self—controlled
Like spears and jav lins are the joys of sense,
That pierce and rend the mortal frames of us
These that thou speak st of as the joys of life—
Joys of that ilk, to me are nothing worth

'न गामधम्मो नो निगमस्स धम्मो
न चापियं एककुलस्स धम्मो।
सब्ब लोकस्स सदेवकस्स
एसेव धम्मो यदिदं अनिच्चता ति॥

**अर्थ**—अनित्यता हा नुसता गावाचा, नगराचा किंवा एखाद्या कुळाचा विशेष धर्म आहे असें नाहीं, तर सगळ्या लोकांचा, देवांचा सुद्धां, सामान्य धर्म आहे

आलेल्या अनुभवानें तिचें मन शांत झालें होतेंच त्यांत बुद्धाच्या उपदेशाची भर पडून तिनें तत्काळ शोक टाकला व भिक्षुणीचें व्रत स्वीकारलें

६ **विशाखा**—अंग राज्यांत भद्दिय नगरींत एका श्रीमान् गृहस्थाला एक मुलगी होती तिचें नांव विशाखा ती सात वर्षांची होता तेव्हां बुद्ध एकदां तिच्या गावाला गेला होता बुद्धाची शांत व गंभीर मुद्रा पाहून आणि गोड व हितकारक उपदेश ऐकून त्या लहान वयांतच तिच्या मनावर पुष्कळ परिणाम झाला होता पुढें तिचें लग्न श्रावस्ती येथील पुण्यवर्धन नांवाच्या एका श्रीमंताच्या पुत्राशीं झालें तिला संतति, संपत्ति, पतिप्रेम, वगैरे संसारांतल्या सगळ्या गोष्टींची ईश्वरकृपेनें पूर्ण अनुकूलता होती बौद्ध भिक्षूंचे ठायीं तिचा भाविक श्रद्धा होती, व ती त्यांना अन्न, वस्त्रपात्र, औषध पाणी देत असे श्रावस्तीच्या पूर्व दिशेला असलेलें एक उद्यान तिनें भिक्षूंच्या संघाला देऊन टाकलें होतें बौद्ध धर्माला हिच्या औदार्याची जेवढी मदत झाली, तेवढी दुसऱ्या कोणाची क्वचित्‌च झाली असेल तिचें औदार्य, तिची श्रद्धा, वैभव आणि थोरपणा याप्रमाणेंच अपरंपार होतें

याशिवाय पुन्ना (पूर्णा), तिस्सा (तिष्या), धीरा, मित्ता (मित्रा), भद्दा (भद्रा), सोना, सकुला, शीला, सुमेधा, इसिदासा, सुंदरी, रोहिणी, विजया, अनोपमा, सुजाता, पटाचारा, अभया, धम्मदिन्ना, उत्तरा, सुमना, अड्ढकाशी, सुमंगलमाता, चित्ता, मेत्तिका, नंदा, नंदुत्तरा, सिंगालकाली, दन्तिका उब्बिरी, विमला, जेन्ती, संघा, चाला, उपचाला, अबपाली, गुत्ता, शुभा, वासिट्ठी, वगैरे अनेक स्त्रियांचीं नावें, व त्यांची माहिती थेरीगाथेंत दिलेली आढळते.

## बुद्धाचे शत्रु.

बुद्धाचे शिष्य व शिष्यिणी यांचे संबधानें इतका वेळ विवेचन झालें. आता अगदीं निराळ्या तऱ्हेचें चित्र वाचकापुढें मांडावयाचें आहे. खरें पाहूं गेलें तर बुद्धाला बाहेरचे शत्रु असे कोणी म्हणण्यासारखे नव्हते. येशु-खिस्ताला किंवा तुकारामाला त्याची विटंबना करणारे जसे अनुक्रमें जॅटाइल लोक व रामेश्वरभट्ट हे मिळाले, तसे बुद्धाच्या नशिबानें त्याच्या सहिष्णुतेची कसोटी पाहणारे कोणी निघाले नाहींत. यावरून बौद्धधर्म हा बुद्धाच्या वेळेस तरी निदान अगदा परका-किंबहुना ब्राह्मणधर्माला विरोधी-धर्म समजला जात नसावा असें अनुमान करावें लागतें. ब्राह्मणधर्मात त्याला विरोध करण्याचें सामर्थ्य नव्हतें असें नाहीं. कोणत्याही धर्मात जितका सयुक्तिकपणा कमी व अधश्रद्धा जास्त तितकी त्या धर्माचे प्रतिपालकाचे अंगीं सहिष्णुता कमी असल्याचें सामान्यत आढळून येतें. या नियमानें पाहिलें म्हणजे ब्राह्मण-धर्माच्या अवनतीचा हा काळ असल्यामुळें त्या धर्माच्या छातीवर पाय देऊन उंच होऊं पाहणाऱ्या बौद्धधर्मावर सर्वांचा-विशेषत ब्राह्मणाचा-तीव्र कटाक्ष असणें स्वाभाविक होतें. पण तसा काहीं प्रकार वस्तुतः घडलेला दिसत नाहीं. याचें कारण बुद्धानें आपला धर्म ब्राह्मण-धर्माहून भिन्न आहे असें कोठेंच म्हटलें नाहीं. उलट आपल्या अगोदर कित्येक बुद्ध अथवा ज्ञाते पुरुष होऊन गेले आहेत, त्यांनीं पाडून दिलेल्या मार्गानें आपण जात आहों, मूळची चोखाळलेली वाट मध्यंतरीं बुजली होती ती आपण पुन पाडीत आहों येवढेंच काय तें, असें त्यानें वारंवार म्हटलें आहे. साराश, ब्राह्मणानीं त्याचें शत्रुत्व करावें असें काहीं बुद्धानें केलेंच नव्हतें. तेव्हा त्याला ब्राह्मण-धर्माकडून तीव्र विरोध झाला नाहीं यांत आश्चर्य नाहीं. त्याचे सगळे शत्रु अंत शत्रु म्हणजे त्याच्याच किंवा त्याच्यासारख्या-ब्राह्मणधर्मातली व्यंगें दूर करून धर्माला उन्नत व शुद्ध स्वरूप देण्यासाठीं निर्माण झालेल्या-इतर धर्मपंथांतले होते. अशा शत्रूंमध्यें पाचाचीं नावें प्रमुख आहेत. तें पाच म्हणजे देवदत्त, नंद, मागंधी, चिंचा व सुप्रबुद्ध हे होत. या प्रत्येकाची अगदीं संक्षेपत. माहिती येथें देतों.

१ देवदत्त—हा कोलिय वंशातला होता. याचा बहीण यशोधरा ही सिद्धार्थ गौतम याची पत्नी होती. म्हणजे हा बुद्धाचा श्यालक होता. लहानपणापासून हे दोघे (सिद्धार्थ व देवदत्त) एकत्र वाढले होते. सिद्धार्थानें बुद्धत्व प्राप्तीनंतर नवा पंथ काढला त्याचा प्रथम स्वीकार करणारांत देवदत्त हा होता. पण पुढें बुद्धाची जी चोहोंकडे मानमान्यता झाली ती याच्या मत्सरी स्वभावास न आवडून त्यानें बुद्धाला सोडून जाण्याचा विचार केला. बुद्ध राजगृहाला आला असतां यानें आपणास निदान पट्टशिष्याचें (धर्मसंबंधी युवराजाचें) पद देण्याविषयीं त्यास गळ घालून पाहिली. पण सारिपुत्र व मोग्गलान हे विद्यमान आहेत तोंपर्यंत आपण दुसऱ्या कोणाही मनुष्यावर आपल्या कार्याचा भार टाकणार नाहीं असें सडेतोड उत्तर बुद्धानें दिलें. तेव्हांपासून तो त्याचा अतिशय द्वेष करूं लागला. त्यानें मगध देशाचा युवराज अजातशत्रु याला आपलसें करून घेऊन त्याच्या मदतीनें बुद्धाला ठार मारण्याचा यत्न केला, पण तो फसला. अजातशत्रूनें राजा बिंबिसार याला मारलें ती मसलतही देवदत्ताचीच होती. पुढें अजातशत्रु याची वृत्ति पालटून त्यानें बौद्धधर्माची दीक्षा घतली, तेव्हां देवदत्ताचा एक मोठा आधार नाहीसा झाला. मग त्याच्याजवळ पुष्कळ युक्त्या भरल्या होत्या. नंतर त्यानें संघांत भेद उत्पन्न करण्याचा यत्न केला, आणि बऱ्याच खटपटीनें कोकालिक, कतमोरतिस्स, खण्डदेवसुत आणि समुद्रदत्त असे चार भिक्षु संघांतून फोडल, व त्याच्या साह्यानें बरेच शिष्य गोळा करून मग तो बुद्धाकडे गेला, आणि धर्मासंबंधी कांहीं नवीन नियम करून मागूं लागला. भगवान् बुद्ध त्या गोष्टीला कबूल होईनात. तेव्हा त्यानें स्वतंत्र धर्मपंथ काढला. पण लवकरच त्याचे शिष्य त्याला सोडून गेले, आणि सर्वोकडून त्याची छी थू झाली. अशारीतीनें विटंबना झाल्यावर तो मरण पावला. निरलावर म्हणजे बुद्ध धर्म आणि संघ याचेवर त्याची श्रद्धा होती म्हणून पुढील जन्मीं तो प्रत्येकबुद्ध झाला असें बौद्ध ग्रंथकार मानतात.

---

१ बौद्ध ग्रंथकार बुद्धत्व दोन प्रकारचें मानतात. एक प्रत्यक बुद्धत्व म्हणजे स्वतःच्या उद्धारापुरतें ज्ञान असणें, आणि दुसरें सम्मासम्बुद्धत्व म्हणजे सगळ्या जगाचें गुरुत्वपद प्राप्त होण्याइतकें ज्ञान असणें. गौतम बुद्धाला ते सम्मासम्बुद्ध समजतात.

२ नंद– हा श्रावस्ती नगरातला एक गुंड होता असें दिसतें स्त्रिया भिक्षुणीव्रताचा स्वीकार करून राहू लागल्या, तेव्हा त्याची टवाळी करणाऱ्या अनेक दुष्ट आणि खोडसाळ लोकांपैकीं हा एक होता कोणी म्हणतात कीं, हा स्वत बौद्धधर्मी होता पण स्त्रियाना बौद्ध धर्माची दीक्षा देण्यास सुरु वात झालेली त्याला न आवडून त्यानें बौद्ध धर्माचा त्याग केला व पुन ब्राह्मण धर्म स्वीकारला काहीं असो, पण हा दुराचरणी असला पाहिजे येवढी गोष्ट खरी आहे. कारण का, वर सांगितलेली बुद्धाची अग्रश्राविका (पट्टशिष्याण) उपलवर्णा ही भिक्षापात्र हातीं घेऊन श्रावस्ती नगरींत भिक्षेसाठीं आली असता यानें तिच्याशीं उद्धटपणाचें वर्तन करून तिच्या गात्राला स्पर्श केला, तेव्हा तिनें आलल्या क्रोधाचें दमन करून त्याला पुढील उपदेश केला —

मधु वा मञ्ञती बालो याव पाप न पच्चति
यदा च पच्चती पाप अथ बालो दुक्ख निगच्छति ॥

अर्थ— जोंपर्यंत पापांचा परिपाक झाला नाहीं (पापाचा घडा भरला नाहीं) तों पर्यंत मूर्ख त्याला मधुर समजतो पण तें पाप पक्व झाल म्हणजे मग त्याचें फळ त्याला भोगावें लागतें

हा नद उपलवर्णेचा मामेभाऊ होता प्रत्यक्ष बहिणीशीं असें वर्तन कर णारानें बुद्धाचा द्वेष केल्यास त्याबद्दल कोणास नवल वाटावयास नको

३ मागधी—हा बुद्धाचा समकालीन एक ब्राह्मण होता ही तुका रामाच्या वेळच्या रामेश्वर भटजीचीच प्रतिमा होती ब्राह्मण धर्माचें थोतांड माजवून आतून अनेक दुर्वासनाना आश्रय देणारापैकीं हा प्रमुख होता हा सात दिवसपर्यंत एकसारखा बुद्धाला शिव्या मोजित होता त्यानें बुद्धाचा थोडा फार छळ केला असें मोघम विधान केलेलें आढळतें पण तो छळ कशा प्रकारचा होता याविषयीं माहिती मिळत नाहीं

४ चिंचा—बौद्धधर्माच्या प्रसारानें ज्यांच्या पोटावर पाय आणिला होता असे कित्येक तिर्थिक (ब्राह्मण) बुद्धाचा पजीति करण्यासाठीं टपून बसले होते त्यांनीं एकदां चिंचा नावाच्या एका स्त्रीला बुद्धावर उपदेश घण्या-

बाटो पाठविलें, आणि मध्यें तीन चार महिने गेल्यानंतर त्यांनी अशी कंडी पिकविली कीं चिंचा बुद्धापासून गर्भ राहिला आहे. ती स्त्री निर्लज्ज होती. तिनें द्रव्याच्या लोभानें हीच गोष्ट सर्वांना सांगावी. एकदां तर ब्राह्मणांनीं तिच्याकडून ही गोष्ट बुद्धाला कळविली. तेव्हां भगवान् बुद्ध विस्मित झाले, आणि हें सगळें कुभांड ब्राह्मणांचें कारस्थान आहे असें त्यांनीं ओळखलें. हळू हळू खरा प्रकार लोकांना कळला, तेव्हां बुद्धावरील किटाळ दूर होऊन त्याच्या विषयाची लोकांची पूज्यबुद्धि कमी न होतां वृद्धिंगत झाली.

५ सुप्रबुद्ध—सिद्धार्थ गौतमबुद्धाचा सासरा व यशोधरेचा पिता सुप्रबुद्ध हा त्याचा विरोध करणारांपैकीं एक होता. व सिद्धार्थ गौतम यानें आपल्या विवाहित पत्नीचा त्याग करून तिला दुःखार्णवांत लोटलें हें त्याच्या विरोधाचें मूळ कारण होतें. त्यांत पुन्हा देवदत्ताच्या कारस्थानाची भर पडून जावई व सासरे यांच्यांत वितुष्ट आलें होतें. भगवान् बुद्ध भिक्षुसहवर्तमान भिक्षेला निघाले असतां यानें त्यांचा मार्ग अडवून धरावा, व अशा प्रकारें त्रास द्यावा. पण भगवान् बुद्धाची क्षमाशीलता अवर्णनीय होती. तिच्यापुढें सुप्रबुद्धाचें कांहीं चाललें नाहीं.

वर सांगितलेले बुद्धाचे शिष्य, शिष्यिणी व शत्रु यांच्याशिवाय कांहीं तत्कालीन पुरुषांविषयीं दोन शब्द येथें सांगणें अवश्य आहे.

जैनधर्म हा त्याकाळीं थोडा फार प्रचलित होता यांत शंका नाहीं. ब्राह्मणधर्माला बौद्धधर्म हा जसा जबरदस्त प्रतिस्पर्धी मिळाला होता अशी कित्येकांची समजूत आहे, (ही समजूत चुकीची आहे. ब्राह्मण-धर्माला विरोध करण्याचा बौद्धधर्माचा केव्हांही हेतु नव्हता हें वर सांगितलेंच आहे) तसा जैन धर्म हाही एक प्रतिस्पर्धी होता. मात्र याचा प्रसार हळू हळू पण खात्रीनें पुढें पाऊल टाकीत टाकीत होत होता. या जैन धर्मांतील जे मुख्य साधु किंवा मुख्य धर्मप्रवर्तक त्यांना तीर्थंकर म्हणतात. जैनांचा सहावा तीर्थंकर महावीर आणि सिद्धार्थ गौतमबुद्ध हे समकालीन होते इतकेंच नाहीं, तर सहाध्यायी होते असें सांगतात. महावीराशिवाय निर्ग्रंथज्ञाति

पुत्र, पूरण कश्यप, मस्करी गोशालपुत्र संजय बेलास्थिपुत्र, अजित केशकंबल, ककुदकात्यायन, ह्या सहा सर्वज्ञ व सन्मान्य 'शास्त्या'चा उल्लेख दिव्यावदान नामक सुप्रसिद्ध बौद्ध ग्रंथात केलेला आहे हे सगळे जैन तीर्थ किंवा तीर्थंकर बुद्धाचे समकालीन होते यांच्याविषयीं बौद्ध ग्रंथात असें लिहिलें आहे कीं, भगवान् गौतमबुद्ध याच्यापुढें याच्या धर्मोपदेशाचें तेज पडेना तेव्हां काहीं अलौकिक चमत्कार करून दाखवून आम्ही आपली श्रेष्ठता स्थापित करण्यास तयार आहों, बुद्धानेंहा येऊन तसले चमत्कार हवे तर करून दाखवावे अशा प्रकारचें आव्हान मगधराज बिंबिसार याच्या मार्फत करण्याचा त्यानीं घाट घातला होता पण राजा बिंबिसार हा स्वत बौद्धधर्मी असल्याकारणानें त्याला ठाऊक होतें का, बुद्धाचा अलौकिक चमत्कारावर मुळींच भरवसा नाहीं व तो स्वत ते करून दाखविणार नाहीं म्हणून त्यानें तें आव्हान मान्य केलें नाहीं इतकेंच नाहीं तर अशा रीतीनें बुद्धाला त्रास द्याल तर तुम्हास राज्याबाहेर घालवून देईन अशी त्याना ताकीद दिली बिंबिसाराजवळ डाळ शिजेना, तेव्हा ते प्रसेनजित् राजाकडे गेले त्यानें ती गोष्ट कबूल करून बुद्धाजवळ गोष्ट काढली बुद्ध प्रथम तें आव्हान स्वीकारीना, पण प्रसेनजिताचा फारच आग्रह दिसला, व त्या काळीं लोकाची अलौकिक चमत्कारावर इतकी श्रद्धा होती कीं ते करण्याची आपल्या अंगची शक्ति दाखविल्याशिवाय आपला धर्म टिकणेंच अशक्य असें दिसलें, तेव्हा शेवटी निरुपाय होऊन बुद्धानें काहीं चमत्कार करून दाखविले तेव्हा ते तीर्थंकर खालीं मान घालून चालते झाले या गोष्टींत कांहीं तात्पर्य दिसत नाहीं. या केवळ दंतकथा-निवळ कल्पना-आहेत

सिंहली भाषेतील ग्रंथावरून वर सांगितलेल्या सहा तीर्थंकरांची थोडीशी माहिती मिळते ती अशी —

१ पूरणकाश्यप—हा एका प्रतिष्ठित गृहस्थाचा पुत्र होता याच्या मालकानें याला एके दिवशी द्वारपालाचें काम सांगितलें त्यात आपली मानहानि झाली असें समजून तो विरक्त झाला, आणि तेथून तडक अरण्यांत गेला वाटेंत त्याला चोरांनीं गांठलें व अंगावरलीं वस्त्रें काढून घेतलीं तेव्हां

तो तसाच नग्न हिंडू लागला पुढें एके प्रसगीं तो गावात गेला असता लोकांनीं त्याला नेसण्यासाठीं वस्त्र दिलें पण तो म्हणाला कीं 'वस्त्र हें लज्जा निवारणार्थ आहे, आणि लज्जेची उत्पत्ति पापविषयाच्या प्रवृत्तीपासून आहे मी जर ती पापप्रवृत्ति नाहींशी करून टाकली आहे तर मला वस्त्राचें प्रयोजन काय?' ही त्याची निस्पृहता, आणि निस्सगता पाहून लोक त्याच्या भजनीं लागले त्याच्या शिष्याचा सख्या ८० हजार होता असें सांगतात

२ **मस्करी गोशाल**—मस्करी हें याचें खरं नाव हा एक दासापुत्र होता गाशाळेंत हा जन्मला म्हणून गोशाल असें दोषण नाव त्याला मिळालें हा एकदां मालकाच्या आज्ञेवरून डोक्यावर तुपाचा घागर घेऊन चालला असता चिखलांत पाय घसरून पडला व तूप सांडलें मालक घरीं रागें भरेल या भीतीनें तो घागर तशीच टाकून पळाला त्याला तत्काळ वैराग्य प्राप्त झालें याच्यादा भोंवता ८० हजार शिष्य जमा झाले होते असें म्हणतात

३ **अजित केशकबल**—याची ही गाष्ट अशीच आहे याच्या हातून कामात झालेल्या चुकाबद्दल मालक काहीं बोलला त्यावरून यानें ससाराचा त्याग करून सन्यास घेतला हा केसाचें कावळें पाघरीत असे त्यावरून त्याला केशकबल असें नाव पडलें मासे धरणें व मासे मारून खाणें, लतेचें छेदन करणें, व प्राण्याचा वध करणें, दोन्हीं गोष्टी सारख्याच पापकारक आहेत असें याचें मत होतें

४ **ककुधकात्यायन**—हा एका ब्राह्मण विधवेचा पुत्र होता ककुधवृक्षा खालीं जन्मला म्हणून ककुध असें नांव मिळालें याचा प्रतिपाळ एका ब्राह्मणानें केला होता पण तो मेल्यावर उपजीविकेचें काहीं साधन उरलें नाहीं म्हणून वैतागून त्यानें सन्यास घेतला तो म्हणत असे कीं थड पाण्यात असख्य जंतु असतात, म्हणून तें पिऊ नये तो स्वत व त्याचे शिष्य पाणी तापवून पीत हातपाय सुद्धां ऊन पाण्यानेंच धूत एखादा नदींतून किंवा ओढ्यातून पलीकडे जावयाचें झालें तर आपल्या चालण्यानें पाण्यातल्या असख्य जंतूंचा नाश होईल यास्तव त्याच्या जिवाला अतिशय दुःख होई

५ संजयवेलास्थिपुत्र–वेलास्थि हें त्याच्या आईचें नांव होतें. संजय-फळासारखा एक मासाचा गोळा त्याच्या डोक्यावर वाढला होता. त्यावरून संजय हें पद चेष्टेनें त्याच्या नावाला जोडण्यांत आलें होतें. तो असें म्हणत असे कीं, प्रत्येक प्राणी त्याच त्या जन्माला पुनः पुनः येतो, व प्रत्येक जन्मीं त्याची वाढ होत जाऊन अखेरच्या जन्मीं त्याला पूर्णावस्था प्राप्त होते.

६ निर्ग्रंथज्ञातिपुत्र अथवा निर्ग्रंथनाथपुत्र—हा नाथ नावाच्या एका शेतकऱ्याच्या मुलगा होता. मी सगळे ग्रंथ पटलों आहे, मला येत नाहीं असा एकही ग्रंथ नाहीं, असें तो मोठ्या आढ्यतेनें सांगत असे. त्यावरून त्याला 'निर्ग्रंथ' हें नाव मिळालें. तो म्हणत असें कीं, 'माझा देह निष्पाप आहे व मी सर्वज्ञ आहें.' ज्या कोणाला शंका विचारणें असेल त्यानें विचारावी. मी तिचें निरसन करीन.' याला ठळक असे पाचशें शिष्य होते.



# प्रकरण अकरावें.



## बुद्धाची शिक्षणपद्धति.

[ विषय—बुद्धाच्या उपदेशाचा प्रभाव–त्याचें रहस्य पालीभाषेचा उपयोग–शिक्षणपद्धतींतली खुबी–जातककथा–पंचतंत्र–आपमितें–ऐतिहासिक दृष्टान्त–प्रश्नोत्तर पद्धति–नागसेन व मिलिंद ]

बुद्धाच्या चरित्रांतल्या ठळक ठळक गोष्टी येथपर्यंत संक्षेपतः दिल्या आहेत, त्यावरून त्याच्या चरित्रांतलें विशेषत्व व त्याच्या महती हीं कोणालाही कळून येईल. शिक्षक, मार्गदर्शक व उद्धारकर्ता म्हणून लोक त्याला पूज्य मानीत असत. त्याच्या नुसत्या दर्शनानें किंवा एखाद्दुसऱ्या उपदेशाच्या श्रवणानें शेकडों दुर्वृत्त लोक सन्मार्गाकडे वळत व संसारांत निमग्न असलेले वैराग्यवृत्ति

स्वीकारून भिक्षु होत. या गोष्टीचें पुष्कळांना आश्चर्य वाटतें आणि खरोखर आश्चर्य करण्यासारखीच ती गोष्ट आहे यांत शंका नाहीं. पण ती गोष्ट ह्या प्रकारें घडून येण्यास जीं बलवत्तर कारणें झालीं त्याचा विचार केला म्हणजे असें कां झालें याची बरोबर उपपत्ति लागते. बुद्धानें केलेला वैभवाचा त्याग, व भोगलेले देहदंड, त्याच्या चारित्र्याचा निष्कलंकपणा, त्याचा स्पष्टवक्तेपणा, त्याची सरळ तर्कपद्धति, परोपकारबुद्धि, काहीएक गूढ न ठेवतां सगळें ज्ञान दुसऱ्यास अर्पण करण्याविषयींची तत्परता, आपणास दिसलेला मार्ग लोकहिताचा आहे, व तो लोकांस दाखविणें हें आपलें कर्तव्य आहे अशी दृढभावना व मनाची खात्री पटविणारी विवेचनपद्धति या सर्व गोष्टींचा एकसमयावच्छेदकरून होणारा परिणाम बाकीच्या सर्व वृत्तींना दडपून टाकणारा होत असला पाहिजे. बुद्धाच्या अंगच्या या बहुतेक गुणांचा परिचय वाचकांना थोड्या फार अंशानें मागील प्रकरणांतून झालेलाच आहे. या प्रकरणांत त्याच्या शिक्षण-पद्धतीविषयीं दोन शब्द सांगावयाचे आहेत.

*बुद्धानें उपदेशाचें सगळें काम तोंडीं चालत असे. त्यावेळीं लेखनकला भारतीयांना माहित नव्हती किंवा बुद्धाला लहानपणीं तिचें शिक्षण मिळालें नव्हतें असें नाहीं. पण ग्रंथलेखनाचा प्रसार त्याकाळीं विशेषसा नव्हता म्हणून म्हणा, किंवा लेखनापेक्षां प्रत्यक्ष बोलण्याचा परिणाम माणसाच्या मनावर अधिक होतो म्हणून म्हणा, अथवा बुद्धाची शिक्षणपद्धतिच लेखनाला अनुकूल नव्हती असें म्हणा, बुद्धाचे सगळे उपदेश तोंडीं झालेले आहेत. ते मागाहून त्याच्या शिष्यमंडळीनें स्मरणानें लिहून काढले, ही गोष्ट निराळी.*

बुद्धानें संस्कृत भाषेंत उपदेश केले नाहींत, तर तत्कालीन सामान्य लोकांची बोलण्याची भाषा जी पाली तींत केले. या पाली भाषेविषयींची थोडी माहिती पुढें एका प्रकरणांत वाचावयास मिळेल. ब्राह्मणधर्माचा सगळा गाडा काय तो संस्कृत भाषेंत असून तो ब्राह्मणाच्या हातीं असे. तो त्याच्याहातून निघून सामान्य लोकांच्या हातीं यावा हा बुद्धाच्या जीवितांच्या अनेक उद्देशांपैकीं एक मुख्य उद्देश होता, आणि तो साधण्याला त्याला

लोकांच्या प्रचलित बोलण्याच्या भाषेचा उपयोग अर्थात् करावा लागला नुसती भाषा बदलनहा उपयोग नव्हता सामान्य लोकांच्या मनावर एखादी गोष्ट ठसविण्याला पुनरावृत्ति, व्यवहारातल दृष्टांत आणि पात्रतेनुरूप सोप्या भाषेचा योजना याचाही अवश्यकता असते बुद्धाच्या उपदेशात या तिन्ही गोष्टाचा अवलब केलेला असून शिवाय प्रश्नोत्तर पद्धतीचाहा उपयोग प्रसगानुसार केलला आढळतो बुद्धाच्या उपदेशात धर्माचा तत्त्वे अगदा सामान्य दृष्टांताच्या द्वारें आणि व्यावहारिक भाषेंत सांगितलेलीं पाहून वर वर पाहणारास 'अ ! या उपदेशात काय मोठें सांगितलें आहे ?' असें वाटतें हिऱ्यासारखा रत्नें खोल खाणीतच शोधली पाहिजत, उत्तम मोत्यासाठीं समुद्राच्या तळाशींच गलें पाहिजे तशीं गहन धर्मतत्त्वही सामान्य जनाना दुर्बोध अशा भाषतच सागितला पाहिजेत अशा ज्याचा कल्पना असेल त्याना बुद्धाचे उपदेश उपक्षणाय वाटण साहजिक आहे पण हच उपदेश तत्कालीन लोकांच्या मनावर विलक्षण परिणाम करण्यास कारण झाल हा गोष्ट त्याना लक्षात ठवावी एखादा कुशल अनुभविक शिक्षक आपल्या विद्यार्थ्यांना शिकविताना पात्राच्या व विषयाच्या योग्यतेनुरूप जसा निरनिराळ्या शिक्षणपद्धताचा उपयोग करतो, आणि अशा रातीनें विषय सोपा करून सांगितल्यावर 'हीं तर अगदा साधी गोष्ट आहे, ही इतका वेळ आपणाला कशी कळली नाहीं हें आश्चर्य आहे !' असे उद्गार विद्यार्थीगणांच्या तोंडून निघतात, तसा प्रकार बुद्धाच्या शिष्याचा झाल असे पण यावरून काय सिद्ध होतें ? त्या उपदेशात काहीं राम नव्हता कीं बुद्धाची शिक्षणपद्धतीच सुबाची होती ? याचें उत्तर कोणीही देईल

बुद्ध उपदेशाचा विषय सुगम करण्यासाठीं मधून मधून सोप अलंकार (बहुधा उपमा आणि रूपक) घालीत असे कधीं कधीं एखादा गोष्टीचेंही उदाहरण देई या गोष्टी कधीं कुऱ्यामाजराच्या, तर कधीं मनुष्यप्राण्याच्या आपापसातल्या व्यवहारसबधाच्या असत, आणि शेवटीं त्या गोष्टीचें तात्पर्य असे जेथें मनावर विशेष परिणाम करावयाचा असे तेथें लहान लहान कवितांनीं युक्त अशीं वाक्यें मोठ्या खुबीनें पण सहज रीतीनें आत्म्यासारखीं होवून देत असे

बुद्ध भुम्यामांजराच्या गोष्टींच्या द्वारे शिष्यांना धर्म आणि नीति यांचें शिक्षण कसें देत असे हें त्याच्या जातक–कथांवरून दिसून येतें या जातक-कथांची प्रसिद्धी इसापनीतीच्या रूपानें सगळ्या जगभर झाली आहे अशी कोणतीही प्रौढावस्थेला पोंचलेली भाषा नाही कीं, जींत या जातककथांचें (इसापनीतीचें) भाषांतर झालेलें नाहीं पण दुर्दैवाची गोष्ट अशी आहे कीं, इसापनीति ही निवळ जातककथांचें भाषांतर असतां त्यो भाषांतरानें मूळ कथांच्या नांवाचा अनिवार्य लोप करून टाकला! फार काय पण पंचतंत्र व हितोपदेश या ग्रंथांना सुद्धां आधार त्या जातककथांचाच आहे मूळच्या पंचतंत्रांत तेरा तंत्रें होतीं त्यांतून इ० स० च्या ६ व्या शतकांत पांच तंत्रें निराळीं निघालीं तीं पंचतंत्र या नांवानें हल्लीं प्रसिद्ध आहेत या पंचतंत्राचें प्रथम ६ व्या शतकांत खुसरू नौसरवान् बादशहाचे कारकीर्दींत पहलवी भाषेंत भाषांतर झालें त्याचें सीरियक भाषेंत भाषांतर होऊन तें 'कलिग आणि डामनग' या नांवानें प्रसिद्ध झालें पंचतंत्रापैकीं पहिल्या तंत्रांतली कर्कटक आणि दमनक यांची गोष्ट सुप्रसिद्धच आहे या गोष्टीवरूनच त्या ग्रंथाला पंचतंत्र हें नांव देण्यांत आलें होतें त्याचीं पुढें अनुक्रमें आरबी, ग्रीक हिब्रु स्पॅनिश व लाटिन भाषेंत भाषांतरें झालीं तथापि सर्वांचें मूळ जातककथा होत हें वर सांगितलेंच आहे भाषांतरें होतांना कित्येक वेळां मूळ कथांचीं व विचारांचीं

---

१ हिंदुस्थानांतून वक्तोवेळीं नीतिपर गोष्टी नेऊन परकीयांनीं त्या युरोपखंडांत प्रसिद्ध केल्या इ स पू ४ थ्या शतकांत अलेक्झांडरनें हिंदुस्थानावर स्वारी केली तेव्हां त्याच्या बरोबर बाबियस, फिडसप्रभृति ग्रीक कवि आले होते त्यांनीं जातककथांचीं गद्यपद्यमय भाषांतरें करून नेलीं खिस्तशकाच्या ८ व्या शतकांत सेंट जान आफ डमास्कस यानें एका जातककथेच्या आधारानें Barlaam and gosaphet नांवाची एक गोष्ट लिहिली व तिचीं पुढें युरोपांतल्या निरनिराळ्या भाषांत भाषांतरें झालीं मुसलमान बादशहाच्या कारकीर्दींतही अरबी, तुर्की, फारशी वगैरे भाषांतून जातकांचीं भाषांतरें होऊन तीं युरोपांत गेलीं

रूपांतर होत गेलें तथापि पुष्कळ ठिकाणीं मूळांत व भाषांतरांत अद्यापि सादृश्य दृष्टीस पडतें. उदाहरणार्थ—जातककथांपैकीं गृध्रजातकांतला पुढील श्लोक पहा —

> यन्नु गिज्झो योजनसतं कुणपानि अवेक्खति ।
> कस्माजालंच पासंच आसज्जापि न बुज्झसीति ॥

आतां या श्लोकाशीं हितोपदेशांतील जरद्गवगृध्रोपाख्यानांतला पुढील श्लोक लावून पहा —

> योऽधिकाद्योजनशतात्पश्यतीहामिषं खगः ।
> स एव प्राप्तकालस्तु पाशबन्धं न पश्यति ॥

अशीं दुसरीं अनेक उदाहरणें देतां येतील.

बुद्धाच्या जातककथांचें याप्रकारें निरनिराळ्या भाषांत भाषांतरें झालीं व त्या कथा निरनिराळ्या रूपानें आज पंचवीसशें वर्षें कोट्यवधि लोक वाचीत आले आहेत, ही गोष्ट बुद्धाच्या शिक्षणपद्धतीच्या उत्कृष्टपणाची जिवंत साक्षच म्हटली पाहिजे.

भगवान् बुद्ध कशाप्रकारें एखादी गोष्ट श्रोत्यांच्या मनावर बिंबवीत असत हें दाखविण्याकरितां एकदोन गोष्टी मासल्यासाठीं येथें देतों. पुत्रशोकामुळें वेड्या झालेल्या किसा गौतमीला मनुष्यजन्माचें विनाशित्व बुद्धानें कसें युक्तीच्या द्वारें समजावून दिलें तो भाग एका प्रकरणांत दाखविलेंच आहे. पुढील गोष्टींत बुद्धानें आपणही आध्यात्मिक कृषि करतों असें सांगून धर्मप्रचाराचें काम किती महत्त्वाचें आहे तें दाखविलें आहे. ती गोष्ट अशी —

भरद्वाजनामक एक श्रीमंत ब्राह्मण गोरगरीबांना अन्न वाटीत होता. इतक्यांत तथागत ( गौतमबुद्ध ) भिक्षापात्र हातांत घेऊन त्याच्या दाराशीं आले. बुद्धाविषयींची कीर्ति चोहोंकडे पसरलेली होतीच; त्यामुळें त्याला पाहतांच इतरांनीं त्याचा योग्य आदरसत्कार केला, पण भरद्वाजानें मात्र तसें कांहीं एक केलें नाहीं. उलट रागानें बुद्धाकडे पाहून तो म्हणाला, "काय रे श्रमणा,

रोज दारोदार भिक्षापात्र घेऊन हिंडतोस, त्यापेक्षा काहा उद्योग करून पोट कां भरीत नाहींस ? मा पहा, शेतकीचा धंदा करून स्वत चा व कुटुंबाचा निर्वाह केला, आणि ही धनदौलत स्वत कष्ट करून मिळविली तू माझ्यासारखे कष्ट केलेस तर तुला नाहीं का मिळणार ?"

ब्राह्मणाचे हे रागाचे शब्द एकून तथागताला राग आला नाहीं त्यानें शांतपणानें उत्तर केलें, "आपलें म्हणणें रास्त आहे मनुष्यानें कष्ट करायलाच पाहिजेत मीहि आपल्या म्हणण्याप्रमाणेंच वर्तन ठेविलें आहे आपण जमीन नागरता, बी पेरता, आणि अशा रीतीनें शतीवर निर्वाह करता मीहि तेंच करतों।"

ब्राह्मण आश्चर्यानें म्हणाला, "काय ! तू शेतकरी आहेस ? छे, तू खोटें बोलतोस ! तू शेतकरी असलास तर तुझ शेत पाहिजे, बैल पाहिजेत, नागर वगैरे आउतें पाहिजेत बी पाहिजे हा कुठें आहेत दाखीव ? "

तथागत म्हणाला, "श्रद्धा हें बीज आहे ज्ञान व सौजन्य हीं आमची शेतकीची आउतें, चित्ताची एकाग्रता हा आमचा बैल चित्त हे त्याचे दोर शास्त्र हा नांगराचा फाळ व अध्यवसाय हा आसुड आहे आम्ही आमच्या नांगरानें असाररूपी क्षेत्रातल मोहकटक काढून धर्मोपदेशरूपी बीजाचें ग्रहण करण्यास योग्य अशी मनुष्याच्या मनाची तयारी करतो, सत्कर्माचरणाच्या वृष्टीची वृष्टि पडते, आणि मग निर्वाणाचें भरपूर पीक आमच्या पदरा पडतें "

तथागताचें हे उदात्त, गंभीर, कळकळीनें युक्त आणि धीराचें उत्तर ऐकून ब्राह्मणाचे डोळे उघडले आपण सत्पुरुषापुढ उभे आहों आणि त्याचा उपमर्द आपले हातून घडला असें तत्काळ त्याच्या लक्ष्यात आलें, आणि त्यानें तेथेंच तथागतापुढें लोटांगण घालून त्याचें शिष्यत्व पत्करलें

कधी कधी बुद्ध ऐतिहासिक कथा सांगून नीतीचें तत्त्व अगदीं सहज रीतीनें श्रोत्यांच्या मनावर पूर्णपणें बिंबवीत असे अशा कथांचा अज्ञ श्रोत्यांच्या मनावर जितका लवकर परिणाम घडतो तितका ज्ञात्यांच्या मनावर घडत नाहीं ज्ञात्यासाठीं गहन विषयावरील वाद आहेतच पण अज्ञ लोकांना सन्मार्गाला लावण्याला गोष्टी सांगणें हा सारखा सुलभ मार्ग नाहीं बुद्धाला सर्व

रुपांतरें होत गेलीं तथापि पुष्कळ ठिकाणीं मूळांत व भाषांतरांत अद्याप सादृश्य दृष्टीस पडतें. उदाहरणार्थ—जातककथांपैकीं गृध्रजातकांतला पुढील श्लोक पहा —

यन्नु गिज्झो योजनसतं कुणपानि अवेक्खति ।
कस्माजालञ्च पासञ्च आसज्जापि न बुज्झसीति ॥

आतां या श्लोकाशीं हितोपदेशांतील जरद्गवगृध्रोपाख्यानांतला पुढील श्लोक ताडून पहा —

योऽधिकाद्योजनशतात्पश्यतीहामिषं खगः ।
स एव प्राप्तकालस्तु पाशबन्धं न पश्यति ॥

अशीं दुसरीं अनेक उदाहरणें देतां येतील.

बुद्धाच्या जातककथांचीं याप्रकारें निरनिराळ्या भाषांत भाषांतरें झालीं व त्या कथा निरनिराळ्या रुपानें आज पंचवीसशें वर्षे कोट्यवधि लोक वाचीत आले आहेत, ही गोष्ट बुद्धाच्या शिक्षणपद्धतीच्या उत्कृष्टपणाची जिवंत साक्षच म्हटली पाहिजे.

भगवान् बुद्ध कशाप्रकारें एखादी गोष्ट श्रोत्यांच्या मनावर बिंबवीत असत हें दाखविण्याकरितां एकदोन गोष्टी मासल्यासाठीं येथें देतों. पुत्रशोकामुळें वेड्या झालेल्या किसा गौतमीला मनुष्यजन्माचें विनाशित्व बुद्धानें कसें युक्तीच्या द्वारें समजावून दिलें तें मागें एका प्रकरणांत दाखविलेंच आहे. एका गोष्टींत बुद्धानें आपणही आध्यात्मिक कृषि आहों असें सांगून धर्मप्रचाराचें काम किती महत्त्वाचें आहे तें दाखविलें आहे. ती गोष्ट अशी —

भरद्वाजनामक एक श्रीमंत ब्राह्मण गोरगरीबांना अन्न वांटीत होता. इतक्यांत तथागत ( गौतमबुद्ध ) भिक्षापात्र हातांत घेऊन त्याच्या दाराशीं आले. बुद्धाविषयींचा कीर्ति चोहोंकडे पसरलेला होतीच. त्यामुळें त्याला पाहतांच इतरांना त्याचा योग्य आदरसत्कार केला, पण भरद्वाजानें मात्र तसें कांहीं एक केलें नाहीं. उलट रागानें बुद्धाकडे पाहून तो म्हणाला, "काय रे श्रमणा,

रोज दारोदार भिक्षापात्र घेऊन हिंडतोस, त्यापेक्षा काहा उद्योग करून पोट कां भरीत नाहींस? मी पहा, शेतकीचा धंदा करून स्वतःचा व कुटुंबाचा निर्वाह केला, आणि ही धनदौलत स्वतः कष्ट करून मिळविली. तू माझ्यासारखे कष्ट केलेस तर तुला नाही का मिळणार?"

ब्राह्मणाचे हे रागाचे शब्द ऐकून तथागताला राग आला नाहीं. त्यानें शांतपणानें उत्तर केलें, "आपलें म्हणणें रास्त आहे. मनुष्यानें कष्ट करायलाच पाहिजेत. मीहि आपल्या म्हणण्याप्रमाणेंच वर्तन ठेविलें आहे. आपण जमीन नांगरतां, बीं पेरतां, आणि अशा रीतीनें शेतीवर निर्वाह करतां. मीहि तेंच करतों।"

ब्राह्मण आश्चर्यानें म्हणाला, "काय! तू शेतकरी आहेस? छे, तूं खोटें बोलतोस! तूं शेतकरी असलास तर तुझ शेत पाहिजे, बैल पाहिजेत, नांगर वगैरे आउतें पाहिजेत. ही पाहिजे ती कुठें आहेत दाखीव?"

तथागत म्हणाला, "श्रद्धा हें बीज आहे. ज्ञान व सौजन्य हीं आमची शेतकीचीं आउतें, चित्ताची एकाग्रता हा आमचा बैल, चित्त हे त्याचं दोर, शास्त्र हा नांगराचा फाळ व अध्यवसाय हा आसुड आहे. आम्ही आमच्या नांगरानें संसाररूपी क्षेत्रांतले मोहकंटक काढून धर्मोपदेशरूपी धान्याचें ग्रहण करण्यास योग्य अशी मनुष्याच्या मनाची तयारी करतो, सत्कर्माचरणाच्या वृद्धीची वृष्टि पडते, आणि मग निर्वाणाचें भरपूर पीक आमच्या पदरीं पडतें."

तथागताचें हें उदात्त, गंभीर, कळकळीनें युक्त आणि धीराचें उत्तर ऐकून ब्राह्मणाचे डोळे उघडले. आपण सत्पुरुषापुढें उभे आहों आणि त्याचा उपमर्द आपले हातून घडला असें तत्काळ त्याच्या ध्यानांत आलें, आणि त्यानें तेथेंच तथागतापुढें लोटांगण घालून त्याचें शिष्यत्व पत्करलें.

कधी कधीं बुद्ध ऐतिहासिक कथा सांगून नीतीचें तत्त्व अगदीं सहज रीतीनें श्रोत्याच्या मनावर पूर्णपणें बिंबवीत असे. अशा कथांचा अज्ञ श्रोत्यांच्या मनावर जितका लवकर परिणाम घडतो तितका ज्ञात्यांच्या मनावर घडत नाहीं. ज्ञात्यासाठीं गहन विषयावरील वाद आहेतच, पण अज्ञ लोकांना सन्मार्गाला लावण्याला गोष्टी सांगणें हा सारखा सुलभ मार्ग नाहीं. बुद्धाला सर्व

जातीच्या व प्रतीच्या लोकांमध्यें धर्म व नीति यांचा प्रचार करण्याचें काम करावें लागे. तें करतांना कोणाचें मन कशा रीतीनें धर्माकडे लवकर वळेल हें ओळखून त्या धोरणानें त्यानें उपदेश करावे अशा रीतीचे त्याचे कित्येक उपदेश उपलब्ध आहेत त्यांतला एक नमुन्यासाठीं येथें देतों

एकदा बौद्धभिक्षूमध्यें भांडणें होऊन दोन पक्ष झाले पुढें कांहीं चांगल्या विद्वान् भिक्षूंनीं मध्यस्थी केल्यावर ते दोन्ही पक्ष एक होण्यास कबूल झाले तथापि अंतर्यामीं एकी होईना बाह्यत भांडणें मिटलीं तरी, अंतर्यामीं एकी झाल्याशिवाय बाहेरचा एकीचा देखावा व्यर्थ आहे हें तत्त्व बुद्धानें आपल्या शिष्यास पुढील गोष्टीच्या रूपानें सांगितलें ती गोष्ट अशी —

काशी येथें ब्रह्मदत्त नावाचा राजा राज्य करीत होता त्यानें राज्य-लोभाला वश होऊन शेजारचें कोसलचें राज्य घेण्याचा विचार केला या कोसल देशावर दीर्घेति नावाचा राजा राज्य करीत होता कोसलचें राज्य लहान होतें व त्या राजाजवळ सैन्यबळहि विशेष नव्हतें तेव्हां ब्रह्मदत्त चाल करून आल्याबरोबर दीर्घेति भ्याला, आणि पळून गेला ब्रह्मदत्ताला अनायासेंच कोसलचें राज्य मिळालें

इकडे दीर्घेति जो पळाला, तो आपल्या राणीसह काशी येथें वेष पालटून एका कुंभाराचे घरांत भाड्यानें राहिला तेथें त्याची राणी प्रसूत होऊन मुलगा झाला त्याचें नांव दीर्घायु ठेविलें

इकडे ब्रह्मदत्तानें दीर्घेति कोठें पळून गेला याविषयींचा शोध चालविला होताच, पण कांहीं पत्ता लागेना दीर्घेति बराच वर्षें अज्ञातवासांत राहिला. त्याला वस्तुत आपणास कोणी ओळखील अशी भीति बाळगण्याचें कारण नव्हतें, पण मन पापशंकी असतें न जाणो, आपण येथें वेषांतर करून आहों असा सुगावा कोणाला लागला आणि त्यानें राजा ब्रह्मदत्त याला बातमी दिली तर तो आपणा तिघानांहि ठार केल्याशिवाय राहावयाचा नाहीं, ही भीति त्याला रात्रंदिवस चैन पडू देत नव्हती. शेवटीं त्यानें असा विचार केला कीं, आतां दीर्घायु मोठा झाला आहे ईश्वराच्या कृपेनें त्याला पोट भरण्या-

पुरती विद्यादि प्राप्त झाली आहे शिवाय कोणाशीं कसें वागावें हें धोरणहि त्याला कळू लागलें आहे तेव्हां काही युक्तीनें त्याला काशीच्या राज्याबाहेर आपणापासून दूर ठेवावें म्हणजे तो तरी निर्भय होईल असा विचार करून त्यानें तो तत्काळ अमलातहि आणिला

दार्घेति राजाला जी भीति वाटत होती, ती निष्कारण नव्हती निदान त्याचें भविष्य खर ठरण्याचा योगायोग लवकरच जुळून आला असें म्हटलें पाहिजे दार्घेति राजाचा न्हावी काशी शहरामध्येंच येऊन राहिला होता त्यानें एके दिवशा दार्घेति राजाला पाहिल व तत्काळ ओळखलें आणि त्याचा स्वभाव पराकाष्ठेचा लोभी असल्यामुळे त्यानें ब्रह्मदत्तराजाला ती बातमी जाऊन सांगितली

ब्रह्मदत्ताला ही बातमी कळताच मनस्वी हर्ष झाला आपणास हुलकावणी देऊन आपल्या नगरांत कुंभाराच्या घरात वसातर करून राहिलेल्या आपल्या जुन्या शत्रूची धिंड काढण्यास मिळणार, म्हणून त्याला अत्यानंद झाला व त्या आनंदाच्या भरात त्यानं दीर्घात व त्याची राणी या दोघाना बांधून आणून फासावर लटकावण्याचा हुकूम फर्मावला

हुकुम होण्याचा काय तो उशीर होता त्याची अमलबजावणी होण्यास कितीसा वेळ लागणार! राजदूतांना दार्घेति व त्याची राणी या दोघांच्या मुसक्या बांधून लागलींच आणिल आणि त्यांना वधस्तंभाकडे नेलें

इकडे दीर्घायु बापापासून कधीं दूर राहिला नव्हता, यामुळें त्याला लवकर आपल्या आईबापांना भेटण्याची इच्छा झाली व तो काशीस परत आला. दार्घेति राजाला मिरवत वधस्तंभाकडे नेत असतां त्या राजानें आपल्या मुलाला रस्त्यांत जमलेल्या लोकांच्या गर्दीत पाहिलें पण त्याला ओळख न देता दीर्घेति ओरडून म्हणाला, "हे पुत्रा! फार दूरदृष्टि ठेवू नकोस, फार अदूर दृष्टिहि ठेवू नकोस द्वेषानें द्वेषाचें शमन होत नाहीं, अद्वेषानेंच द्वेष शमन पावतो"

हे शब्द दीर्घायूनें ऐकून मनात खूणगाठ बांधून ठेविली राजा व राणी या दोघांचाही ब्रह्मदत्तराजाच्या हुकुमानें वध झाल्यावर त्यांचीं शवें स्मशानां

तच पडली होतीं व त्याच्यावर कडक पाहरा ठेवण्यात आला होता. दीर्घायूनें युक्तिप्रयुक्तानें त्या पहारेकऱ्यांशा सधान बाधून त्याना मादक सुरा पाजली, आणि ते गुंगले तेव्हा जवळच चिता रचून तींत त्या दोन्ही प्रेतांचें यथाविधि दहन केलें

पाहरेकऱ्याच्या पाहऱ्यातून शत्रूंची प्रेतें गेला ही गोष्ट राजाला कळली तेव्हा ता दीर्घायूनेंच काढून नेलीं असला पाहिजेत व तो कारटा आता मोकळा राहिला तर आईबापाच्या वधावद्दल आपला सूड घेतल्यावाचून राहणार नाहीं, अशी एक नवी काळजी ब्रह्मदत्त राजाला आता उत्पन्न झाली

इकडे दीर्घायु आपल्या आईबापाच्या प्रेताचे अत्य सस्कार केल्यावर अरण्यात निघून गेला आणि तेथें एका झाडाखाला बसून मनमुराद रडला शोकक्षोभादि विकाराना मन तुडुब भरलें म्हणजे अश्रुमोचन हाच मनाला थोडाशी शाति देण्याला उत्तम उपाय असतो तो उपाय केल्यावर दीर्घायूचें मन अमळ शात झालें, आणि तो काशीस परत आला पुढे काय करावयाचें याविषयाचा काहाएक विचार त्यान आपल्या मनाशीं पक्का केला होता त्या विचाराप्रमाणें ब्रह्मदत्त राजाच्या हत्तीखान्यात त्यानें स्हानशी नोकरी धरली

हा हत्तीखाना ब्रह्मदत्त राजाच्या महालापासून जवळच होता एके रात्रा शात वेळीं दीर्घायु हत्तीखान्यात एकटाच गात बसला होता आणि स्वत च्या मनाची करमणूक करीत होता त्याच वेळीं ब्रह्मदत्त राजाहि आपल्या महालात खिडकीपाशीं उभा राहून त्याच गाणें ल लावून ऐकत होता दीर्घायूचा आवाज फार गोड असून त्याची गाण्याची पद्धतही मादक असल्या मुळे ब्रह्मदत्त राजा त्याचें गाणें ऐकून खुष झाला त्यानें त्या गाणाराचे शोधार्थ माणसें पाठवून त्याला आपल्यासमोर आणविलें आणि आपल्या स्वत पाशीं खिज-मतगार म्हणून त्याला नोकरीस ठेविलें

मोठ्याशीं अदबानें कस वागावें, नम्रपणा कसा धारण करून मालकाची मर्जी कशी संपादावी, आणि आपलें काम वेळचेवेळीं बिनबोभाट कसें करावें, तें दीर्घायूला उत्तमप्रकारें ठाऊक होतें त्याचप्रमाणें तो नेहमीं वागत असे यामुळे

थोडक्याच वेळात राजाची मर्जी त्याने संपादन केली. होता होता राजाचा विश्वास त्याचेठायीं इतका जडला कीं, तो दार्घायूला नेहमीं आपल्याबरोबर बाळगू लागला.

एकदां राजा शिकारीला गेला असतां त्याची व बरोबरच्या शिपाई माणसांची चुकामूक झाली, पण दार्घायु मात्र राजाला बिलकुल विसंबला नाहीं. बराच वेळ हिंडल्यानें राजा अगदीं थकून एका तळ्याचे कांठीं बसला असतां झोंप येऊं लागली म्हणून तो दार्घायूचे मांडीवर डोकें ठेवून निजला व झोंपी गेला.

दार्घायूला वाटलें, कीं, ज्या राजानें आपल्या राज्याचा अपहार केला आणि आपल्या आईबापांचा विटंबना करून त्यांचा वध केला, त्याचा सूड उगविण्यास हा समय फार उत्कृष्ट आहे. हा निजला असतां याचा मान आपण कापली तर आपलें काम चांगलें साधलें आणि आपण पुत्राचें कर्तव्य केलें असें होईल. पण इतक्यांत बापानें मरतांना सांगितलेल्या गोष्टीची त्याला आठवण झाली. 'दूरदृष्टि नसावी, अदूरदृष्टिहि नसावी, द्वेषानें द्वेष शमत नाहीं, तर तो अद्वेषानें शमतो!' हे बापाचे शब्द स्मरतांच तलवार बाहेर काढण्यासाठीं म्यानापाशीं गेलेला त्याचा हात तसाच थबकला.

इतक्यांत राजा जागा झाला आणि पहातां तों दार्घायूचा तरवारीच्या म्यानापाशीं हात! राजाचा मुद्रा या वेळीं बावराबावरी झालेली पाहून एवढें घाबरण्याचें कारण काय, असें दार्घायूनें ब्रह्मदत्त राजास विचारलें.

तेव्हां राजा म्हणाला, 'मला नेहमीं स्वप्न पडत असतें तसें आतां पडलें तें असें, कीं, दार्घायु नेहमीं तलवार उपसून माझा जीव घ्यायला पाहत आहे. हें स्वप्न पाहतांच मला भीति वाटली व भीतीनें मी जागा झालों."

आपलें बिंग बाहेर पडलें, तेव्हां आतां उगाच सोंग कशाला पाहिजे? उघड उघड व्हायचें असेल तें होईल, असा विचार करून दार्घायूनें आपला डावा हात राजाचे मानेवर ठेविला आणि उजव्या हातानें म्यानांतली तलवार उपसून म्हटलें "होय. स्वप्नांत दिसलें तें खरें आहे. हा खिजमतगार दुसरा

कोणी नाहा ज्याच्या राज्याचा अपहार करून त्याच्या आईबापाचा तूं क्रूरपणानं वध केलास तोच हा दार्घायु तुझा सूड उगविण्याकरिता तुझ्यापुढें उभा आहे ''

राजानें पाहिलें, कीं, आता आपले प्राण याच्या हातांत आहेत आता याच्याशा दाटगाई उपयोगाची नाहा, सामोपचारानेंच घेतलें पाहिजे म्हणून तो दाघायूला म्हणाला, '' प्रिय दार्घायु, माझे येवढे प्राण वाचाव, मला जीवदान दे!'

दाघायु म्हणाला, '' माझे हातीं तुमचे प्राण वाचविण्याचें कोठे आहे? उलट माझेच प्राण तुमच्या हातात आहेत ''

राजा म्हणाला '' बरें तर, आपण दोघेहि परस्पराना जीवदान देऊ '' ही गोष्ट दोघानाही तलवारीची शपथ घेऊन कबूल केला, आणि तेव्हापासून ते दोघेहि मित्र झाले

कांहीं वळानें ब्रह्मदत्त राजान दीर्घायूला त्याच्या बापाच्या शेवटच्या उद्गाराची आठवण दिला, आणि त्याचा अर्थ काय? असं विचारलें तेव्हा दीर्घायु म्हणाला, '' दूरदृष्टि ठेवू नकोस '' म्हणजे दीघद्वेषी होऊ नकोस, 'अदूरदृष्टि होऊ नकोस' म्हणजे आपला काय परिणाम होईल याचा दूरवर विचार न करता उतावीळपणानें वागू नकोस 'द्वेषानें द्वेष शमत नसतो' या वाक्यानें बापानें असें सुचविल, कीं, तुम्हा माझ्या आईबापाचा वध करविला, याबद्दल तुमचा सूड मला घेता येईल पण त्यापासून काय उपयोग होणार? तुमच्या पक्षाचे लोक मला मारण्यास टपून बसतील आणि संधि साधून मारतील पुढें माझ्या पक्षाचे लोक त्याचाही तसाच द्वेष साधून घेतील अशा रीतीनें द्वेषाचें शमन न होता तो वाढत जाईल पण अद्वेषानें तुमच्यासारखे मूळचे शत्रु असतांही मित्र होतात आणि द्वेष शमतो ''

दीर्घायूच्या बापानें मुलाला शिकविलेला हा शहाणपणाचा धडा पाहून आणि दीर्घायूचें ह त्या धड्याचें मर्म ओळखण्याचें चातुर्य पाहून ब्रह्मदत्त राजा थक्क झाला, आणि त्यानें दीर्घायूचें राज्य त्याला परत दिलें, इतकेंच

नाहीं तर त्याच्याशीं झालेला सद्द पक्का व्हावा म्हणून आपली मुलगी देऊन त्याला नावई धर्ले

शिकवितांना प्रश्नोत्तरपद्धति ही पुष्कळ वेळां फार उपयोगी पडत या गोष्टीचा अनुभव शिक्षकाचें काम ज्यांनी केलें त्यांना आहेच ही पद्धति युरोपखंडात सॉक्रटिक पद्धति या नावानें प्रसिद्ध आहे आणि शास्त्रीय तत्त्वावर बसविलेल्या शिक्षणपद्धतींच्या इतिहासात तिच फार मोठ महात्म्य वाटलें आहे ही पद्धति सॉक्रेटिस यानें शोधून काढली असें युरोपियन पंडिताचें मत आहे पण सॉक्रेटिसापूर्वी कित्येक वर्षे ती हिंदुस्तानात प्रचलित होती हा गोष्ट बुद्धचरित्रावरून व्यक्त होते भगवान् गौतमबुद्ध याच प्रश्नोत्तर–पद्धतीनें अनेकवेळा आपल्या शिष्यांशीं किंवा पृच्छकाशा गहन विषयावर सभाषणें करीत, आणि आपल्या धर्मतत्त्वाच्या सत्यतेबद्दल त्याची खात्री करून देत स्पष्टीकरणासाठीं बुद्धचरित्रांतील एक लहानसा प्रसंग घेतों

महावग्ग नामक ग्रंथात पुढील कथा आहे सोम नांवाचा एक तरुण माणूस होता त्यानें धर्मसाधनासाठी नानातऱ्हेचे उपासतापास मर्ते आणि कडक तपश्चर्या करून शरीर क्षीण करून घेतलं तरी त्याला सिद्धि प्राप्त झाली तेव्हा वैतागून तो अगदीं दुसऱ्या टोंकाला म्हणजे केवळ एषआरामाच्या मार्गाला लागण्याच्या बेतात होता पण तसे करू लागण्यापूर्वी त्याची व बुद्धाची एकदा गाठ पडली व बुद्धानें त्याला आपल्या मध्यममार्गाचा उपदेश केला बुद्धानें विचारलें, तुम्हाला वीणा, सतार, वगैरे वाद्य वाजवितां येत, नाही ?'

'होय, महाराज'

'बरें तर, गुदद्या पिळून वीणेच्या तारा अतिशय ताणल्यानें त्यातून चांगला सूर निघतो काय ?'

'नाहीं महाराज'

'बरें, तारा फार ढिल्या सोडल्यानें चांगला सूर निघतो काय ?'

'नाही महाराज तशानेंही चांगला सूर निघत नाहीं'

'बरें, तारा फार ताणल्या नाहींत, आणि फार ढिल्याही सोडल्या नाहींत, बेताच्या ठेविल्या, तर त्यांतून गोड सूर निघतो कीं नाहीं ?'

'होय महाराज निघतो'

'होय ना ? तर मग मनुष्याच्या अंगच्या शक्तींचेंही तसेंच आहे तीं फार ताणून उपयोग नाहीं फार ढिली ठेवल्यानें मनुष्य आळशी व दुलगर्जी बनतो म्हणून प्रत्येक माणसानें आपापल्या शारीरिक व मानसिक शक्तींचा मध्यबिंदु शोधून काढावा आणि मध्यममार्गानें जावें, असें करणें हें बरें असें नाही का तुम्हाला वाटत ?'

बुद्धानंतर त्याच्या शिष्यांनीं या पद्धतींत पुष्कळ सुधारणा करून तिला पूर्णावस्थेला नेलें प्रसिद्ध बौद्धधर्मप्रचारक नागसेन आणि राजा मिलिंद (मिन्यांडर Menander) यांच्यातलें गहनविषयक संवाद मिलिंदपन्हा नावानें प्रसिद्ध आहेत त्यांत या पद्धतींचा उत्कृष्ट मासला पाहण्यास मिळतो उदाहरणार्थ— बौद्धधर्माचें अनात्मतत्त्व समजून घेण्यासाठीं राजा मिलिंद नागसेनाकडे आला असतां त्यांचीं पुढील प्रश्नोत्तरें झालीं —

**राजा.**—भंते, आपलें नांव काय !

*नाग* —महाराज मला, नागसेन म्हणतात माझ्या बरोबरीचे भिक्षु मला नागसेन म्हणतात पण त्यांना नागसेन म्हटलें काय, वीरसेन किंवा शूरसेन म्हटलें काय, किंवा आणखी काहीं नांव दिलें काय सारखेंच आहे कारण नांव केवळ सोयीसाठीं असतें त्याच्या आंत काहीं नसतें

**राजा**—भंते, आंत आत्मा नसतो असें तुमचें म्हणणें ना ? बरें तर, जर आत्मा नाहीं तर तुम्हांला लागणाऱ्या खाण्यापिण्याच्या जिनसा, कपडेलत्ते, राहण्याला घर, औषधपाणी वगैरे देणारा कोण ? आणि घेणारा कोण ? विचार करणारा, चिंतन किंवा ध्यान, करणारा कोण ? निर्वाणाचा मार्ग धरणारा कोण ? खरें बोलणारा कोण ? खोटें बोलणारा कोण ? पापकर्मे कोण करतो ? जर कोणी नसेल तर पापही नाहीं आणि पुण्यही नाहीं चांगल्या वाईट कर्मांचीं फळेंही नाहींत असें होईल खुनी मनुष्यही नाहीं आणि धर्मतत्त्वाचा उपदेश

करणारा गुरुही नाही भते, आपण आता म्हणालां कीं, माझे बरोबरीचे भिक्षु मला 'नागसेन' म्हणतात हा नागसेन कोण? तुमच्या डोक्यावरले केस काय?' 'नाही' 'अगावरले केस काय?' 'नाही' 'नख, दात, त्वचा, मास, अस्थि, मज्जा, काळीज, फुप्फुस, आतडीं, पोट, हृत, पाय, हीं नागसेन आहेत काय?' 'नाही महाराज' 'आकृति, संवेदना, दृष्टि, भावना, चैतन्य हीं प्रत्येक निरनिराळ्या किंवा संयुक्त स्थितीत असणें म्हणजे नागसेन काय?' 'नाही महाराज, तसेंही नाहीं' 'तर मग नागसेन हा शब्द निरर्थक आहे. नागसेन असा कोणीच नाहीं तुम्ही खोटें सांगितलें असें म्हटलें पाहिजे'

याप्रमाणें राजानें पूर्वपक्ष केल्यावर नागसेन म्हणाला —

'महाराज, आपली प्रकृति फार नाजूक आहे उन्हाळ्यात मध्यान्हीं वाळवटातून पायीं जाण्याचा प्रसंग आपणावर आला तर आपले पाय भाजतात, त्याना फोड येतात, अंग गळून जातें, मनाचा तरतरा निघून जाते, असें होतें ना? आपण आता पायीं आला का रथात बसून?'

'भते, मी पायीं कधी चालत नाही मी रथात बसून आलों'

'हं? तर मग रथ कशाला म्हणतात ते आपणाला सांगता येईल? रथाचा चाकें म्हणजे रथ काय?' 'नाहीं नागसेन' रथाचा आंस, बैठक, छत्र, कळस, ध्वजा, ध्वजस्तंभ, घोड्याचा लगाम, हातातला चाबूक, यापैकीं काहीं रथ आहे काय?' 'नाहीं, तसें नाहीं' 'आंस, बैठक, छत्र, कळस, चाकें इत्यादि वस्तूहून निराळी अशी काहीं वस्तु रथ हो आहे काय?

'भंते, नाहीं' 'मी इतके वारकाइनें प्रश्न विचारतों, तरी रथ कोणता तें आपणास सांगता येत नाहीं यावरून 'रथ' हा शब्द निरर्थक म्हटला पाहिजे आपणही महाराज खोटेंच बोलता आपण राजाधिराज आहां! आपणाला खोटें बोलण्याला कोणाचें येवढें भय वाटतें? (दरबारी लोकाकडे पाहून) पहाहो, तुमचे हे महाराज रथात बसून आले असे आताच म्हणाले पण रथ कोणता असें विचारलें तर मात्र तो दाखवितां येत नाही'

राजा निरुत्तर झाला, आणि नागसेन हें नाव जितकें पोकळ, निरर्थक, आहे तितकीच रथ ही संज्ञाही निरर्थक आहे ही गोष्ट त्यान मुकाट्यानें कबूल

केली तेव्हां नागसेन म्हणाला–'महाराज, रथ ही नुसती संज्ञा आहे हें ज्ञान यथार्थ आहे नागसेन ही सुद्धा अशीच संज्ञा आहे माझे हस्तपायादि अवयव, केस, आकृति, संवेदना, चैतन्य या सर्वांच्या समुच्चयाला नागसेन ही संज्ञा आहे स्वतंत्र अशा अर्थानें आत्मा नाहीं'

नागसेनानें आपलें अनात्मवादाचें तत्त्व यारीतीनें राजाचे मनावर पूर्णपण बिंबविलें

बुद्धाच्या उपदेशात मधून मधून काव्यपूर्ण उक्ति चमकत व त्या एकणा राच्या मनाला चटका लावून सोडात असें वर म्हटलें आहे अशा उक्तींचीं हवीं तेवढीं उदाहरणें धम्मपद ग्रंथात आहेत त्यातलीं कांहीं मागें ७८ पृष्ठांवर दिलीं आहेत आणखा एकदोन येथें देतों तीं अशा :—

'रात्र जागणाराला रात्र मोठी वाटते, श्रमलेल्यास एक योजनभर मार्ग सुद्धा लांब वाटतो, त्याप्रमाणें जे मूर्ख सत्यधर्म जाणत नाहींत, त्याना जीवन हें अतिदीर्घ वाटतें'

'धर्मदान सर्वदानात श्रेष्ठ आहे धर्मरस सर्वरसात श्रेष्ठ आहे धर्म जन्य आनंद सर्व आनंदाच्या पलीकडे आहे, तृष्णाक्षय सर्व दु खाचा परि हार करणारें आहे'

'अनावृत्तीमुळें मंत्र ( शिकलेली विद्या ) मलिन होतात अमस्कारानें गृह मलिन होतें, आळसानें देह मलिन राहतो, अनवधाना ( दुर्लक्ष ) मुळें रक्षकाकडे दोष येतो'

---

१ 'दीघा जागरता रत्ति दीघ सन्तस्स योजन ।
दीघा बालान ससारा सद्धम्म अविजानतम्'।

२ 'सब्बदान धम्मदान जिनाति सब्ब रस धम्मरसो जिनाति ।
सब्ब रतिं धम्मरती जिनाति तण्हक्खयो सब्ब दु ख जिनाति ॥'

३ 'असज्झायमला मन्ता अनुट्ठानमला घरा ।
मल वण्णस्स कोसज्ज पमादो रक्खतो मलम् ॥'

# प्रकरण १२ वें.



## महापरिनिर्वाण.

विषय —महापरिनिर्वाणसूत्र-त्याचा काल-पाटलीपुत्रनगरचा उल्लेख-राष्ट्रीय उन्नतीचीं तत्त्वें-बुद्धाचें परिभ्रमण-वज्जि लोकांचें प्रजासत्ताक राज्य-बौद्ध भिक्षूंना उपदेश-शरीराचे संवाद-निर्वाणप्राप्ति-अग्निसंस्कार-शिष्यमंडळींत भांडणें-अस्थींचे वांटे-बुद्धाच्या निर्वाणकालाबद्दल भिन्न भिन्न मतें.]

या नंतरच्या बुद्धचरित्रांतला विशेष चटकदार व बोधप्रद प्रसंग म्हणजे महापरिनिर्वाण (बुद्धाचा मृत्युकाल) हा होय. या काळीं बुद्धानें आपल्या शिष्यांना *सांगितलेलीं राष्ट्रीय उन्नतीचीं तत्त्वें व केलेला धर्मोपदेश हीं खरीं बहुमोल* आहेत. यांची कल्पना त्या तत्त्वांचा खोल विचार केल्याशिवाय होणें शक्य नाहीं. हीं तत्त्वें व हा उपदेश 'महापरिनिर्वाणसूत्र' नामक पाली भाषेतल्या ग्रंथांत संपूर्ण दिलीं आहेत. या ग्रंथासंबंधानें थोडीशी माहिती या प्रकरणांत देण्याचें योजिलें आहे.

महापरिनिर्वाणसूत्र हें प्रकरण सूत्रपिटकांतल्या दिघनिकाय नामक ग्रंथांत *अंतर्निविष्ट झालेलें आहे. यांत बुद्धाच्या चरित्रांतल्या शेवटच्या तीन महि*न्यांत त्यानें केलेले अनेक धर्मोपदेश यथासांग वर्णिले आहेत. याच्या रचनाकालासंबंधानें भिन्नभिन्न मतें आढळतात. डा. ओल्डनबर्ग म्हणतात कीं, यांत पहिल्या बौद्धसंघाचा उल्लेखही नसल्यामुळें याचा रचनाकाल खिस्तीशकाच्या पूर्वी ५४० वर्षें असावा. प्रो. ऱ्हीस डेव्हिड्स यांच्या मतें खिस्तीशकाच्या पूर्वी *चार शतकें हा त्याचा खरा काल आहे. आणखीही कांहीं विद्वानांनीं या काला*विषयीं शोध करून आपले अभिप्राय प्रकट केले आहेत. पण कोणीही २३०० वर्षांच्या अलीकडे त्या कालाला ओढण्याचें धैर्य केलेलें नसल्यामुळें अडीच हजार वर्षांइतका जुना हा ग्रंथ आहे असें आतां म्हणण्यास हरकत नाहीं.

त्याच्या सल्ल्यानें चालत आहेत, जोंपर्यंत कुलवधूना ते घरात कोंडून ठेवीत नाहींत त्यांना तिरस्कारानें वागवीत नाहींत, त्याना तुच्छ समजत नाहींत, त्याच्या पुढें आपल्या शक्तीचें प्रदर्शन करीत नाहात जोंपर्यंत दशातल्या धर्म संस्थांशी ते सन्मानपूर्वक व श्रद्धापूर्वक वागत आहत, व देवस्थानें चालवीत आहेत, जोंपर्यंत साधुसंतांचा परामर्ष घेण्याचें काम निरलसपणानें त्यांच हातून घडत आहे व जोंपर्यंत ते डोळे उघड टवून सर्व ठिकाणच प्रकार जणू काय प्रत्यक्ष पहात आहत -तोंपर्यंत त्याना परचक्राचें भय बाळगण्याचें कारण नाहीं " या प्रमाणें आनंदाला वाज्जि लोकाच्या बलाचें खरें रहस्य सांगितल्यानंतर भगवान् मन्त्र्याकडे वळून म्हणाले ' आतां सांगितलल्या नियमाचा उपदेश वैशाली नगरींत असताना मीं वज्जि लोकांना केला होता त्या उपदेशानुरूप ते वर्तन ठेवीत असले, तर तुमच्या स्वारीपासून त्यांची काडीमात्र हानि होणार नाहीं *

हें बुद्धाचें भाषण ऐकून वर्षाकार मन्त्री निरोप घेऊन चालता झाला तो गेल्यावर राजगृहाच्या आसमंतातल्या भागात विहारातून रहात असलेल्या सगळ्या भिक्षूंना बोलावण्याविषयीं बुद्धानें आनंदाला सांगितलें, व ते जमल्या नंतर वर सांगितलेलीं उन्नतीचीं तत्त्वें धर्मव्यवस्थेला लावून त्यानीं उपदेश केला ते म्हणाले 'भिक्षुगण हो, जोंपर्यंत तुम्ही सगळे भिक्षु एका सभेंत जमत राहाल जोंपर्यंत एकदिलानें व एकविचारानें तुम्ही संघाचें धर्मकार्य पार पाडण्याविषयाची खरी कळकळ बाळगाल, जोंपर्यंत तुम्ही संघाच्या अध्यक्षाला पित्याप्रमाणें मान देऊन त्याच्या आज्ञेत राहाल, व वृद्धाविषयी योग्य आदरबुद्धि बाळगून त्यांना साह्य करण्यास तत्पर राहाल जोंपर्यंत तुम्ही विषयकर्मांपासून अलिप्त राहाल जोंपर्यंत तुम्ही व्यर्थ वाचाळता करणार नाहीं, जोंपर्यंत तुम्ही निद्राळू न होता धर्मसाधनाविषयीं जागरूक राहाल, जोंपर्यंत तुम्ही

---

* हा उपदेश बराच व्यापक आहे, तथापि राष्ट्राच्या सर्वांगीण उन्नतीचा समावेश करण्याइतका व्यापक तो नाहीं हें कोणासही दिसून येईल राजकारण, समाज, धर्म, विद्यावृद्धि, व्यापार वगैरे उन्नतीच्या अनेक अंगापैकीं दोन तीनच गोष्टींचा स्थूल विचार सूत्ररूपानें या उपदेशात ग्रथित केला आहे

पापेच्छेला वश होणार नाहीं व पापी लोकांची मैत्री धरणार नाहीं, जोंपर्यंत तुम्ही इतर सर्व गोष्टींचा नाद सोडून निर्वाणप्राप्तीच्याच मार्गे लागाल,-तोंपर्यंतच तुमची धार्मिक उन्नतीची आशा आहे, तोंपर्यंत तुम्हांला कोणत्याहि प्रकारची हानीविषयींची भीति बाळगावयाला नको '

या उपदेशाची फोड करतांना बुद्धानें आपल्या धर्माचीं तत्त्वें विशद रीतीनें सांगितलीं आहेत भिक्षु श्रद्धावान्, ह्रीमान्, अनुतापी, बहुशास्त्रविद्, वीर्यवान्, प्रज्ञावान्, व सावधानचित्त असावा, त्यानें अनित्यता, अनात्मता, अशुभ, दु ख, त्याग, वैराग्य आणि निरोध यांचें साधन करावें, इ गोष्टी त्यानें आपल्या उपदेशांत बजावून सांगितल्या तसेंच शील अथवा *शुद्धचारित्र्य याच्या द्वारा समाधीचें फल कसें प्राप्त होतें तें सांगितल्यावर, भग* वान् आपला शिष्य आनंद याच्यासह नालंदा येथील प्रसिद्ध विश्वविद्यालयात गेले हें स्थान राजगृहापासून ( हल्लींच्या राजगिरापासून ) सात मैलाच्या अंतरावर होतें सध्या या स्थानाला बरगाव असें नांव आहे या ठिकाणीं, शीलापासून समाधीला आणि समाधीपासून प्रज्ञेला कसा उपयोग होतो, आणि प्रज्ञेच्या साह्यानें काम, अस्मिता, मिथ्यादृष्टि आणि अविद्या यांचपासून निर्माण होणाऱ्या दु खापासून मनुष्यप्राणी कसा मुक्त होतो, तें बुद्धानें सांगितलें

यानंतर फिरत फिरत बुद्धाची स्वारी आपल्या शिष्यपरिवारासह वैशाली नगरींत येऊन पोंचली येथें आम्रपालिका नावाची एक धनसंपन्न गणिका बुद्धाची शिष्यीण होती तिनें *अतिशय आग्रहपूर्वक आपल्या गुरुला आम्रवनांत* उतरून घेतलें व तेथें गुरूच्या तोंडून सदाचरणाविषयींचा उपदेश श्रवण केला भगवान् बुद्ध यांची स्वारी आम्रपालिकेच्या आम्रवनांत येऊन उतरली आहे हें वर्तमान वज्जि लोकांना लागतांच त्यांच्यांतले प्रमुख नागरिक उत्तमोत्तम वस्त्रें व अलंकार परिधान करून रथ, अश्व, व नानात-हेचीं इतर यानें घेऊन *बुद्धाच्या दर्शनाला गेले त्यांच्याबरोबरीनें उत्तमोत्तम यानें ( रथ, अश्व* वगैरे ) घेऊन आम्रपालिकाही बुद्धाकडे गेली राजपुरुषांच्या रथांशीं गणिकेचे रथ, व त्यांच्या घोड्यांशीं तिचे घोडे जाऊन भिडले हा काय प्रकार

आहे याची पूसतपास करतां कळलें कीं, आम्रपालिका आपल्या गुरूला दुसरे दिवशीं आपल्या घरीं भोजनास निमंत्रण करण्यासाठीं जात आहे! बुद्धगुरु गणिकेसारख्या पतित स्त्रीचा उद्धार करण्यासाठीं तिच्या निमंत्रणाचा प्रथम स्वीकार करतील हीं वज्जि लोकांना पूर्ण खात्री होती. म्हणून त्यांनीं गणिकेला शतसहस्र मुद्रा घेऊन या कार्यापासून परावृत्त हो आणि आमच्या निमंत्रणाचा स्वीकार करण्याच्या आड येऊं नकोस, असें आमिष दाखविण्याचा यत्न केला; पण ती म्हणाली कीं, शतसहस्र मुद्रिकाच काय, पण मगधी वैशाली नगरी मला दिली तरी मी ती स्वीकारणार नाहीं. असा तिचा हट्ट पाहून ते वज्जि निरुपाय होऊन तसेच पुढें गेले. बुद्धानें त्यांना दुरून येतांना पाहिलें आणि शिष्यांना म्हटलें, " भिक्षुगणहो, ज्यांनीं तेहतीस कोटि देवतांचें दर्शन घेतले नसेल, त्यांनीं या वज्जि लोकांचें तरी दर्शन घ्यावें. "

या लहानशा गोष्टींत किती तरी मर्म सांठविलेलें आहे! पतित जनांना उद्धारण्याविषयींची बुद्धाची जितकी आतुरता या गोष्टींत दिसून येते, तितकीच वज्जि लोकांच्या प्रजासत्ताक राज्याचें राजकारण मोठ्या दक्षतेनें, धैर्यानें आणि विवेकानें चालविणाऱ्या लोकनायकांची खरी योग्यता जाणण्याची बुद्धाची गुणग्राहकता देखील या गोष्टीवरून दिसून येते.

यानंतर भगवान् बुद्ध भंडग्राम, हस्तिग्राम, जंबुग्राम, भोगनगर, वगैरे पुष्कळ गावें हिंडले. शेवटच्या गावीं असता आनंदचैत्यांत त्यांनीं सर्व बौद्ध भिक्षूंना एकत्र करून त्यांना पुढील उपदेश केला:—' हे भिक्षुगण हो, जर कोणी भिक्षु येऊन तुम्हांला म्हणाला कीं, अमुक एक वाक्य मी भगवानाच्या तोंडून ऐकलें आहे, किंवा भिक्षुसंघाला या वाक्याचा उपदेश करतांना मीं ऐकला आहे, किंवा कोणाच्या घरीं वृद्ध भिक्षु एकत्र जमून त्यांनीं हें वाक्य उच्चारलेलें मीं ऐकलें, किंवा कोणा विद्वान् भिक्षूच्या तोंडून तें निघालेलें ऐकलें, तर त्याच्या बोलण्यावर प्रथम तुम्हीं भरंवसाही ठेवूं नका, व अश्रद्धाही धरूं नका; तें वाक्य सूत्रपिटक व विनयपिटक यांच्यांतल्या मतांशीं जुळतें कीं नाहीं तें पहा. जर जुळलें तर तें वाक्य त्यानें नीट समजून घेतलें, व

नीट ध्यानात ठेविलें असें समजा, आणि त्याबद्दल त्याचें अभिनंदन करा, पण तें जर जुळलें नाहीं, तर समजा की तें त्याला नीट समजलें नाहीं, आणि त्याच्या त्या वाक्यावर श्रद्धा ठेवूं नका '

धर्मग्रंथाचें अवधानपूर्वक पठन किंवा श्रवण न केल्यानें कसे विचित्र पाठभेद निर्माण होतात, व त्यांवरून पुढें मूळच्या धर्मग्रंथाच्या मताशीं सर्वथा विसंगत अशा अर्थाचा आरोप त्यावर करण्यांत येऊन कसा घोटाळा माजतो, हें ज्यास अवगत आहे त्याला बुद्धानें भिक्षूंना सावध राहण्याविषयीं दिलेल्या या सूचनेचें सर्व मर्म तेव्हांच कळेल

नंतर बुद्धाची स्वारी पावा नामक नगराला गेली हें नगर मल्ल नांवाच्या स्वतंत्र लोकांचें स्थान होतें सांप्रत याला पदरौन म्हणतात हें गोरखपुरापासून उत्तरेस ४० मैलांवर आहे या पावा नगरांत चुन्द नांवाचा एक मनुष्य राहत होता त्यानें बुद्धाला अत्यादरपूर्वक भोजनाला बोलावून त्याला डुकराचें मांस खाऊं घातलें बुद्धानें स्वतः तें खाल्लें, * पण आपल्या

* बुद्ध हिंसेचा निषेध करणारा असतां त्यानें चुन्दाच्या घरीं मांसाहार कसा केला याविषयीं पुष्कळांना आश्चर्य वाटत आहे, आणि तसें वाटणें साहजिक आहे पण या शंकेचें उत्तर निरनिराळे बौद्धधर्मी लेखक निरनिराळ्या तऱ्हेनें देतात कोणी म्हणतात कीं, बुद्धानें शूकरमांस खाल्लें ही गोष्टच मुळीं खरी नाहीं 'शूकर मांस' हें ज्याचें भाषांतर आहे त्या मूळ पालि शब्दाचा अर्थ शूकरकंद असा आहे व शूकरकंद ही एक वनस्पती आहे दुसरे कित्येक म्हणतात कीं बुद्ध हे स्वतः जीवन्मुक्त असल्यामुळें त्यांना कोणत्याही प्रकारचें बंधन नव्हतें परमहंसाप्रमाणें त्यांची वृत्ति असल्यामुळें स्वतः हिंसानिषेध मताचे असून मांसाशन करण्यानें त्याचे हातून पापकर्म घडलें असें म्हणता येत नाहीं कारण असें करा, किंवा तसें करू नका हे विधिनिषेधांचे नियम बद्धांसाठीं आहेत, बुद्धासारख्या जीवन्मुक्तासारख्यासाठीं नाहींत तिसरे कित्येक म्हणतात कीं बुद्धाच्या शिष्यांपैकीं देवदत्त हा शेवटीं शेवटीं बुद्धाशीं द्रोह करून त्याचा नाश करण्यासाठीं टपला होता त्यानें किंवा त्याच्या अनुयायांपैकीं कोणी चुन्दाच्या हातून त्याला विष खाण्यास

बरोबरच्या इतर भिक्षूंना तें वाढूं नका, असें सांगितल्यावरून चन्दानें उरलेलें मांस एका खड्डा खणून त्यांत पुरून टाकलें

आपण बुद्धाला अडाण खाऊं घातल्यामुळें त्याला भयंकर व्याधि जडली असा विचार मनांत येऊन चन्द याच्या मनाला कदाचित् खिन्नता प्राप्त होईल, म्हणून बुद्धानें आनंदाला सांगितलें कीं, 'हे आनंद चन्दाला वाईट वाटत असल्यास तू त्याच्या मनाचें समाधान कर तुझ्या घरीं बुद्ध आपल्या भिक्षुगणासह तृप्ति पावले व त्यांनी निर्वाण प्राप्त होण्यापूर्वी तुझ्या घरीं अन्न ग्रहण केलें व त्या अन्नामुळें त्यांना महल्लाभ घडला, असें सांगून त्याच्या मनांतला खेद दूर कर' यावरून बुद्धाचें हृदय किती कोमल होतें तें दिसून येतें

नंतर आपला अंतकाळ समीप ठेपला आहे, हें पाहून बुद्धानें आपला प्रिय शिष्य आनंद याला बहुविध विषयांवर सूत्रपद्धतीनें उपदेश केला स्त्रीजातीशीं कसें वागावें याविषयीं बुद्धानें सांगितलें कीं, त्यांच्या मुखाकडे भिक्षूंनीं पाहूं नये होईल तों त्यांच्याशीं बोलण्याचा प्रसंग आणूं नये, बोलावयाचेंच असलें तर फार जपून वागावें

दिलें बुद्धानें तें कपट ओळखलें, आणि आपल्याबरोबर आपल्या शिष्यांचा प्राणनाश होऊं नये म्हणून तें अन्न आपल्या शिष्यांना न देतां जमिनींत पुरून टाकण्यास सांगितलें आणि कित्येक असें म्हणतात कीं, सामान्यतः बुद्धाचा हिंसाविरुद्ध कटाक्ष आहे खरा, पण हिंसेचा पूर्ण निषेध त्यानें केला नाहीं अशोक बौद्ध धर्माचा मोठा पुरस्कर्ता असतां त्याच्या पाकशाळेंत रोज पशुहिंसा होत असे हा यामुळेंच इतकेंच नाहीं तर पूर्णपणें शाकाहारी अशा एका ब्राह्मणानें मांसाशनानें पाप लागतें असें कांहीं बुद्धानुयायास म्हटलें तेव्हां बुद्धानें उत्तर केलें कीं, पाप हें मांसाहारानें लागत नसून मनांत दुष्ट विचार आल्यानें व दुष्टपणाचीं कृत्यें केल्यानें लागतें (आमगंध सुत्त पहा) भिक्षूंनीं मांसाहार करूं नये असा निर्बंध घालण्याबद्दल देवदत्तानें बुद्धाला आग्रह केला असतां बुद्धानें त्याचें ऐकलें नाहीं या सर्व हल्ल्या गोष्टींत बरेंच तथ्य दिसतें

बुद्धगुरु व्याधीनें ग्रस्त झाले असून लवकरच त्याच्या निर्वाणनाशीचा समय येणार आहे ही बातमी त्यांच्या शिष्यवृंदांत पसरल्यामुळे शिष्यांच्या झुंडीच्या झुंडी त्यांच्या दर्शनाला येऊं लागल्या गुरूचे शेवटचे उपदेशाचे चार शब्द आपल्या कानीं पडावे ही प्रत्येकाला इच्छा असेच म्हणून ते काहीं ना काही प्रश्न विचारीत व बुद्ध त्यांच्या शंकांचे समाधान करीत असत पण अशा रीतीनें तासचे तास एकसारखें बोलल्यानें अगोदरच क्षीण झालेल्या त्याच्या शरीरास फार क्लेश होत म्हणून दर्शनास येणाऱ्या शिष्यांनीं गुरूला कांहीं विचारूं नये असा आनंदप्रभृति जवळच्या शिष्यांनी नियम केला पण तो नीट पाळला जाईना म्हणून शेवटी दर्शनास जाण्या-लाही प्रतिबंध होऊं लागला एकदा सुभद्र नांवाचा एक शिष्य काही धर्मविषयक शंका घेऊन आला त्याच दिवशीं बुद्धाचे महापरिनिर्वाण व्हावयाचे होतें म्हणून आनंद फारच दक्षतेने रहात होता त्यानें सुभद्राला दर्शनास जाण्याची मनाई केला हें बुद्धाला कळनाच त्यांनीं सुभद्राला येऊं द्या म्हणून सांगितलें इतकेंच नाही तर सुभद्रानें विचारलेल्या शंकांचा उत्तरेंही त्यांनीं मोठ्या उत्सुकतेनें दिला सुभद्रानें विचारलें, 'भगवन्! काश्यप, मस्करी गोशाल कशम्बली वगैरे धर्मोपदेशक उपदेश करतात पण त्याचा धर्मशास्त्रांत कितीसा अधिकार आहे? व ते जो उपदेश करतात तो श्रेयस्कर आहे की नाही?' यावर बुद्धानें उत्तर केल, 'या तीर्थकराच्या अधिकाराबद्दल विचार करण्यापासून काही फलप्राप्ति नाही सम्यक् दृष्टी, सम्यक संकल्प इ० अष्ट आर्यमार्गाचा उपदेश ज्या धर्मांत नाही त्या धर्मांत कोणी श्रमण जन्मास येणार नाहीं, आणि श्रमणांवाचून इतरांचे उपदेश निरर्थक होत' * हा सुभद्र बौद्धांच्या साक्षात् शिष्यांतला शेवटचा होय

नंतर आनंदाला जवळ बोलावून बुद्धानें सांगितलें कीं, "माझ्यामागें माझ्या धर्मप्रवर्तनाचें काय तुला करावें लागेल यापुढे वृद्ध भिक्षूंनीं नव्या

---

* एकूनतिंसो वयसा सुभद्द य पब्बजितं किंकुसलानुएसी।
वस्सानि पञ्ञास समाधिकानि यतो अहं पब्बजितो सुभद्द।
आयस्स धम्मस्स पदेसवत्ती इतो बहिद्धा समणोपि नत्थि॥

भिक्षूंना त्याच्या नावानें किंवा गोत्रानें हाक न मारतां 'आवुसो (हे बन्धो)' याप्रमाणें म्हणावें, आणि नव्यांनीं (तरुणांनीं) वृद्धांना 'भंते वा आयस्मा (माननीय किंवा पूज्य)' असें म्हणावें

बुद्ध, धर्म, संघ, व मार्ग यासंबंधानें कोणाला काहीं शंका विचारावयाची असली तर ती आतां विचारून तिचें निवारण करून घ्यावें, म्हणजे मागाहून कोणत्याही धर्मविषयक प्रश्नासंबंधानें मतभेद होण्याचें कारण उरणार नाहीं, असें बुद्धानें भिक्षूंना सांगून कोणाची शंका उरली नाहीं अशी खात्री झाल्यावर भिक्षुसंघाला उद्देशून म्हटलें—

वस्त्राचीं व कापसाचीं पुटें चढविल्यावर लोखंडाच्या एका पात्रात त्यांत तें सोडलें व तें भांडेंचें भांडें चंदन, अगरू वगैरे सुगंधि काष्ठांच्या चितेवर ठेवून त्यास अग्निसंस्कार देण्यांत आला तास दीड तासांत बुद्धाचा देह अस्थ्यवशेष झाला।

यानंतर या अस्थींचा अंश आपणास मिळावा म्हणून कपिलवस्तूचे शाक्य, अल्लकप्प येथील बुलय, रामग्रामचे कोलिय, पावा येथील मल्ल आणि मगध देशाचा राजा अजातशत्रु यांच्यामध्यें भांडण लागलें तेव्हां द्रोण नांवाच्या ब्राह्मणानें मध्यें पडून त्यांना म्हटलें—

सुनन्तु भोन्तो मम एकवाक्यम् अम्हाकं बुद्धो अहु खन्तिवादो।
न हि साधु अयम् उत्तम पुग्गलस् स शरीरभंगे सिया सम्पहारो॥
सब्बेव भोन्तो सहिता समग्गा सभोदमाना करोम् अट्ठ भागे।
वित्थारिका होन्तु दिसासु थूपा बहुज्जनो चक्खुमतो पसन्नोति॥

अर्थः—भवंत (महाशय)। माझें एक वाक्य कृपा करून ऐकून घ्या आपले बुद्ध महाराज शांतिवादी असत त्याच साधु पुरुषाच्या देहासाबद्दल भांडत बसणें योग्य नाहीं आपण सगळे एकत्र जमला आहां आपण याचे आठ भाग करू सर्व दिशाना स्तूप निर्माण होवोत, आणि चक्षुष्मान् लोक याचें दर्शन घेऊन प्रसन्न होवोत

या गोष्टीला सर्वांची अनुमति पडून त्याप्रमाणें अस्थींचे आठ वाटे झाले द्रोण ब्राह्मणानें अस्थि ठेविलेलें पात्र घेतलें, आणि मौर्य लोकांनीं तेथील अग्नि घेतला मग सर्वांनीं त्यावर आपापल्या खर्चानें स्तूप बांधिले याप्रमाणें आठ भागांवर आठ, पात्रावर एक व अग्नीवर एक, याप्रमाणें एकदर दहा स्तूप बांधण्यांत आले याप्रमाणें भांडणाचा समाधानकारक निकाल लागल्यावर भिक्षुगण उच्चस्वरानें म्हणाले—

'देविन्दनागिन्दनरिन्दपूजितो मनुस्सिन्द सेट्ठेहि तथेव पूजितो।
तं वन्दथ पञ्जलिका भवित्वा बुद्धो हवे कप्पसतेहि दुल्लभोहि॥

# प्रकरण १३ वें.

## दोन धर्मसभा.

[ विषय—पहिली धर्मसभा–तिच्या ऐतिहासिकत्वाविषयीं शंका–तिचें निरसन–बौद्ध धर्माविषयीं अनास्था–तिचीं कारणें–दुसरी धर्मसभा–तिच्या पुढचे प्रश्न व त्याचा निकाल महासंघिका–बौद्धधर्माचे मुख्य व पोट पंथ–त्याच्यांतले ठळक भेद–मगधांतली राज्यक्रांति–चंद्रगुप्त, चाणक्य, बिंदुसार व अशोक ]

बुद्धाच्या निर्वाणानंतर लवकरच त्याचे शिष्य राजगृह येथें जमा झाले, आणि महाकाश्यप नावाच्या एका विद्वान् भिक्षूच्या अध्यक्षत्वाखालीं त्यांनीं एक सभा ( संगीति ) भरविली बौद्धधर्माप्रमाणें कोणत्याही सत्कार्याला प्रारंभ करावयाचे वेळीं मंगलसूचक स्तोत्र म्हणत असतात तीं या सभेच्या वेळीं जमलेल्या पांचशें भिक्षूनीं मिळून म्हटल्यामुळें या सभेला संगीति हें नाव मिळालें या धर्मसभेच्या कामाची सविस्तर हकीगत चुल्लवग्गाच्या ११ व्या अध्यायांत दिलेली आहे बुद्धघोषाच्या ब्रह्मजाल सुत्तावरील टीकाग्रंथांतही या सभेचा उल्लेख आहे पण महापरिनिब्बाणसुत्त या ग्रंथांत मात्र या सभेचा यत्किंचितही उल्लेख नाहीं यावरून ही धर्मसभा झालीच नसावी असें कित्येक पाश्चात्य पंडितांचें अनुमान आहे बौद्धधर्माच्या सगळ्या पंथांत जर या सभेच्या ऐतिहासिकतेविषयीं एक मत आहे तर त्यापुढें वरील निराधार अनुमानाला कोणी विचारा माणूस यत्किंचितही किंमत देणार नाहीं हें उघड आहे

पाली धर्मग्रंथांतून या धर्मसभेची जी हकीकत दिलेली आहे ती थोड क्यांत अशी आहे–भगवान् बुद्धाच्या परिनिर्वाणानंतर त्याच्या शिष्यांपैकीं सुभद्र नावाचा एक शिष्य काहीं भिक्षूंना म्हणाला,—' बांधव हो! दुःख करू नका झाला तो गोष्ट आपल्या हिताचीच आहे आपल्या मागें गुरूनें अतिशय कडक निर्बंध लावून दिले होते ते आतां अनायासेंच सुटतील हें करू नका, आणि तें करू नका, असा प्रतिबंध आज आतां आपणाला

कोणी करणार नाहीं आता आपणाला मनाप्रमाणें वागता येईल' भिक्षुसंघाच्या एकानें असें सर्वथा गर्हणीय भाषण करावें आणि तें इतर भिक्षूंनीं मुकाट्यानें ऐकून घ्यावें यावरून भिक्षूंच्या संघांत असावी तशी शिस्त व पवित्रता राहिलेली नाहीं असें वाटून महाकाश्यप यानें बुद्धाच्या आज्ञा भिक्षूंना पुन नीट समजावून देण्यासाठीं ही सभा बोलाविली या सभेंत धर्म आणि संघ याविषयीं जे नियम बुद्धानें घालून दिले होते त्याविषयींची व कित्येक नियमांच्या अर्थाविषयींची बरीच चर्चा होऊन त्या नियमांची सुधारलेली आवृत्ति तयार झाली ही चर्चा होत असता धर्मविषयक नियमांचे संबधात बुद्धाचा शिष्य आनंद याचें व विनयाच्या संघाबद्दलच्या नियमांचे बाबतींत उपाली याचें मत सर्वांना ग्राह्य होऊन सभेचें काम निर्विघ्नपणें पार पडलें याबद्दल सर्वांना संतोष वाटला

या सभेच्या ऐतिहासिकतेसंबधानें पडिताना शका का यावी तें कळत नाहीं बुद्धाच्या चारित्र्याच्या प्रभावामुळें, त्याच्या अंगच्या अलौकिक आकर्षणशक्तीमुळें, त्याच्या उत्तमोत्तम उपदेशाच्या योगानें अंत करणांत पडलेल्या प्रकाशामुळें किंवा बुद्धानें दाखविलेल्या मार्गानें जाण्याच्या निश्चयामुळें कांहीं जण संसाराचा त्याग करून भिक्षुसंघात एकदम प्रविष्ट झाले असतील पण त्याबरोबर बरेचसे इतर लोक केवळ त्या धर्माच्या नवीनपणाला भुलून, बौद्धधर्मी राजांना खुष करण्यासाठीं, क्षणिक वैराग्याच्या लहरींत अथवा केवळ विक्षिप्तपणाचें कृत्य म्हणून संघात प्रविष्ट झाले असल्याचाही संभव आहे कित्येक तर केवळ मतलबासाठीं--जीवकासारख्या नामांकित वैद्याचे हातून आपल्या रोगाचा परिहार व्हावा या हेतूनें--बुद्धाच्या शिष्यमंडळींत प्रविष्ट झाले होते हें मागें एका प्रकरणात सांगितलेंच आहे बुद्धाच्या चारित्र्याचा प्रभाव, त्याच्या उपदेशाचे संस्कार किंवा बौद्धधर्मातली नवीनपणाची जादू त्याच्या निर्वाणानंतर अशा शिष्यांना पूर्वीच्यासारखीच वर्षानुवर्षे झुलवीत राहिली असेल हें संभवनीय नाहीं शिवाय भिक्षु झाले तरी ते मनुष्यप्राणीच होते फारच कडक निर्बंधाखालीं सारा जन्म काढणें त्याच्यापैकीं कित्येकांच्या तरी

मोठें जिवावर आलें असलें पाहिजे अशापैकीच वर सांगितलेला सुभद्र हा असेल, आणि त्याचें भाषण जरी उद्दामपणाचें आणि भिक्षुवृत्तीला न शोभणारें असलें तरी तें विचार करण्यासारखें आहे असें बुद्धाच्या गादीचा अधिकारी होण्याइतकी ज्याची योग्यता होती अशा महाकाश्यपाला वाटून त्यानें सुभद्राच्या असंतोषाचा स्पर्श इतरांना होऊं नये म्हणून सावधगिरीनें ही पहिली धर्मसभा बोलाविली असला पाहिजे हें युक्तीच्या दृष्टीनेंहि सुसंगत दिसतें

धर्माविषयींच्या लोकांचा उत्साह थंड पडण्याला बुद्धाचें निर्वाण किंवा संघाचे कडक नियम याशिवाय दुसरींहि कित्येक कारणें होतीं यावेळीं राजकीय परिस्थितींत मोठी घडामोड सुरू होती मगधराज अजातशत्रु यानें वज्जी लोकांचें प्रजातंत्र राज्य पादाक्रांत करण्याचे प्रयत्न अनेक वेळां केले होते पण त्या लोकांतली एकी व कर्तव्यतत्परता यापुढें मगधाच्या सैन्याचें कांहीं चालेना शेवटीं एकदां संधी साधून अजातशत्रूनें तें राज्य घेतलें. मगध राज्याचा हळू हळू विस्तार होऊन तें प्रबळ होऊं लागलें हें पाहून कोसंबी व श्रावस्ती या राज्यांनाही आपल्या स्वतःच्या सुरक्षितपणाविषयींची काळजी उपस्थित झाली, आणि या एका बाजूला मगध व दुसऱ्या बाजूला हीं दोन राज्यें असे उघड उघड दोन पक्ष झाले कांहीं लोक या पक्षाला तर कांहीं त्या पक्षाला मिळाले चोहोंकडे धारस्थान सुरू झालें अशा अस्वस्थतेच्या काळांत धर्माविषयींचा उत्साह कोठवर टिकणार? जे लोक खऱ्या भावानें बौद्धधर्मांत आलेले नव्हते त्यांना आतां परत ब्राह्मणधर्मांत जाण्याची आतुरता वाटू लागली, आणि लोकांचा धर्माविषयाची अनास्था व उदासीनता धर्मांतर करणाऱ्याच्या पथ्यावर पडला

संघाबद्दलचे कडक निर्बंध आणि कित्येक आचार यांत पहिल्या धर्मसभेनें कांहीं सुधारणा करून लोकांच्या तक्रारी मिटविल्याचें वर सांगितलेंच

१ ही वत्साची राजधानी होती ही वाराणशीहून २७० मैलांवर मगधाच्या काठीं होती २ हा उत्तरकोसलाची राजधानी होती ही नेपाळच्या राज्यांत होती हल्ली या जागीं जंगल वाढलें आहे असें म्हणतात

आहे पण एवढ्यानें असंतोषाचें बीज समूळ खणलें गेलें नाहीं. तो वरवरचा उपाय होता. त्यानें क्षणिक शांति स्थापित झाली येवढेंच कायतें. पण सुभद्रानें उपस्थित केलेल्या प्रश्नाचा कायमचा निकाल लावून टाकला नाहीं. धर्मशास्त्रातल्या वचनाच्या अर्थासंबधानेंही कित्येक प्रश्न उपस्थित झाले आपल्या अडचणी बोलून दासविण्याची प्रवृत्ति भिक्षूंमध्यें जास्त जास्त स्पष्ट दिसूं लागली. बुद्धाच्या निर्वाणानंतर दोनशें वर्षांच्या आतच दुसऱ्यानें धर्मसभा बोलावण्याची आवश्यक्ता दिसून आली. ही दुसरी धर्मसंगीति (सभा) वैशाली येथील भिक्षूंच्या आग्रहावरून भरविण्यात आली होती. याही सभेची हकीकत विनयपिटकांतील चुल्लवर्गाच्या १२ व्या अध्यायात आणि त्याचप्रमाणें बुद्धघोषाच्या टीकाग्रंथात सापडते. ती अशी —भगवान् बुद्ध निर्वाणाप्रत गेल्यानंतर शंभर वर्षांनीं वैशाली येथील वज्जि लोकांपैकीं काहीं बौद्धभिक्षूंना असें वाटावयास लागलें कीं, बुद्धानें घालून दिलेल्या नियमाप्रमाणें पुढील गोष्टी करण्यास अनुज्ञा आहे.—१ शिंगातून मीठ ठेवण्यास हरकत नाहीं २ दुपारचें जेवण दोन प्रहरापर्यंतच नव्हे तर दोन ईंच लांबपर्यंत सावली पडेपर्यंत करण्यास हरकत नाहीं ३ दुसऱ्या गावाला गेल्यानंतर ताजें अन्न खाण्यास हरकत नाहीं ४ त्याच परगण्यात राहून उपोसथ स्वतंत्र रीतीनें पाळता येतो (प्रो. ऱ्हिस डेव्हिडस याचा अर्थ असा करतात कीं मठांतून उपोसथ पाळण्यासाठीं स्वतंत्र जागा नेमून दिलेली असे त्या जागींच धर्माची दीक्षा देणें किंवा पापदेशना म्ह० पापें कबूल करणें इ० धर्मकृत्यें केलीं पाहिजेत असें नाहीं, तर हीं कृत्यें ज्याला त्याला आपल्या घरीं बसून सुद्धा करतां येतील ) ५ परवानगी (एखादी

---

१ वैशाली (पाली–वेसाली) हें लिच्छवि लोकाच्या राजधानीचें ठिकाण होतें २ या पैकीं काहीं गोष्टींचा हल्लींच्या काळीं नीटसा अर्थ बोधही होत नाहीं यात आश्चर्य नाहीं कारण त्या काळचे एक मुख्य थेर (स्थविर) रेवत यानाही तो झाला नव्हता असें त्याच्या उल्लेखावरून दिसतें. ३ ज्याप्रमाणें ख्रिस्ती लोकाचा Sabbath (रविवारचा विश्रांतीचा दिवस) त्याप्रमाणें उपोसथ म्हणून बौद्धाचे काहीं विशेष दिवस असत.

गोट करण्यासाठीं जेथें सघाची परवानगी लागते तेथें ती नेहमीं अगोदरच घेतली पाहिजे असा कडक नियम नाहीं जरूरीच्या प्रसगीं अगोदर तें कृत्य करून मागाहून ती मिळविली तरी चालतें ) ६ मागील वहिवाट ( एखादें कृत्य बरें वाईट ठरविताना तसें कृत्य पूर्वी एखाद्यानें केलें होतें काय हें पाहून तें जर खपलें तर हेंही खपण्यास हरकत नाहीं असें म्हणता यतें ) ७ घुसळलें नसेल असें दूध पिता येतें ८ फसफसलेली नाहीं अशी माडी पिण्यास हरकत नाहीं ९ जिला झालर नाहीं अशा चटईवर बसण्यास हरकत नाहीं १० सुवर्ण व रजत ( रुपें ) यांचें ग्रहण करण्यास प्रतिबंध नाहीं या दहा गोष्टींना पाली भाषेंतील ग्रथांतून दसवत्थूनि असें नांव आहे. या दहा सवलती घणाऱ्या बौद्ध भिक्षूंच्या मनाचा व धर्मावरील श्रद्धेची यावेळा किती हीन स्थिति झाला होती व भगवान् बुद्ध यानें घालून दिलेल्या कडक निर्बंधाचा हेतु सुद्धा कळण्याइतका पात्रता कित्येक भिक्षूंच्या ठायीं कशी राहिली नव्हती तें यावरून दिसून येईल

ही सभा भरविण्यास कोणतीं कारणें झालीं व ती भरविण्याचे आधी काय काय भानगडी झाल्या, त्यांत कोणाकोणाचें श्रम झाले वगैरे पुष्कळ गोष्टी पाली ग्रथांतून आहेत, पण त्या येथें देण्याची अवश्यकता दिसत नाहीं काकण्डक पुत्र स्थविर यशस् यानें महावनात राहत असतां तेथील वज्जि भिक्षूमध्यें जो अनाचार प्रत्यक्ष घडत असलेला पाहिला तो दूर करण्याकरिता व या प्रश्नाचा समाधानकारक निकाल लावून घेण्याकरिता अतिशय खटपट केली व वज्जि लोकांनीही त्याला बहिष्कार घालण्याची आणि दशोदशींच्या भिक्षूंचीं मनें आपल्या

१ ही हकीकत सीलोनच्या म्हणजे हीनयानपथातील ग्रथावरून घतली आहे त्या पथातील लोकांनीं विरुद्ध पथातल्या भिक्षुविषयीं असे उद्गार काढणें स्वाभाविक आहे महायानपथाचें म्हणणें यासबधात निराळें आहे ते म्हणतात कीं या दहा सवलती वैशालीचे भिक्षु स्वत करिता मागत नव्हते तर गृहस्थ वर्गाकरिता मागत होते बुद्धानें घालून दिलेले कडक आचार भिक्षुसाठीं ठीक होते, पण रूढीनें जे प्रपची माणसांच्याही माथीं मारले होते त्या रूढींतून त्यांना मोकळे करण्यासाठी ही खटपट होती

बाजूला वळविण्याची जोरानें खटपट केली, पण वज्जि भिक्षूंच्या खटपटीला यश न येता यशसूच्या प्रयत्नाला यश आलें, आणि सर्वकामिन् साल्हा, खुज्ज सोभित, वासभगमिक, खेत, सभूत, यशस् आणि सुमन याच्या कमिटीनें वज्जि भिक्षूंच्या विरुद्ध निकाल दिला या सभेला ७०० भिक्षु आले असून सभेचे काम आठ महिने चाललें होतं सभेनें आपल्या विरुद्ध निकाल दिल्या बरोबर ही सभा यथाशास्त्र झाली नाहीं व तिला अखेर निकाल देण्याचा अधिकारच नव्हता असा राग करून वज्जि भिक्षूंनीं दुसरी एक सभा भरविली व तिला महासघिका असें नाव दिलें

किलेक ग्रथकारांचें विशेषत उत्तरेकडील देशातल्या बौद्ध ग्रथकारांचें असें म्हणणें आहे की महासघिका या नावाची धर्मसभा याचेळा भरली होती ही गोष्ट खरी आहे पण ती वर सागितलेल्या दहा गोष्टींसबधानें विचार करण्याकरिता भरलेली नसून तिचा वैशाली येथील संगीतीशीं कोणत्याही प्रकारचा संबध नव्हता धर्मशास्त्र विषयावरील ग्रथाचा नवा सग्रह करण्यासाठीं महासंघिका सभा भरली होती कोणा असें ही म्हणतात की कालाशोक नावाच्या एका राजाच हिला पाठबळ होतें यावर दुसरे कित्येक असा तर्क करतात की या सभेला पाठबळ देणारा कालाशोक हा दुसरा कोणी नसून प्रसिद्ध चक्रवर्ती बौद्धधर्मप्रतिपालक राजा अशोक तोच हा होय

महासघिका किंवा महासगीति या सभेनें धर्म बुडविला, मूळच्या धर्मशास्त्राची उलथापालथ केली, एका विषयासबंधाचा शास्त्रार्थ दुसऱ्याला लावून घोटाळा माजविला, पाच निकायाच्या मताचा विपर्यास केला, अर्थाचे अनर्थ केले, उद्देश जमेला न धरता नुसत्या शब्दाच्या बाह्य स्वरूपावरून भलतेच अर्थ काढले, सुत्त आणि विनय याना बाजूला सारून-विनयपीटकातलें शेवटचें पुस्तक परिवार हें आहे त्यावरील टीका आणि अभिधम्माचीं सहा पुस्तकें, खुद्द निकायांतील पटिसभिदा आणि निदेश हा प्रकरणें आणि जातकाचा कांहीं भाग हीं सर्व त्याज्य समजून त्याना त्या जागा नवे ग्रंथांना नेऊन बसविले, अशी तक्रार सालोनच्या दीपवंशानें केली आहे.

बौद्धसंघात उघड उघड दोन पक्ष आतां झाले होते यांच्या पोटांत आणखी दुसरे १८ पथ होते, व त्या प्रत्येकाच्या पोटात पुन आणखी पथ, असे होता होतां का द्यान याच्या वेळीं एकंदर ९६ पथ अस्तित्वांत होते हे इतके पंथ बहुतेक अगदीं क्षुद्र मतभेदांवरून झाले असले पाहिजेत कारण, मुख्य मुद्याच्या गोष्टीत त्यांचा मतभेद झाला असता, तर ठळक ठळक बौद्धग्रंथांतून त्यांचा उल्लेख झाला असता हीनयान व महायान असा भेद अद्याप झालेला नव्हता हे सगळे पंथ बुद्धानें उपदेशिलेल्या एका अविभक्त धर्माचे होते हे निरनिराळे धर्मपंथ परस्परांहून निवळ मताच्याच पुरत निराळे होते किंवा त्यांचे संघ वेगळे, मठ वेगळे, मठाधिकारी वेगळे, असा सर्वच बाबतींत विभक्तपणा होता, हें कळण्याला सध्या काहीं साधन उपलब्ध नाहीं

कथावत्थु नांवाच्या पालीभाषेतल्या ग्रंथावरून असें दिसतें कीं या पंथाच्या मतांचा भिन्नपणा ज्या तीन मुख्य बाबतींत होता त्या तीन बाबा या·

१ बौद्ध धर्माच्या मुख्य मतांपैकीं एक मत अनात्मता ( अनात्मता ) हें आहे या मताचें स्पष्टीकरण पुढें एका प्रकरणांत करण्यांत येणार आहे बुद्ध आत्म्याचें अस्तित्व मानणारा नव्हता त्याच्या धर्माची इमारत या समजुतीवरच उभारली होती पण त्याच्या निर्वाणानंतर कित्येक बौद्धांच्या मनावर ब्राह्मण-धर्माचा पगडा बसून ते आत्म्याचें अस्तित्व अप्रत्यक्ष रीतीनें कबूल करूं लागले

२ बुद्ध स्वत ला कधीं देवाचा अवतार म्हणवीत नसे अवताराची कल्पनाच बौद्धधर्मांत मुळीं नाहीं असें असतां बुद्धाच्या अत्यंत भाविक अशा कित्येक भक्तांनीं त्याचें माहात्म्य वाढवीत वाढवीत इतकें वाढविलें कीं ते त्याला देवाचा अवतार समजू लागले, आणि त्याच्या जन्माचे वेळीं आकाशातून पुष्पवृष्टि झाली किंवा इद्रलोकीं सभा भरून देवांनीं आनंदोत्सव केला आणि निर्वाणाला गेल्यावर बुद्धाला देवांच्या सभेंत उच्चासन मिळालें, भूकंप झाला, अशा त हेचे अलौकिक किंबहुना दैविक चमत्कारांवर त्यांचा भरंवसा बसूं लागला, आणि बुद्ध हा सृष्टीचे नियम हवे त्या वेळीं इच्छामात्रेंकरून बदलण्यास समर्थ आहे अशी त्यांची समजूत होऊन बसली

बुद्धधर्मी मनुष्याचें ध्येय अर्हत् पदाची प्राप्ति हें नसून बोधि-सत्वपद प्राप्त करून घेणें होय अशी कित्येकांची समजून झाली. या तिन्ही गोष्टींवरून हें दिसून येईल कीं, एकीकडे बौद्धधर्माला आधारस्तंभ असाकोणी राहिला नाहीं, त्या धर्मांत अराजकता माजली ही गोष्ट आणि दुसरीकडे ब्राह्मणधर्माशीं जसजसा ज्यास्त ज्यास्त संसर्ग येत चालला तसतशीं त्या धर्मांची मतें बौद्ध मतांत घुसून एक प्रकारचें विचित्र मिश्रमत तयार होऊं लागलें.

ह्या धर्मसंबंधांत क्रांतीची तयारी इकडे चालली असतांना तिकडे मगध राज्यात एकाजंगी राज्यक्रांतीची तयारी सुरू होती. वर सांगितलेल्या दोन धर्म-सभा झाल्या त्या सुमारास किंबहुना त्यांच्या किंचित् अगोदर हलक्या कुळांत जन्मलेल्या एका तरुणाला हातीं धरून एका मुत्सद्दी, चाणाक्ष व महत्वाकांक्षी ब्राह्मणानें मगधाच्या गादीवरल्या राजाच्या वंशाचा उच्छेद केला, त्या तरुणाला त्या गादीवर बसविलें व त्याला चक्रवर्ती राजाच्या पदवीला चढ-विलें हा तरुण म्हणजे चंद्रगुप्त व ब्राह्मण-मुत्सद्दी म्हणजे त्याचा मंत्री चाणक्य हा होय. दुसऱ्या धर्मसभेनंतर महासंघिका म्हणून जी सभा झाल्याचें वर

१ जे कोणी दिव्य ज्ञानाच्या योगानें तृष्णेला जिंकून अहता, अविद्या इ गोष्टींपासून पूर्णपणें अलिप्त राहतात, संसारांतल्या सगळ्या गोष्टींची यथार्थ किंमत ओळखतात, विश्वप्रेम ज्यांचे ठायीं असतें, व जे सदा जागृत आणि परोपकारांत निमग्न असतात ते अर्हत् पदाला पोंचले असें बौद्ध समजतात. अर्हत हे अर्थात कोणी दैविक प्राणी नसून या जगांतलेच मर्त्य आहेत अशी समजूत होती

२ बोधिसत्व हें पद बुद्धाच्या काळीं असताना लावीत कीं जे बुद्धानें दाखवि लेल्या अष्टांग-मार्गानें जाऊन बुद्धत्व प्राप्तीच्या अगदीं जवळ पोंचले होते हा मूळचा अर्थ बहुतांशानें पुढेंही कायम राहिला. फरक येवढाच झाला कीं या कल्पनेवर ब्राह्मणधर्माची छाया पडून लोकांची अशी समजूत झाली कीं बोधिसत्व हे स्वर्ग-लोकीं राहतात व तेथून या मृत्यु-लोकच्या लोकांच्या आध्यात्मिक कल्याणाची काळजी वाहतात इतकेंच नाहीं, तर प्रसंग-विशेषीं लोकांच्या उद्धारार्थ अवतार घेऊन येतात सारांश, बोधिसत्वांना देव व देवता यांच्या वर्गांत पुढें स्थान मिळालें.

सांगितलें आहे, तिला मदत करणारा अशोक नसून हा चंद्रगुप्तच होता असें कित्येकांचें म्हणणें आहे

राजा चंद्रगुप्त व त्याचा पुत्र बिंदुसार दोघेहि बौद्धधर्मी नव्हते या *बिंदुसाराचा मुलगा अशोक यानें मात्र स्वतः बौद्ध धर्माचा स्वीकार केला* इतकेंच नाहीं, तर बौद्धधर्म या पृथ्वी तलावर सर्वत्र पसरावा व चिरकाल टिकावा, म्हणून शक्य तवढे मानवी प्रयत्न केले, आणि बौद्धधर्माच्या इतिहासांत आपलें नांव चिरस्मरणीय करून ठवलें सिद्धार्थ गौतम याचे मागून बौद्धधर्माच्या इतिहासांत अशोकाइतका ठळक आणि महत्वाचा पुरुषच झाला नाहीं असें म्हटलें तर अतिशयोक्ति होणार नाहीं या राजाविषयींची कथा पुढील प्रकरणांत येईल

---

# प्रकरण १४ वें.

## राजा अशोक.

[ **विषय**—अशोकाविषयीच्या दंतकथा—त्यांचा असंभवनीयता—बौद्ध धर्माच्या प्रसाराचे उपाय—धर्मप्रचारक महिंद व संघमित्रा—तिसरी धर्मसभा—कोरीव लेख—चौदा आदेश—गुहांतील लेख—परोपकाराचा कृत्य—समाजावर परिणाम—पूर्वीच्या बुद्धाविषयी पूज्यबुद्धि—अशोकाचा राज्यविस्तार—लेखांत उपदेशिलेली नीति—राण्या—पुत्र—अशोकाच्या माग मगधराज्याची स्थिति—बौद्ध धर्माची स्थिति—परदेशीय राजाच्या स्वाऱ्या—कुशान वंशाची स्थापना ]

मौर्य वंशांतला तिसरा राजा आणि प्रसिद्ध मगधराज चंद्रगुप्त याचा नातु अशोक हा इ० स० पूर्वी २७२ किंवा २७३ या वर्षी मगधाच्या गादीवर बसला हा आपल्या तारुण्यांत अतिशय दुर्वर्तनी, दुष्ट आणि क्रूर होता आणि यानें आपल्या ९९ भावांना ठार मारून मगधाची गादी बळकाविली अशा दंतकथा आहेत *पण त्या केवळ त्या राजाच्या भगती पुढें दिसून आलेली धर्मश्रद्धा* अधिक खुलून दिसावी या साठीं बौद्ध-ग्रंथकारांनी मागाहून रचिल्यासारख्या

बुद्धधर्मी मनुष्याचें ध्येय अर्हत् पदाची प्राप्ति हें नसून बोधि-सत्वपद प्राप्त करून घेणें होय अशी कित्येकांची समजूत झाली. या तिन्ही गोष्टींवरून हें दिसून येईल कीं, एकीकडे बौद्धधर्माला आधारस्तंभ असाकोणी राहिला नाहीं, त्या धर्मांत अराजकता माजली ही गोष्ट आणि दुसरीकडे ब्राह्मणधर्माशीं जसजसा ज्यास्त ज्यास्त संसर्ग येत चालला तसतशीं त्या धर्मांचीं मतें बौद्ध मतांत घुसून एक प्रकारचें विचित्र मिश्रमत तयार होऊं लागलें.

ही धर्मसंबंधांत क्रांतीची तयारी इकडे चालली असतांना तिकडे मगध राज्यांत एका जगीं राज्यक्रांतीची तयारी सुरू होती. वर सांगितलेल्या दोन धर्म-सभा झाल्या त्या सुमारास किंबहुना त्याच्या किंचित् अगोदर हलक्या कुळांत जन्मलेल्या एका तरुणाला हातीं धरून एका मुत्सद्दी, चाणाक्ष व महत्वाकांक्षी ब्राह्मणानें मगधाच्या गादीवरल्या राजाच्या वंशाचा उच्छेद केला, त्या तरुणाला त्या गादीवर बसविलें व त्याला चक्रवर्ती राजाच्या पदवीला चढ-विलें. हा तरुण म्हणजे चंद्रगुप्त व ब्राह्मण-मुत्सद्दी म्हणजे त्याचा मंत्री चाणक्य हा होय. दुसऱ्या धर्मसभेनंतर महासांघिका म्हणून जी सभा झाल्याचें वर

१ जे कोणी दिव्य ज्ञानाच्या योगानें तृष्णेला जिंकून असतात, अविद्या व मोहापासून पूर्णपणें अलिप्त राहतात, संसारांतल्या सगळ्या गोष्टींचें यथार्थ स्वरूप ओळखतात, विश्वप्रेम ज्यांचे ठायीं असतें, व जे सर्वदा जागृत आणि परोपकारांत निमग्न असतात ते अर्हत् पदाला पोंचले असें बौद्ध समजतात. अर्हत हे अथवा कोणी दैविक प्राणी नसून या जगांतलेच मर्त्य आहेत अशी समजूत होती.

२ बोधिसत्व हें पद बुद्धाच्या काळीं अशांना लावीत कीं जे बुद्धानें दाखवि-लेल्या अष्टांग-मार्गानें जाऊन बुद्धत्व प्राप्तीच्या अगदीं जवळ पोंचले होत. हा मूळचा अर्थ बहुतकानें पुढेंही कायम राहिला. परंतु येवढाच झाला कीं या कल्पनेवर ब्राह्मणधर्माची छाया पडून लोकांची अशी समजूत झाली कीं बोधिसत्व हे स्वर्गांत राहतात व तेथून या मृत्यु-लोकच्या लोकांच्या आध्यात्मिक कल्याणाची काळजी वाहतात इतकेंच नाहीं, तर प्रसंग-विशेषीं लोकांच्या उद्धारार्थ अवतार घेऊन येतात. सारांश, बोधिसत्वांना देव व देवता यांच्या वर्गांत पुढें स्थान मिळालें.

२३६ वर्षांनीं म्हणजे अशोक राजाच्या राज्याभिषेकानंतर १७॥ वर्षांनीं (इ. स. २५३ या वर्षी) तिसरी धर्मसभा बोलाविली.

ही सभा सर्व पंथांची नव्हती. मागच्या प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें महासंघिकांच्या बरोबर भांडणें झाल्यापासून ज्यांनीं आपणास्वत स थेरवादी किंवा विभज्यवादी म्हणविलें होतें अशांची ही सभा होती. या सभेची हकीकत सिंहली ग्रंथांतून दिलेली आहे, पण तिच्यावर कितीसा विश्वास ठेवावा हा प्रश्न आहे कारण कीं ती येथून तेथून अतिशयोक्तीनें आणि कल्पनातीत गोष्टींनीं भरलेली आहे. या सभेला ६०००० भिक्षु आलेले होते ही उघड उघड अतिशयोक्ति आहे. कारण कीं दुसऱ्या एका ग्रंथांत फक्त एक हजार भिक्षु हजर असल्याचा उल्लेख सापडतो, आणि ही संख्या खरी दिसते. या सगळ्या कथेचा उद्देश महाविहारांतले विभज्यवादी तेवढे खरे परंपरागत शुद्ध बौद्ध होत हें दाखविण्याचा दिसतो. इतर पंथांची मंडळी हा भलताच हक्क कसा शाबीत होऊं देईल[1] पूर्वी थेरवादी आणि महासंघिक ऊर्फ आचार्यवादी असे दोनच पक्ष होते. पण आता थेरवादांतून महीशासक व वज्जि-पुत्तक असे आणखी पोटपक्ष झाले. धर्मोत्तरिक, भद्रयानिक, सम्मागीरिक, आणि संमितीय असे वज्जि-पुत्तकांचे आणखी भेद होते.

बौद्ध धर्माचीं मतें मूळ शुद्ध रूपांत कायम राहावीं व त्या धर्माचा सर्वत्र प्रसार व्हावा म्हणून उपाय योजणें हा या सभेचा मुख्य उद्देश होता हा उद्देश साधण्यासाठीं तिष्य यानें खोट्या धर्ममतावर टीका करून त्या मताचा फोलपणा सिद्ध करून दाखविला, आणि खऱ्या मताची प्रस्थापना करून अभिधम्मावरील कथावत्थु नावाचें आपलें भाष्य जमलेल्या मंडळीस समजावून सांगितलें. बौद्धधर्माचा प्रसार हिंदुस्थानच्या दूरदूरच्या प्रांतांतून व बाहेरही व्हावा म्हणून काश्मीर, गांधार, महाराष्ट्र, सिंहलद्वीप, ब्याक्ट्रिया वगैरे

---

१ इ. स. च्या तिसऱ्या शतकांत थेरवादी अथवा स्थविर यांतून सर्वास्तिवादी (यांना हेतुवादी अथवा विभज्यवादी असेंही म्हणत) व जुने स्थविर (यांना हैमवत म्हणत) असे दोन पंथ झाले.

देशांतून धर्मप्रचारक पाठविण्याचेंही या सभेनें ठरविलें. या सभेच्या इच्छेप्रमाणें अशोकानें लागलाच कांहीं धर्मप्रचारकांना देशोदेशीं पाठविलें, वगैरे हकीकत या प्रकरणांत वर दिली आहे.

अशोकाच्या चरित्राची व तात्कालीन बौद्धधर्मविषयक परिस्थितीची ऐतिहासिक सामुग्री पुरविण्याचें काम आजपर्यंत त्याच्या शिलास्तंभावरील लेखांनीं केलें आहे. *गेल्या पन्नास वर्षांत त्या राजानें मागें ठेविलेल्या अनेक* शिलालेखांचा शोध लागला आहे. हें शोध लावण्याचें काम पाश्चात्य शोधकांनीं अत्यंत परिश्रमपूर्वक केलें आहे, आणि हिंदुस्थानच्या प्राचीन इतिहासावर अलीकडे जो नवा प्रकाश पडूं लागला आहे त्याबद्दलचें सगळें श्रेय मि॰ प्रिन्सेप, जनरल कनिंगहाम, मि॰ सेनार्ट, व मि॰ व्हिन्सन्ट स्मिथ या पाश्चात्य पंडितांना आणि त्याप्रमाणें त्यांनीं घालून दिलेला स्तुत्य कित्ता वळवून इतिहास-संशोधनाचें काम शास्त्रीय पद्धतीनें करून दाखविणाऱ्या डॉ॰ भाऊ दाजी, भगवानलाल इंद्रजित, डॉ॰ राजेंद्रलाल मित्र व डॉ॰ भांडारकर प्रभृति हिंदी पंडितांना देणें वाजवी आहे. यांच्या परिश्रमानें आजपर्यंत अशोक राजाच्या वेळचे कोणकोणते कोरीव लेख उजेडांत आले व हिंदुस्थानच्या प्राचीन इतिहासांत त्यांचें महत्व किती आहे हें विस्तारानें सांगणें येथें शक्य नाहीं. तथापि थोडक्यांत या विषयाचें दिग्दर्शन करणें अवश्य आहे.

## अशोकाचे कोरीव लेख.

(१) जयपुर संस्थानांत बैराट येथें खडकावर कोरलेला एक लेख सांपडला. यांत अशोकाच आत्मचरित्राचा कांहीं महत्वाचा भाग आहे. बौद्धधर्माकडे आपली प्रवृत्ति झाल्यानंतर अडीच वर्षेपर्यंत आपण फक्त उपासक होतों, व त्यावेळीं धर्मप्रसारार्थ कांहीं खटपट आपले हातून झाली नाहीं, पण नंतर संघांत *प्रविष्ट झाल्यावर जम्बुद्वीपांतलीं ( ब्राह्मणांचीं ) धर्ममतें व त्यांचे* देव खोटे आहेत असें आपण दाखविलें असें अशोकानें म्हटलें आहे. आणि सर्वांनीं यथाशक्ति अशीच खटपट करावी अशी आज्ञा केली आहे.

(२) मध्य प्रांतांत जबलपूर जिल्ह्यांत रूपनाथ येथें सांपडलेल्या लेखांत वरच्याच मजकुराची पुनरुक्ति आहे.

( ३ ) शहाबाद जिल्ह्यांत सहसराम येथें—मजकूर सदरप्रमाणें.
( ४ ) म्हैसूर संस्थानांत सिद्धपूर येथें—सदर
( ५ ) सदर . ... सदर

याशिवाय भावरा आदेश; म्हणून जो महत्त्वाचा आदेश आहे, तो जयपूर संस्थानात बैराट येथें आहे. हा अशोक राजानें आपल्या कारकीर्दीचे अखेरीस भिक्षु व भिक्षुणी याना उद्देशून लिहिला आहे यात भगवान् बुद्धानें केलेले सगळेच उपदेश चांगले आहेत, पण त्यातल्या त्यात आपण त्यांतली सात वचनें निवडून काटली आहेत, त्याचें तरी नीट मनन करा अशी आग्रह पूर्वक विनंति केली आहे. ( हीं सात वचनें म्हणजे विनयप्रशंसा, आर्यांचं अलौकिक शक्ति, भविष्याविषयींची भीति, तपस्व्याचें गीत, तपस्व्याच्या जीव नाविषयींचा सवाद, उपतिष्याचे प्रश्न, आणि राहुलाला केलेला उपदेश हीं होत यासबधानें थोडेसें विवेचन या प्रकरणात पुढें केलें आहे तें पहावें )

## खडकावरील चौदा आदेश.

( १ ) युसफझई प्रदेशांत शहाबाजगढी येथें.
( २ ) हजारा जिल्ह्यात मनसाहरा येथें
( ३ ) देहराडून जिल्ह्यात कालसा येथें
( ४ ) ठाणें जिल्ह्यात सोपारा येथ
( ५ ) जुनागढ संस्थानात गिरनार येथें.
( ६ ) पुरी जिल्ह्यांत धौली येथें
( ७ ) गजम जिल्ह्यात जौगढ येथें. [ कलिंगाचा आदेशहीं धौली व जौगढ येथें आहे ]

सातवा स्तंभावरील आदेश दिल्लीसच फक्त आहे बाकीचे आदेश पुढील सहा ठिकाणीं आहेतः—
( १ ) तोपराहून काढून दिल्लीस नेला.
( २ ) मिरतहून काढून दिल्लीस नेला.
( ३ ) कौशांबीच्या कोशांबीहून काढून अलाहाबादेस नेला.

( ४ ) लौरिया-अराराज येथें.
( ५ ) लौरिया-नंदगड येथें.
( ६ ) रामपूर्वा येथें.

याशिवाय सांची येथेंही एक स्तंभ आहे. हा अशोकाच्या वेळीं उभारला गेला.

वर सांगितलेल्या चौदा आदेशांत अशोकानें नीतीनें वागण्याचा, धर्माविषयीं आस्था बाळगण्याविषयींचा आणि दया, सत्यप्रीति, औदार्य, पावित्र्य, इ० गुणांचा विकास करण्याचा उपदेश केला आहे प्रत्येकानें आत्मपरीक्षण करून पापप्रवृत्ति टाळावी, हिंसा करूं नये, व सर्वांविषयीं मैत्रीभाव बाळगावा, असें सांगून आपली प्रजा त्याप्रमाणें वागते कीं नाहीं हें पाहण्यासाठीं व लोकांना धर्माचें व नीतीचें शिक्षण देण्यासाठीं कामदार नेमल्याविषयींही जाहीर केलें आहे. या चौदा आदेशांपैकीं दुसरा इतिहासदृष्ट्या फार महत्त्वाचा आहे. कारण कीं त्यांत त्यावेळच्या हिंदु राजाचा व त्याचप्रमाणें सीरियाच्या आंटिओकस राजाचा उल्लेख आहे. पांचव्यांतही अशाच प्रकारचे उल्लेख आहेत, व तेराव्यांत कलिंग-विजयाची हकीकत आहे यांत एके ठिकाणीं ' आंतियोका नाम, (योनराज परंच तेन आंतियोकेन चतुर राजानि) तुरमयेनाम, आंतिकिनमाम, मकनाम, अलिकसुंदरनाम ' अशीं पांच ग्रीक राजांचीं नांवें आलीं आहेत.

धौली येथील आदेशांत पंचवार्षिक धार्मिक उत्सवाचा उल्लेख असून हे उत्सव उज्जयिनी व तक्षशिला येथें दर तीन वर्षांनीं करण्याविषयींची आज्ञा आहे.

सहस्राम आणि रूपनाथ येथील आदेशांत निरनिराळ्या देशांत मिळून एकंदर २५६ धर्मप्रचारक पाठविल्याविषयीं सांगितलें आहे.

बैराट येथील आदेशांत बुद्ध, धर्म, आणि संघ या त्रिरत्नाचे ठायींची आपली श्रद्धा अशोक राजानें प्रदर्शित केली आहे.

याशिवाय राणीचा आदेश म्हणून एक आदेश सांपडला आहे. हा अशोकाची दुसरी राणी जी त्याच्या सारखीच अत्यंत श्रद्धावान् होती तिचा म्हणून प्रसिद्ध आहे.

( ३ ) शहाबाद जिल्ह्यांत सहसराम येथें—मजकूर सदरप्रमाणें
( ४ ) म्हैसूर संस्थानांत सिद्धपूर येथें—सदर
( ५ ) सदर . ... सदर

याशिवाय भाबरा आदेश' म्हणून जो महत्त्वाचा आदेश आहे, तो जयपूर संस्थानात बैराट येथें आहे हा अशोक राजानें आपल्या कारकीर्दीचे अखेरीस भिक्षु व भिक्षुणी यांना उद्देशून लिहिला आहे यात भगवान् बुद्धानें केलेले सगळेच उपदेश चांगले आहेत, पण त्यांतल्या त्यांत आपण त्यांतली सात वचनें निवडून काढली आहेत, त्यांचें तरी नीट मनन करा अशी आग्रह पूर्वक विनंति केली आहे ( हीं सात वचनें, म्हणजे विनयप्रशंसा, आर्यांची अलौकिक शक्ति, भविष्यविषयांची भीति, तपस्व्याचें गीत, तपस्व्याच्या जीवनाविषयींचा संवाद, उपतिष्याचे प्रश्न, आणि राहुलाला केलेला उपदेश हीं होत याचबद्दलें थोडेसें विवेचन या प्रकरणात पुढें केलें आहे तें पहावें )

## खडकावरील चौदा आदेश.

( १ ) युसफझई प्रदेशात शहाबाजगढी येथें
( २ ) हजारा जिल्ह्यात मनसाहरा येथें
( ३ ) देहराडून जिल्ह्यांत कालसा येथें.
( ४ ) ठाणे जिल्ह्यात सापारा येथ
( ५ ) जुनागढ संस्थानात गिरनार येथें
( ६ ) पुरी जिल्ह्यांत धौली येथें
( ७ ) गंजम जिल्ह्यात जौगड येथें [ कलिंगाचा आदेशही धौली व जौगड येथें आहे ]

सातवा स्तंभावरील आदेश दिल्लीसच फक्त आहे. बाकीचे आदेश पुढील सहा ठिकाणीं आहेत —

( १ ) तोपराहून काढून दिल्लीस नेला
( २ ) मिरतहून काढून दिल्लीस नेला.
( ३ ) कौशांबीच्या कोपांतून काढून अलाहाबादेस नेला.

किल्येकांची समजूत आहे, तिला हरताळ लावण्यासारखें हें अशोकाचें उदाहरण आहे हिंदुस्थानांत धर्मराज्य स्थापन करण्याचा अशोकाचा यत्न होता त्याच्या पूर्ववयात त्याला कलिंगाशीं युद्ध करावें लागलें व त्यांत मनुष्याचा फार मोठा संहार झाला ही गोष्ट खरी, पण ती त्यानें बौद्धधर्माची दीक्षा घेण्याच्या पूर्वीची त्याचें मन पारमार्थिक गोष्टाकडे वळल्यापासून सुमारें तीस वर्षांच्या अवधींत लढाया, मारामाऱ्या, दगेधोप, वगैरे गोष्टाचें नावसुद्धा निघालें नाहीं शिवाय लोकाना धर्माचरणी बनविण्याचा अशा त ऱ्हेचा प्रयत्न अशोकापूर्वी कोणीं केला नव्हता, आणि मागाहूनहीं कोणी केला नाहीं यावरूनही अशोकाचें अद्वितीय बुद्धिमत्त्व, लोकहिताविषयींचा अप्रतिम कळकळ आणि कल्पकता हे गुण दिसून येतात प्रत्येक माणसानें स्वत उद्योग करून आपली उन्नति करून घ्यावी या तत्त्वावर त्याचा दृढ श्रद्धा होता त्याच्या आदेशात किल्येक जागा परलोकासबधाच उल्लेख आहेत त्या काळच्या बौद्धग्रथातल्या मताशीं हें मत ताडून पाहिलें तर विरुद्ध दिसतें कदाचित् ब्राह्मण–धर्माचा पगडा त्याच्यावरचा साफ उडाला नव्हता अशा काळच ते लख असतील त्याचप्रमाणें त्याच्या आदशात कोठेंहा 'निर्वाण' किंवा 'कर्म' याबेसबधान उल्लेख नाहींत हाहा आश्चर्य करण्यासारखी गोष्ट दिसते पण या वरून बौद्धधर्मावरचा त्याचा श्रद्धा डळमळीत होती किंवा निर्वाण आणि कर्म ह्या दोन्हा गोष्टा बौद्धधर्मात मागाहून घुसडल्या गेल्या असें म्हणता यणार नाहीं कारण, या दोन्ही विषयासबधानें प्रत्यक्ष बुद्धाचे उपदेश उपलब्ध आहेत शिवाय प्रत्यक्ष 'निर्वाण' आणि 'कर्म' हे शब्द जरी आले नाहींत, तरी त्याच्या कल्पना ज्यात गर्भित आहेत अशीं वाक्यें अशोकाच्या लेखात बरींच आढळतात भाब्रा येथालु आदेशांत तर 'बुद्धाचीं सगळींच वचनें सुदर आहेत, त्यातून चागलें किती म्हणून निवडावें?' अशा अर्थाचें एक वाक्य असून त्यांत विशेषत निवडून काढलेल्या सात वचनांपैकीं पाच निकायातलीं आहेत

अलीकडे काशीजवळ सारनाथ येथें जो शिलास्तभ सांपडला आहे, त्यावरील लेखावरून असें सिद्ध होतें कीं त्या वेळची धर्मसस्था फारच

सुव्यवस्थित असून राजा स्वतः त्या संस्थेचा अध्यक्ष (Head of the Church and Defender of the Faith) होता.

नुसता परोपकाराविषयींचा उपदेश करून अशोक स्वस्थ बसला नाह तर प्रत्यक्ष परोपकाराचीं कृत्येंही त्यानें बरींच करून ठेविलीं. जरी तो बौ धर्मी होता, तरी ब्राह्मणांना बौद्धभिक्षूंच्या बरोबरीनें सन्मान व दक्षिणा देत असे वाटसरूंचे हाल कमी करण्यासाठीं त्यानें रस्तोरस्तीं छायेचे वृ लाविले होते, अर्ध्या अर्ध्या कोसाच्या अंतरावर विहिरी खणिल्या होत्य धर्मशाळा बांधल्या होत्या, आणि हल्लीं जसे सडकेनें मैलाचे दगड रोवले असतात, तसे आपण किती मजल मारली व किती मारावयाची राहि आहे हें वाटसरूंना कळावें म्हणून ठराविक अंतरावर दगड रोवण्याचीही त योजना केली होती. ही माणसांची व्यवस्था झाली माणसाकरितां माणसान व्यवस्था केली यांत विशेष नाहीं पण मुक्या जनावरांचीही काळजी माणसा इतकीच घेण्यांत यावी अशी योजना अशोकानें करून ठेविली होती माणसाप्रमाणें त्यांच्या साठींही दवाखाने स्थापिले होते व पाणपोया घातल्य होत्या इतकेंच नाहीं तर औषधिवनस्पतींच्या बागा मुद्दाम लाविलेल्य होत्या अशोकानें गुरासाठीं दवाखाने घालण्याचा जो प्रघात घालून दिल तो अठराव्या शतकापर्यंत हिंदुस्थानात चालू होता. अशा प्रकारचे दवाखा गुजराथेंत सुरत येथें इ. स. १७८० च्या सुमारास होते असें मि हॅमिल्टन यांनीं आपल्या हिंदुस्थानवर्णनांत लिहिलें आहे. या दवाखान्यात घोडे गाई, म्हशी, खेचरें, बैल, मेंढ्या, माकडें, कोंबड्या, उंदीर, ढेंकूण वगैरे स तऱ्हेचे प्राणी ठेवण्याची व त्यांच्या खाण्यापिण्याची आणि औषधपाण्याचं सोय केलेली होती.

एका माणसाचे चरित्रावरून एकंदर देशाची तत्कालीन सामाजि किंवा धार्मिक स्थिति ठरवू पाहणें हा शास्त्रीय मार्ग नाहीं ही गोष्ट कबूर आहे. पण अशोकाच्या कोरीव लेखांवरून आणि त्याच्या स्वत च्या मनाव बसलेल्या बौद्धधर्मांच्या उपदेशाचा परिणाम जेवढा कृतीच्या रूपानें व्यक्त झाल

तेवढयावरून तत्कालीन स्थिति पुष्कळ चांगल्याप्रकारें समजते हें कबूल केलें पाहिजे अशोक हा गृहस्थाश्रमी व तशांत सर्व तऱ्हेच्या लोकांशीं व्यवहार ठेवणारा, राजकारणी पुरुष होता असें असता त्याच्या मनावर जो नीतीचा ठसा बौद्धधर्मानें उमटविला होता, व जो बौद्ध भिक्षु व ब्राह्मण यांच्याशीं समान-पूज्यभावाची त्याचा वर्तणूक, मुक्या प्राण्याविषयींची दया वगैरे रूपानें त्याच्या कृतीत पदोपदीं व्यक्त झालेला दिसला, तो एकट्या व्यक्तीपुरता नसून एकदर समाजावर झालेल्या परिणामाचा एक उत्कृष्ट मासला होता असें म्हणणे जास्त सयुक्तिक होईल मनुष्याला गृहस्थाश्रमांत आपल्या रोजच्या व्यवहारापलाकडे अनेक प्रकारें आपलें श्रेष्ठ नीतिबळ दाखविता येतें व समाजाविषयींचें कर्तव्य करता येतें हें खुद्द अशोकाच्या व तत्कालीन धर्मप्रचारकांच्या चरित्रांवरून स्पष्ट दिसून येतें

अशोकाच्या एका शिलालेखांत त्यानें कनकमुनीच्या स्तूपाचा विस्तार केल्याचा उल्लेख आहे. कनकमुनि हा गौतमबुद्धाच्या अगोदर झालेल्या बुद्धांपैकीं एक होता, असा भाविक बौद्ध लोकांचा समजूत आहे ही समजूत येट गोतम बुद्धाच्या काळापासून होती ही समजूत वेडेपणाची आहे असें ज म्हणणारे आहेत, त्यांना हा वेडेपणा बौद्धधर्मांत इतक्या प्राचानकाळीं शिरलेला पाहून नवल वाटणें साहजिक आहे पण अगोदर ही समजूत त्यांना वडपणासारखी कां वाटावी तेंच कळत नाहीं. जेव्हां जेव्हां धर्माला ग्लानि येते, तेव्हा तेव्हा ईश्वरी कृपेनें एखादा अलौकिक पुरुष निर्माण होऊन तो लोकांच्या धर्मश्रद्धेला जागृत करून त्याना धर्मपरायण करून सोडतो, ही समजूत ब्राह्मण-धर्मांतही होती, व ख्रिस्ती धर्मांतही आहे बरें, गौतमबुद्धाच्या पूर्वी मनुष्यस्वभाव नव्हता, धर्म नव्हता, किंवा असला तरी त्याला कधा ग्लानि आली नव्हती किंवा येणें शक्य नव्हतें असें जोंपर्यंत ऐतिहासिक पुराव्यानें सिद्ध करून देण्याची खटपट कोणीं केली नाहीं, तोंपर्यंत गोतमबुद्ध होण्यापूर्वी धर्मग्लानि दूर करणारे अनेक होऊन गेले होते असें मानणारे वेडे कसे ठरतात तें कळत नाहीं

स्तूप बांधण्याची रीत अशोकानें घातली, आणि पहिले स्तूप गोतम-बुद्धाच्या अस्थींवर उभारले गेले, असें म्हणणारे कित्येक पाश्चात्य लेखक

आहेत त्याच्या विधानाला मात्र कनकमुनीच्या स्तूपासबंधाच्या उल्लेखानें पुष्टता येते, आणि अशोकाच्या पूर्वीपासून स्तूप अस्तित्वात होते, आणि गोतमाच्या अगोदर झालेल्या बुद्धाच्या देहावशेषावर ते उभारले गेले होते, या दोन गोष्टी वरील उल्लेखावरुन प्रत्ययाला येतात

गेल्या पन्नास वर्षांत अशोकाच्या अनेक शिलालेखांचा व खोदीव लेखांचा शोध लागला आहे त्यावरून बौद्धधर्मासंबधानें आणि अशोकाच्या राज्यविस्तारासंबंधानें बराच माहिती मिळत दिल्ली आणि अलाहाबाद येथील स्तंभ, पेशावराजवळ कपूर्दगिरि येथील खडकावर खोदलेले लेख, गुजराथेंत गिरनार पर्वतावराल, ओरसा प्रांतांत धौला येथील, दिल्लीच्या जवळपास भावरा येथील, आणि नेपाळांत बुद्धाचें जन्मस्थान जे पूर्वीचें लुंबिनं शहर तेथील लेख हे या दृष्टीनें फार महत्वाचे आहेत बौद्धधर्म अशोकाच्या वेळेपर्यंत बराच शुद्ध होता, देवदेवता यांचा शिवाय त्या धर्मांत झालेला नव्हता, सस्कार, मंत्र, तंत्र वगैरेंचें खूळ त्या धर्मांत शिरल नव्हतें, आणि बुद्धानें उपदेशिलेली सहिष्णुता व पवित्रता अद्याप त्याच्या धर्मात स्पष्टपणें दिसत होता, असें सदर लेखांवरून दिसतें वडिलांची आज्ञा पाळणें, भूतदया, ब्राह्मणाविषयीं आणि श्रमणांविषयीं पूज्यभाव, राग, लोभ, निर्दयता इ० मनोवृत्तींवर जय मिळवून संपादलेलें मानसिक औदार्य, परोपकार, आणि सहिष्णुता धारण करणें यांतच धर्माचें रहस्य आहे हा गोष्ट या लेखांच्या द्वारें सगळ्या लोकांच्या मनांत ठसविण्याचा अशोकाचा उद्देश होता भावरा येथील लेखांत बौद्धधर्मविषयक वाङ्मयांतील काहीं निवडक भाग प्रमाण म्हणून मानून चालल्यानें धर्माला शाश्वती येईल असें म्हटलें आहे सदर भाग म्हणजे १ विनय समुकस्स (पातिमोक्ख), २ आरियवसानि (यांत अर्हंतांच्या अगच्या शक्तींचें वर्णन आहे), ३ अनागत भयानि (यांत धर्माच्या क्षयास होणारीं कारणें सांगितली आहेत ), ४ मुनिगाथा (सुत्तनिपातांत हें प्रकरण आहे), ५ मोनेय सुत्त (यांत मुनीचें वर्तन कसें असावें तें सांगितलें आहे हें प्रकरण इतिवुत्तांत आहे ) ६ उपतिस्स पसिन (उपति-

त्याचे प्रश्न ) आणि ७ राहुल ओवाद अथवा राहुलाला केलेला उपदेश ( हा मज्झिम–निकायांत आहे ) हे होत धर्माची पवित्रता राखण्यासाठीं, जित लोकांना न्यायानें व धर्मानें वागविण्यांत येतें कीं नाहीं हें पाहण्यासाठीं, एकंदर लोकांच्या धार्मिक वर्तनावर देखरेख करण्यासाठीं व शिक्षणाचा प्रसार करण्यासाठीं अशोकानें धर्ममहामात्र नांवाचे बडे कामगार नेमिले होते वगैरे गोष्टींचा उल्लेख अशोकाच्या आदेशांतून आहेत

अशोक हा त्याकाळच्या बहुतेक प्राच्य राजांप्रमाणें बहुपत्नीक होता बहुपत्नीकत्वाची चाल वैदिक काळापासून आतापर्यंत आमच्या इकडे मोठीशी सदोष मानलेली नाहीं अशोकाची पहिली पत्नी असंधिमित्रा ही मेल्यावर त्यानें तिष्यरक्षिता ही दुसरी राणी केली पण ही दुर्वर्तनी निघाली व तिनें अशोकाचा पुत्र कुनाल याच्यावर पापदृष्टि ठेवून ता तिच्या मर्जीप्रमाणें वागला नाहीं म्हणून त्याचे डोळे काढण्याबद्दलचा हुकूम तिनें राजाकडून कपटानें मिळ विला अशी एक अत्यंत हृदयद्रावक कथा आहे ही निवळ दंतकथा आहे, इतिहास नाहीं, असें पाश्चात्य लेखक ठासून सांगतात मीही तो इतिहास सम- जून चालत नाहीं पण प्राच्य काय किंवा पाश्चात्य काय राजवाड्यांत अशा प्रका रचीं कारस्थानें व प्रकार पुष्कळ वेळां घडतात याविषयाचा साक्ष देण्यास हिंदुस्थाना प्रमाणें इंग्लंडचा इतिहासही तयार आहे तथापि प्रत्यक्ष पुराव्याच्या अभावीं अशा दंतकथांवर विश्वास न ठेवणें बरें हें मलाही युक्त दिसतें

याशिवाय चारुवाका नांवाची त्याची एक राणी होती ती अत्यंत भाविक व मायाळु असे तिनें पुष्कळ धर्मकृत्यें केलीं तिच्या नांवाचा एक आदेशही आहे तो ' राणीचा आदेश ' या मोघम नांवानेंच प्रसिद्ध आहे. हिचा मुलगा तीवर याच्यासंबधानें पुढें काहीं ऐकू येत नाहीं यावरून तो आपल्या बापाच्या हयातीतच मरण पावला असावा असें दिसतें

---

१ कोणी म्हणतात कीं तिष्यरक्षिता ही अशोकाची धर्मपत्नी नसून उप पत्नी होती ही गोष्ट खरी असल्यास कुनालाचे डोळे काढविण्याचे संबंधांत जी दंतकथा आहे ती खरी असण्याचा अधिक संभव आहे

अशोकाचा तिसरा मुलगा जलौक म्हणून होता. कित्येकाच्या मतें जलौ-
कही ऐतिहासिक व्यक्ति नसून कुनालाप्रमाणेंच कविकल्पना आहे. दंतकथा अशी
आहे की, हा मोठा पाणीदार असून काश्मीरात राज्य करीत होता व यानें परकीय
लोकांना सरहद्दीच्या बाहेर अटकून घरलें होतें, आणि आपल्या राज्याचा
विस्तार कनोजपर्यंत केला होता. पण हा बौद्धधर्माला विरोध करणारा होता.

अशोकाच्या मुलांपैकीं कोणाचाच कोरीव लेखात उल्लेख नाही पण
नातु दशरथ याचा मात्र नागार्जुनी डोंगरावरील लेणांत उल्लेख सापडतो.
इतकेंच नाही, तर त्याच्या लेखाची भाषा, लिपि व काळ हीं सर्व अशोकाच्या
काळाच्या जवळ जवळचीं आहेत. यावरून अशोकाच्या मागून हाच इ. स. पूर्वी
२३१ व्या वर्षी गादीवर बसला असावा असा तर्क करतात.

अशोकाच्या मागें मौर्यवंश फार वर्षे टिकला नाहीं. त्याच्यामागें
त्याला लवकरच उतरती कळा लागली व मगधाच्या गादीवर कोणी कर्तृत्व-
वान् पुरुष नसल्यामुळें लवकरच मौर्यवंश नष्टप्रम झाला। मगधाचें राज्य
अतिशय संकोच पावलें, आणि अशोक जो चक्रवर्ति राजा म्हणून साऱ्या
भरतखंडात गाजला होता त्याच्या नातूपणतूंची गणना क्षुद्र मांडलिकात व्हावयास
लागली. या मौर्यवंशातले कोणी पुरुष पुढे कोंकणात येऊन राहिले व तेथें त्याचा
जो विस्तार झाला तोच 'मोरे' आडनावाचा वंश होय असें कित्येक म्हणतात

अशोकाच्या मृत्यूपासून तों कनिष्क राजाच्या काळापर्यंत मध्यतरी जीं
तीन शतकें गेली, त्या अवधींत बौद्धधर्म उत्तरेकडच्या देशांत सारखा पसरत
गेला. मध्यंतरीच्या शुंगवंशीय राजाकडून जरी त्याला उत्तेजन मिळालें नाहीं,
तरी त्याचा प्रसार कमीही झाला नाहीं.

मौर्यवंशाला पदभ्रष्ट करणारा पुष्यमित्र राजा यानें बौद्धाचा कितीसा
छळ केला तें कळत नाही, पण कांही केला असावा असें दिसतें. बौद्धधर्माचा
इतिहास लिहिणारा तिबेटी लेखक तारानाथ लिहितो कीं मध्यदेशापासून
जालंधरपर्यंत जेवढे बौद्धविहार व मठ होते ते सर्व त्या राजानें जाळून टाकले,
आणि कित्येक भिक्षूंना ठार मारलें. दुसरी एक दंतकथा आहे ती हिच्याहूनही

झुनी आणि उघारत हास्यास्पद आहे. ती अशी कीं या राजानें बौद्धधर्माचा उच्छेद करण्यासाठीं पाटलीपुत्र येथील कुक्कुटाराम नांवाच्या विहाराचा नाश करून शाकल देशांतल्या सर्व बौद्धांना मारून टाकलें. चिनी प्रवासी हु-एन-संग हा कुक्कुटाराम पाहण्यास गेला होता, व तेथे त्या विहाराचे अवशेष त्यानें पाहिले. पण त्याचा मुद्दाम कोणीं नाश केला असें त्यानें कोठेंही म्हटलें नाहीं. तिसरी एक दंतकथा आहे कीं नागार्जुन व असंग यांच्या कालाचे दरम्यान म्हणजे इ० स० १५० पासून इ० स० ५५० पर्यंत तीनदां बुद्धांचा छळ झाला होता. परंतु या दंतकथांपैकीं एकीलाही कागदपत्राचा किंवा कोरीव लेखाचा वगैरे आधार नाहीं.

इ० स० च्या दुसऱ्या शतकात हिंदुस्थानांत बौद्धधर्माची स्थिति कशीही असो, पण हिंदुस्थानाबाहेर त्याकिट्आ देशांत, आणि हिंदुस्थानच्या वायव्येकडील प्रांतात तो धर्म उत्कर्षावस्थेंत होता. या ठिकाणच्या ग्रीक राज्यांत मिनांदर ऊर्फ मिलिंद हा प्रमुख असून नागसेन नांवाच्या बौद्धभिक्षूशीं तत्त्वज्ञानाच्या विषयांत झालेलीं त्याचीं संभाषणें मिलिंदपन्हा या नांवाच्या ग्रंथांत ग्रथित केलीं आहेत. त्यांपैकीं एक संवाद मागें ११ व्या प्रकरणांत दिला आहे. या मिलिंद राजाची बौद्धधर्माकडे अगोदरच प्रवृत्ति होती. ती नागसेनाबरोबर केलेल्या संवादामुळें परिणत होऊन शेवटीं मिलिंदानें बौद्धधर्म स्वीकारला असें सांगतात. नागसेन हा बुद्धाच्या सोळा प्रमुख शिष्यांपैकीं एक होता असें कित्येक म्हणतात आणि कित्येक म्हणतात कीं बौद्धांत जे पुढें वाद उत्पन्न झाले ते होण्याला हा नागसेन एक प्रमुख कारण होता.

इ स च्या दुसऱ्या शतकांत हिंदुस्थानांत ग्रीक लोकांनीं हळुहळु आपली सत्ता बरीच फैलावली होती, व आणखीही त्यांनी फैलावली असती. परंतु इतक्यांत त्यांना एक शत्रु निर्माण झाला. उत्तर व वायव्य या दिशांतून मंगोलियन लोकांच्या झुंडी हिंदुस्थानच्या मैदानांत येऊन उतरल्या. या सर्वांनीं शक लोकांना दक्षिणेकडे हुसकावून लाविलें. ते येतां येतां विंध्याद्रिपर्वतापर्यंत येऊन पोंचले होते. याप्रमाणें उत्तर हिंदुस्थानांत निरनिराळ्या परदेशी लोकांच्या टोळ्या आपली सत्ता स्थापित करण्याकरितां स्पर्धा करीत होत्या. शेवटीं युएचि

जातीच्या लोकांचें वर्चस्व होऊन कुशानवंश हिंदुस्थानात प्रस्थापित झाला. या वंशांतला सुप्रसिद्ध राजा कनिष्क याची कारकीर्द बौद्धधर्माच्या प्रसारासंबंधानें विशेष महत्त्वाची समजली गेली आहे या राजाचें चरित्र पुढच्या प्रकरणात देण्यांत येईल

---

# प्रकरण १५ वें.

## राजा कनिष्क.

[ कुशान वंश व कनिष्काचे पूर्वज–त्याचे विजय–चीन देशात बौद्ध धर्माचा प्रवेश–कनिष्क आणि अशोक यांचें साम्य–त्या वेळचें शिल्प–तिसरी धर्मसभा–बौद्धमतात पडलेलें अंतर–स्तूप–मृत्यु–त्याचे वंशज ]

हिंदुस्थानच्या प्राचीन इतिहासात चंद्रगुप्त, अशोक, किंवा विक्रमादित्य या आर्यराजांच्या बरोबरीनें जर एकाद्या अनार्य राजाचें नांव चिरस्मरणीय झालें असेल तर तें राजा कनिष्क याचें होय भाविक हिंदी लोक कनिष्क हा अनार्य म्हणून त्याच्या नांवाची अवज्ञा करीत नाहींत, इतकेंच नाहीं, तर आपल्या हृदयांत त्याला आर्यनृपतींपेक्षाही उच्चस्थान देऊन कृतज्ञतापूर्वक त्याच्या नावाचा उच्चार करतात

कनिष्क हा अनार्यांपैकीं कुशानवंशातला होता हा कुशानवंश युइचि नावाच्या तार्तरी लोकांपैकीं असून या वंशातला एक राजा पहिला क्याडफिसेस यानें प्रथम हिंदुकुश पर्वत ओलांडून हिंदुस्थानात पाऊल घातलें. त्यापूर्वी हे लोक चिनी तार्तरी, ब्याक्ट्रिया व काबूल या देशात राहून व गुरें वगैरे चारून उदरनिर्वाह करीत असत पहिला क्याडफिसेस याचा राज्यारोहणकाल निश्चित झालेला नाहीं कोणी तो इ० स० ४८ हा घेतात व कोणी इ० स० ७८ धरतात पण कोणताही घेतला तरी दोन मतांत तीस

वर्षांपेक्षा ज्यास्त अंतर नसल्यामुळें पुढील एकंदर इतिहास त्यापासून विशेषसा बाध येत नाहीं.

ही परकीय लोकांची घाट हिंदुस्थानावर येण्याला कारण काय झालें तें अद्यापि नक्की कळलें नाहीं. कित्येक ग्रंथकार असें लिहितात कीं या लोकांची राहणी उघड्या इवेंत व निष्काळजीपणाची असल्यामुळें त्यांच्यांत प्रजावृद्धि फार झपाट्यानें झाली, व इतक्या लोकाच पोट काबुलसारख्या लहानशा व डोंगराळ मुलुखांत भरेना, यामुळें हिंदुस्थानच्या सुपीक जमिनीकडे त्यांची दृष्टि साहजिकच वळली दुसरे कित्येक असें लिहितात कीं, त्यांचे जुने शत्रु शक नावाचे लोक होते. त्यांनीं काबुलप्रांत हस्तगत करून यांना तेथून पिटाळून लावलें, तेव्हां हे हिंदुकुश पर्वत ओलांडून हिंदुस्थानांत आले या दुसऱ्या मताच्या सत्यतेबद्दल संशय घेण्याला पुष्कळ जागा आहे. कारण कीं चंग-कीं-एन या चिनी प्रवाशाच्या प्रवासवृत्तावरून असें दिसतें कीं, खि. श. पूर्वी १६५ च्या सुमारास युहेचि लोकांची वस्ती चिनी तार्तरींत होती, व हि-अंग--नु नांवाच्या चिनी राजानें त्यांच्या नायकाला मारून त्यांना हद्दपार केलें, तेव्हां ते पश्चिमेकडे गेले व तेथें से म्हणजे शक लोकांचा देश होता तो घेऊन त्यांनीं शकांना दक्षिणेकडे पिटाळून लाविलें तेथून युहेचि लोकांची उचलबांगडी लवकरच झाली, आणि ते ऑक्सस नदीच्या उत्तर तीरावर येऊन राहिले, व तेथें त्यांनीं आपली राजधानी स्थापिली (Journal R. A. S, 1903). पहिला कयाडफिसेस यानें किपिन (काश्मिर) प्रांत काबीज केल्यावर युहेचि लोकांचीं आणखी चार संस्थानें होतीं तीं जिंकून सर्वांचें मिळून एक मोठें प्रबळ राज्य केलें हें राज्य सिंधुनदीपासून इराणपर्यंत पसरलें होतें, अशाविषयीं दाखले सांपडतात हा राजा ८० वर्षांचा होऊन मेला. त्यावेळीं सिंधुनदाचे तीराजवळील प्रदेश इंडो-पार्थियन लोकांच्या सत्तेखालीं होता. या लोकांना तेथून हाकून देण्याचें काम पहिल्या कयाडफिसेसचा मुलगा दुसरा कयाडफिसेस यानें केलें. हा दुसरा कयाडफिसेस इ० स० ८५ सालीं बापाच्या गादीवर बसला. हा राजा मोठा महत्त्वाकांक्षी व पराक्रमी होता. चीनच्या बादशहाशीं सामना करून त्याची मुलगी आप-

णास वायको करावयाची ही त्याची महत्त्वाकांक्षा होती. पण ती सफळ झाली नाही, त्यानें सेनापति से याच्या हाताखाली पाठविलेलें ७०००० सैन्य पराभूत होऊन परत आलें, व तेव्हांपासून चीनच्या राजाला दरसाल खंडणी देण्याचें क्याडफिसेसला भाग पडलें ही एकीकडे झालेली नामोशी भरून काढण्यासाठीं क्याडफिसेस यानें हिंदुस्थानचा एकेक प्रांत जिंकून आपली सत्ता हळु हळु वाढविली. याच्या मृत्यूचा काळ नक्की सांपडत नाहीं. तथापि त्यानें संपादिलेले विजय आणि त्याच्या वेळच्या पुष्कळ नाण्यावरचे सन यावरून त्याची कारकीर्द बरीच मोठी म्हणजे इ० स० ८५ पासून इ० स० १२० किंवा १२५ पर्यंत असावी असें दिसतें. यानें जिंकलेले प्रांताची व्यवस्था लष्करी अंमलदाराकडे सोंपविली होती व या वेळचीं जीं नाणीं सांपडतात तीं या अंमलदारानीं त्याच्या नांवानें पाडलेलीं असावीं असें दिसतें या राजाचा अंमल पश्चिमेस बोखरा व रशियन तुर्कस्थानपर्यंत आणि पूर्वेस काशीपर्यंत होता. याच राजानें आपला वकील रोमचा बादशाहा ट्रेजन याच्या दरबारा पाठविला होता

दुसऱ्या क्याडफिसेसच्या मागून कनिष्क हा राजा झाला. याचा प्रतापरवि त्याच्या पूर्वजाहूनही अधिक तेजस्वी व प्रखर होता. या राजाचें नांव यूरोपच्या इतिहासाला जरी ठाऊक नाहीं, तरी अर्ध्या आशियाखंडांत तें गाजलें होतें चीन, तिबेट, मंगोलिया व हिंदुस्थान इतक्या देशाना तर तें चांगलेंच ठाऊक होतें हिंदुस्थानात व त्याच्या बाहेरही त्याचें राज्य पसरलें होतें काबूल व यार्कंदपासून तों आग्रा व गुजराथपर्यंत त्याच्या नांवाची द्वाही फिरली होती. अशोकानंतरच्या काळांत एवढा मोठा राज्यविस्तार दुसऱ्या कोणत्याही राजानें केला नव्हता एवढ्या प्रतापशाली राजाबद्दल जेवढी विश्वसनीय माहिती मिळायाला पाहिजे तेवढी मिळत नाहीं, ही जितकी आश्चर्याची तितकीच दुर्दैवाचा

१. या राजाचें राज्य दक्षिणेस विंध्य पर्वतापर्यंत, पश्चिमेस सिंधप्रांतापर्यंत कडे, उत्तरेस हिमालयापर्यंत व पूर्वेस गाजीपूर व वाराणशी या शहरापर्यंत पसरले होतें असें जागजागीं सांपडलेल्या त्याच्या नाण्यांवरून दिसतें

गोष्ट आहे. या राजाचें नांव व त्याच्या अगोदर आणि नंतर झालेल्या कित्येक राजांचीं नांवें हीं अनेक प्राचीन लेखांतून आढळतात. त्यांपैकीं कित्येकांवर सनही दिलेले आहेत, पण ते अशा रीतानें दिलेले आहेत कीं, त्यांच्या अर्थासंबंधानें पंडितांमध्यें वाद उत्पन्न होऊन अखेर निर्णय कांहींच होऊं शकत नाहीं. यामुळें डॉ० फ्लीटसारख कित्येक पंडित कनिष्काला फार मागें म्हणजे ख्रि० श० पूर्वी ५७ व्या किंवा ५८ व्या वर्षी नेऊन ठेवतात, तर डॉ० भांडारकरांसारख दुसरे कित्येक शोधक पंडित अगदीं अलीकडच्या काळांत म्हणजे ख्रि० श० नंतर २७८ व्या वर्षात त्याला आणून सोडतात! जेथें पंडितांच्या मतांमध्यें इतकें जबरदस्त—म्हणजे तीन सव्वातीनशें वर्षांचें अंतर—पडलें आहे, तेथें माझ्यासारख्या अल्पज्ञानें आपलें मत देण्यास धजूं नये. तथापि दोन टोकांच्या मधल्या बिंदूत पुष्कळ वेळां सत्याचें वास्तव्य आढळतें, तसा प्रकार या वादग्रस्त प्रश्नाचा दिसतो. इ० स० १२० किंवा १२५ हा काळ स्थूल मानानें खरा धरण्यास हरकत नाहीं. प्रसिद्ध संशोधक व इतिहासलेखक मि० व्हिन्सेंट ए० स्मिथ यानीं हाच काळ धरला आहे * ( Vide Early History of India, 1st edition, P 225 )

पहिला कयाडफिसस ८० वर्षांचा होऊन मरण पावल्यावर त्याचा मुलगा दुसरा कयाडफिसस या नांवानें त्याच्या गादीवर बसला, याविषयीं वाद नाहीं. पण दुसऱ्या कयाडफिससच्या मागून लागलीच कनिष्क हा त्याच्या गादीवर बसला कीं मध्यंतरीं कांहीं काळ गेला, आणि कनिष्काचा व दुसऱ्या कयाड

* कनिष्काच्या कालासंबंधानें प्राचीन इतिहासाच्या संशोधकांचीं दहा भिन्न भिन्न मतें आहेत. सर अलेक्झांडर कनिंगहाम यानीं त्याला विक्रम संवताच्या आरंभीं घातलें होतें पण मागाहून मत फिरवून इ० स० ७८ या वर्षी घातलें. मा० लव्हा खि० श० पू० ५ व्या वर्षी, मा० वायर इ० स० १० व्या वर्षा; डा० भांडारकर इ० स० २७८, रा० देवदत्तपंत भांडारकर सदर प्रमाणेंच, मि० फर्ग्युसन इ० स० ७८, मि० ओल्डनबर्ग त्याच सुमारास, व मि० रमेशचंद्र दत्त इ० स० च्या पहिल्या शतकांत कनिष्कराजा होऊन गेला असें म्हणतात.

फिसेसचा संबंध काय होता या दोन गोष्टींबद्दल अद्याप समाधानकारक माहिती मिळाली नाही.

कनिष्काच्या पूर्वीच्या राजांनी काश्मीरप्रांत घेण्याचा एकदोनदां यत्न केला होता, व कांहीं भाग घेतलाहीं होता. पण तो संपूर्ण प्रांत हस्तगत करण्याचें श्रेय कनिष्कानेंच संपादलें. हा प्रांत जिंकल्यानंतर तो तेथें वारंवार राहूं लागला काश्मीरप्रांत म्हणजे भूलोकचें नंदनवनच आहे असें जे म्हणतात त्याची सत्यता दाखविणारें सृष्टि-देवतेचें अपूर्व वैभव तेथें दृष्टीस पडतें. कनिष्काचें मन या प्रांतांत रमत असे यावरून त्याचे ठायीं रसिकताही विशेष असावी असें अनुमान करतां येतें. काश्मीर प्रांतांत कनिष्कानें अनेक स्तंभ उभारले व एक शहरही वसविलें होतें, याविषयींचा उल्लेख राजतरंगिणी ग्रंथांत आहे. या शहराला त्यानें स्वतःचें नांव दिलें होतें. श्रीनगरपासून कांहीं अंतरावर कानिसपोर नांवानें जें एक लहानसें गांव आहे तेंच पूर्वीचें कनिष्कपुर असावें.

कनिष्कानें मगधप्रांतावर स्वारी करून त्या देशाची राजधानी पाटलीपुत्र नगरी हस्तगत केली असें म्हणतात की त्यावेळीं त्या नगरींत अश्वघोष नांवाचा एक प्रसिद्ध विद्वान् पंडित राहत होता. या अश्वघोषाचा बुद्धचरित्र नामक संस्कृत ग्रंथ प्रख्यात आहे या पंडिताला आपल्याबरोबर न्यावें असें मनांत आणून कनिष्क राजानें मोठ्या बहुमानानें त्याला बोलाविलें पण वृद्धापकाळ व तदनुषंगिक व्याधि यामुळें त्याच्यानें जाववेना. म्हणून त्यानें आपला शिष्य ज्ञानयश याला पाठविलें. कित्येक म्हणतात कीं अश्वघोष स्वतःच गेला होता.

हिंदुस्थानच्या बाहेरही कित्येक देशांना कनिष्कानें आपल्या तरवारीचें पाणी दाखविलें होतें. पार्थियन नांवाच्या अनार्य लोकांचा राजा कॅडफायसिस (कुषाक) यानें स्वपरबलाबलाचा विचार न करतां मूर्खपणानें कनिष्काच्या राज्यावर चाल केली. मग्दी त्याचा नाश करण्यासाठीं कनिष्क राजानें त्याच्याशीं लढाई करून त्याला जर्जर तर केलेंच, पण तेवढ्यानें समाधान न मानतां शेवटपर्यंत पाठलाग करून त्याला हिंदुस्थानाबाहेर घालवून दिलें.

कनिष्काच्या पूर्वजांना चीन, तार्तरी, ग्याक्ट्रिया वगैरे देशांतून घालवून देण्यांत आलें होतें. त्या गोष्टीचा सूड घेऊन आपल्या वंशाचें आधिपत्य त्या देशांत पुन: प्रस्थापित करावें हा त्याचा फार दिवसांचा हेतु होता. कनिष्काच्या अगोदर होऊन गेलेल्या पहिल्या दोन क्याडफिसेस राजांचाही हा हेतु होता, व दुसऱ्या क्याडफिसेस राजानें त्या दिशेनें एकदां (इ० स० ९० मध्यें) प्रयत्नही करून पाहिला होता. पण चीनच्या बादशहाचें सामर्थ्य अमर्याद! त्याच्या पुढें या बिचाऱ्या राजाचें सामर्थ्य कितीसें टिकणार? चीनच्या बादशहानें आपल्या प्रतापाची थोडीशी चुणूक दाखवितांच क्याडफिसेस म्याला आणि त्याला कांहीं खंडणी देण्याचें कबूल करून कसाबसा जीव घेऊन सैन्यासह परत हिंदुस्थानांत आला. हिंदुस्थानच्या बाहेर तिबेट, काश्मीर वगैरे प्रांतांवर स्वारी करण्याचे मार्गांत पहिली मोठी अडचण म्हणजे हिमालय व हिंदुकुश वगैरे पर्वतांमधून सैन्य नेण्याची. ही अडचण येवढी आहे कीं आपल्या वंशाच्या कीर्तीवरील कलंक धुऊन टाकण्याची आणि दोन तीन पिढ्या अजिंक्य होऊन बसलेल्या शत्रूला जीत करण्याची महत्त्वाकांक्षा कनिष्काच्या मनांत प्रज्वलित झाली नसती, तर हें धाडसाचें कृत्य करण्याचें त्याच्या मनांतसुद्धां आलें नसतें. पण जेथें माणसाची विचारशक्ति कुंठित होते तेथें कित्येक वेळां निवळ धाडस उपयोगी पडतें. कनिष्काचें दैव बलवत्तर होतें म्हणून म्हणा, किंवा त्याचें धाडस लोकोत्तर म्हणून म्हणा, पण क्याडफिसेस यानें निराश होऊन जो उद्योग सोडून दिला होता, व कनिष्काच्या मागूनही जें अचाट कृत्य कोणत्याही राजानें केलें नाहीं तें कनिष्कानें केलें. त्यानें ताग़दुंबाश पामीर नांवाच्या खिंडींतून आपलें थोडेंसेंच पण निवडक सैन्य नेऊन चिनी सैन्याचा खरपूस समाचार घेतला इतका कीं, त्यानें चिनी बादशहाला खंडणीच्या रकमेची तर माफी द्यावयाला लाविलेंच, पण शिवाय त्याचे कांहीं सरदार व प्रत्यक्ष एक चिनी राजपुत्र यांना ओलीस देणें भाग पाडलें.

ओलीस आलेल्या चिनी राजपुत्राची व त्याच्या बरोबरच्या सरदारांची बरदास्त कनिष्क राजानें फार उत्तम प्रकारें ठेविली होती. हिंवाळा, उन्हाळा

व पावसाळा या तिन्ही ऋतूंत ज्या ज्या ऋतूंत जें जें स्थळ राहण्यास योग्य त्या त्या स्थळीं त्याच्या दरजाप्रमाणे विहारांतून त्यांच्या राहण्याची सोय करण्यांत येत असे. हिंवाळ्यांत उष्ण हवेच्या ठिकाणीं, अथवा चीनपति येथें आणि उन्हाळ्यांत काबूलच्या पलीकडे कपिश नांवाच्या डोंगरावरील उत्तम थंडगार हवेच्या ठिकाणीं एका विहारांत त्यांना राहण्याला जागा दिली होती. पावसाळ्यांत त्यांचें वास्तव्य कोठें असे तें कोठें सांगितलेलें आढळत नाहीं. चिनी राजपुत्राला विहारांत राहणें विशेष आवडलें असावें असें दिसतें. कारण कीं त्यानें जातांना त्या विहाराला देणगी म्हणून बरीच रत्नें अर्पण केलीं असें सांगतात. राजपुत्रानें दिलेल्या या उदार देणगीबद्दल बौद्धभिक्षूंनीं कृतज्ञ होऊन

१. चीनपति हें नाव चिनी राजपुत्रावरून त्या शहराला पडलेलें दिसतें. मूळच्या नांवाचा पत्ता लागत नाहीं. कदाचित् चिनी राजपुत्राकरितां म्हणूनच हें नवें शहर निर्माण केलें असेल, व दुसरें एखादें नांव देण्याचे ऐवजीं चीनपति हेंच नाव त्याला मुद्दाम दिलें असेल.

२. चीनपति येथील विहाराला चिनी राजकुमारानें किती द्रव्य अर्पण केलें याची कांहीं कल्पना करतां यावी म्हणून हुएनत्संग यानें आपल्या प्रवासवृत्तांत नमूद करून ठेविलेली पुढील गोष्ट येथें सांगितली पाहिजे. राजकुमारानें अर्पण केलेलें द्रव्य व जवाहीर विहाराच्या मुख्य दिवाणखान्याच्या पूर्वेकडील दरवाज्याच्या दक्षिणबाजूला वैश्रवणाच्या मूर्तीच्या पायांखालीं पुरून ठेवलेलें होतें. पुढें एका राजानें तो द्रव्याचा हंडा उकरून काढण्याचा प्रयत्न केला होता, पण त्याला भयंकर दृष्टांत झाल्यामुळें त्यानें तो नाद सोडला. विहाराची डागडुजी करण्याचे वेळीं या द्रव्याचा उपयोग व्हावा अशी दात्याची इच्छा होती. त्या इच्छेनुरूप तेथील भिक्षूंनीं जीर्णोद्धारासाठीं म्हणून तें द्रव्य काढण्याचा यत्न करून पाहिला. पण त्यांनाही तसाच दृष्टांत झाला. तेव्हां त्यांनीं तो नाद सोडला. त्याला बराच काळ लोटल्यावर हुएनत्संग हिंदुस्थानांतून प्रवास करीत असतां त्याचा मुक्काम पावसाळ्यांत त्या ठिकाणीं झाला. बोलतां बोलतां भिक्षूंनीं त्याला चिनी राजपुत्राच्या देणगीची गोष्ट सांगितली, व त्या द्रव्यावर बसलेला सर्प चिनी असेल

सदर राजपुत्राच्या आणि त्याच्या सरदाराच्या तसबिरी विहारांतील भिंतीवर लाविल्या होत्या व प्रार्थना म्हणतांना भिक्षु त्या राजपुत्राच्या नांवाचा उच्चारही करीत असत, असें हुएन-त्संग यानें प्रत्यक्ष पाहिलें असल्याविषयीं त्याच्या प्रवासवर्णनांत उल्लेख आहे सारांश, परक्या देशांतल्या राजपुत्राला आपल्या स्वाधीन झाल्यानंतर बरोबरीच्या नात्यानें वागविण्याचें मानसिक औदार्य प्राचीनकाळापासून भारतीय राजांच्या ठायीं होतें, आणि तें श्री० सवाईमाधवरावांच्या कारकीर्दीपर्यंत, म्हणजे १८व्या शतकाच्या अखेरीपर्यंत वेळोवेळीं इतिहासांत प्रकट होत असे. श्री० सवाईमाधवराव पेशव्यांचे वेळेस खुद्द पेशवे व त्यांचे कारभारी नानाफडणास यांच्या चेष्टा करणाऱ्या मशीरउल्मुल्काला, मराठ्यांच्या स्वाधीन करण्यांत आल्यानंतर, पुण्यास कशा मानमरातबानें वागविण्यांत आलें तें इतिहासज्ञास ठाऊक आहेच

चिनी राजपुत्राचें राजकीय कारणामुळें हिंदुस्थानांत कांहीं दिवस वास्तव्य झाल्यापासून दोन्ही देशांचा फायदा झाला. व्यापाराचे संबधांत चीन देशाशीं हिंदुस्थानचें दळणवळण पूर्वीपासून होतेंच, पण राजकुलीन पुरुषाशीं प्रत्यक्ष संबंध घडल्यापासून तें जास्त वाढलें. शिवाय चिनी लोक बागाईत करण्याचे कामांत कुशल असल्यामुळें चिनी राजपुत्राबरोबर आलेल्या माळ्यांनीं आपली विद्या इकडच्या माळ्यांना शिकविली, आणि नासपाती (pear) व सप्ताळू (peach) हीं फळें त्यांनीं हिंदुस्थानांत आणिलीं

---

व तो घालविण्याचा उपाय हुएनत्संगसारख्या चिनी माणसाला माहित असण्याचा संभव बराच आहे अशी कल्पना करून त्यांनीं त्या कामीं हुएनत्संगची मदत मागितली. हुएननें ती गोष्ट मान्य केली. मृतापुढें ऊद व सुगंधि द्रव्यें जाळलीं, आणि द्रव्याचा उपयोग जीर्णोद्धाराच्या कामाहून अन्य कामाला होणार नाहीं असें पूर्ण आश्वासन देऊन मग ती जागा खणण्यास सुरवात केली तेव्हा खणणारांना कोणत्याही प्रकारें प्रतिबंध झाला नाही. जमिनीपासून सात आठ फुटाच्या अंतरावर एक हंडा लागला. त्यांत सोनें व मोत्यें हीं रगड सापडलीं. जीर्णोद्धाराचें काम झाल्यानंतर राहिलेली शिल्लक पुनः त्या जागीं ठेवण्यांत आली किंवा ती कोणी घशाखालीं उतरविली तें कळत नाहीं.

हिंदुस्थानानेंही या गोष्टींचा चीनला भरपूर मोबदला दिला. वर सांगितलेंच आहे कीं, चिनी राजपुत्राचा राहण्याची सोय एका मोठ्या विहारात केली होती तेथें असता बौद्ध भिक्षूंचा त्या राजपुत्राशीं चांगला परिचय झाला व त्याचेकडून त्याला बौद्धधर्माची माहिती कळली हळू हळू त्या धर्मावर राजपुत्राची श्रद्धा जडत चालली लवकरच त्यानें स्वत बौद्ध धर्माचा स्वीकार केला, इतकेंच नाहीं, तर स्वदेशीं परत जातांना तो आपल्याबरोबर इकडले कांहीं बौद्धभिक्षु चीनला घेऊन गेला व त्यांच्याकरवीं त्यानें आपल्या देशात बौद्धधर्माचा प्रसार करविला

असें सांगतात कीं, पूर्ववयांत कनिष्काचे मनांत धर्माविषयीं किंवा नीतीविषयीं विशेषसा आदरभाव नव्हता या बाबतींत त्याच्या पूर्वी दीडशें वर्षे होऊन गेलेल्या अशोक राजाशीं त्याचें बरेंच साम्य होतें. अशोक पूर्व वयांत दुष्ट, दुराचारी, आणि क्रूर होता, त्याच्या मनांत स्वकीय किंवा परकीय कोणाविषयीच दयामाया नव्हती, अशा अर्थाच्या त्याच्याविषयीं अनेक दंतकथा सिंहली ग्रंथकारांनीं लिहून ठेविल्या आहेत त्या जरी बहुतेक निवळ काल्पनिक आहेत, तरी एवढी गोष्ट खरी कीं, अशोकाच्या धार्मिकपणाचें कांहीं चिन्ह त्याच्या पूर्ववयांत दिसलें नव्हतें कनिष्काविषयीं सुद्धा तेंच म्हणतां येईल. पूर्ववयांत कनिष्कानें कोणतेंच नीतिबंधन मानलें नाहीं, आणि बौद्धधर्माविषयीं कधीं अनुराग दाखविला नाहीं त्याच्या मनांत धर्मकल्पनांचा उत्कर्ष कसा झाला याची साक्ष देण्यास त्याच्या कारकीर्दीतल्या निरनिराळ्या काळच्या नाण्यांशिवाय दुसरें कांहीं साधन नाहीं अशोकाच्या आदेशाइतकें किंवा स्तंभावरील लेखांइतकें जरी या नाण्यांना महत्व देतां यावयाचें नाहीं, तरी त्या नाण्यांवरून कनिष्काच्या धर्ममताचा कांहीं आभास तरी प्राप्त होतो यांत शंका नाहीं कनिष्काच्या कारकीर्दीतल्या पहिल्या पहिल्या नाण्यांवर ग्रीक भाषेत व ग्रीक लिपींत कांहीं अक्षरें व चंद्रसूर्याच्या मूर्ति कोरलेल्या आढळतात त्यानंतरच्या काळातल्या नाण्यांवर ग्रीक लिपि कायम आहे, पण भाषा जुनी फारशी असून मूर्ति कांहीं ग्रीक, कांहीं पार्शियन आणि कांहीं भारतीय अशें एक प्रकारचें मिश्रण आहे. त्याच्याही नंत-

रचा नाणीं घेतलीं तर त्यावर शाक्यमुनि बुद्ध याची मूर्ति कोरली असून त्यावरची अक्षरें ग्रीक आहेत असें आढळून येतें.

वर सांगितलेल्या प्रकारच्या नाण्यांवरून कनिष्क याच्या अगोदरपासून धर्ममताचा उत्कर्ष कसा होत गेला हें चांगलें दिसतें. आलेक्झांडर दि ग्रेट यानें हिंदुस्थानावर स्वारी केल्यापासून ग्रीकलोकांशीं झालेल्या सहवासाचा हिंदुस्थानच्या चालीरीती, भाषा, शास्त्रें, कला वगैरे अनेक गोष्टींवर परिणाम घडला. हा परिणाम अगोदरच्या नाण्यामध्यें प्राकभाषा व प्राकलिपि यांच्या रूपानें अगदीं स्पष्ट दिसून येतो. वैदिक धर्ममताचेंही बरेंच प्राबल्य असे. त्यामुळें चंद्र व सूर्य या देवतांचीं चित्रें त्या काळच्या नाण्यावर कोरलेलीं असणें स्वाभाविक होतें. मौर्यवंश स्थापन झाल्यानंतर कांहीं दिवसांनी पूर्वीचें ग्रीक वर्चस्व हळुहळु कमी झालें, आणि पर्शियन लोकांशीं विशेष संघट्टन घडे. त्यामुळें त्यांच्या भाषेचा व रीतरिवाजांचा पगडा जास्त बसला आणि अखेर कनिष्काचे मनाचा अस्थिरता जाऊन तें शाक्य गोतमबुद्ध याच्या ठिकाणीं जडलें, तेव्हां देवतादिकांच्या मूर्ति जाऊन त्यांचे जागीं बुद्धाची मूर्ति येऊन बसली. अशोकाचीही बुद्धाचे ठायीं निस्सीम श्रद्धा होती. पण त्यानें बुद्धाची मूर्ति बनविल्याचें उदाहरण कोठें आढळण्यांत नाहीं. कारण, त्याकाळीं बौद्धधर्माचें मूळ स्वरूप अविकृत राहिलें होतें. बुद्धाला देवतेचें स्वरूप देण्याची कल्पनाही त्या काळीं कोणाच्या डोक्यांत आली नव्हती. कनिष्काच्या कालांत ब्राह्मणधर्माचा पगडा कित्येक बौद्धांच्या मनावर पूर्णपणें बसल्यामुळें त्यांनीं बुद्धाची देवतांमध्यें गणना करून भक्तगण 'आपला उद्धार करा' अशी हात जोडून प्रार्थना करीत आहे, बुद्ध त्या प्रार्थना कान देऊन ऐकत आहे आणि प्रबळ सेवेसाठीं उभे असलेले बोधिसत्त्व त्या भक्तांच्या वतीनें मध्यस्थी करीत आहेत, अशा तऱ्हेचीं चित्रें काढण्याचा प्रघात सुरू केला.

यावेळीं गांधारशिल्पपद्धति भरतखंडांत विशेष प्रचलित होती असें दिसतें. या वेळच्या बौद्ध मूर्तींची व मोठमोठ्या इमारतींची रचना बारकाईनें पाहणारास तींत गांधारशिल्पाचें वळण स्पष्ट दृष्टोत्पत्तीस येतें. या काळच्या स्तंभाच्या शिरोभागाच्या एक प्रकारच्या विशिष्ट रचनेवरून ग्रीक

व रोमन पद्धतींच्या मिश्रणापासून उत्पन्न झालेल्या गांधारपद्धतीचा आदर त्या काळीं विशेष होत असावा असें दिसतें. कनिष्काच्या मनांत बौद्धधर्माबद्दल गाढ अनुराग उत्पन्न झाल्यानंतर त्यानें तेरा मजली व ६६ हात उंचीचे सुंदर लांकडी घुम्मज उभारले. ते तत्कालीन शिल्पनैपुण्याची उत्तम प्रकारें साक्ष देणारे होते. सातव्या शतकाचे प्रारंभीं ह्यु-एन्‌-त्संग नांवाचा एक चिनी प्रवासी फिरत फिरत हिंदुस्थानांत आला होता. त्यानें लिहून ठेविलें आहे कीं, हे सुंदर कारागिरीचे नमुने तीनतीनदां अग्नीच्या भक्ष्यस्थानीं पडले, आणि तीनदां पुनः हिंदुस्थानच्या लोकांनीं ते नवे निर्माण करून बसविले! फा-हियान हा प्रवासी सिंधु नदीच्या पूर्व किनाऱ्यावरील प्रदेशांत प्रवास करीत असतां कित्येक ठिकाणीं त्यानें लांकडी घुम्मज प्रत्यक्ष पाहिल्याविषयीं लिहिलें आहे. तसेंच कनिष्काची राजधानी पुरुषपूर येथें असतां त्यानें कनिष्काविषयीं ज्या दंतकथा ऐकल्या त्याही त्यानें लिहून ठेविल्या आहेत. त्यांपैकीं एक अशी आहे कीं, बुद्धाचा निर्वाणकाळ समीप आला, तेव्हां त्यानें आनंदाला म्हटलें कीं 'माझ्या निर्वाणानंतर कित्येक वर्षांनीं या ठिकाणीं कनिष्क नांवाचा राजा राज्य करील, व तो माझ्या निर्वाणाच्या जागीं एक स्तूप बांधील.' ही बुद्धाची वाणी खरी झाली व कनिष्करायानें त्या जागीं स्तूप बांधिला. चार वर्षांपूर्वीं पेशावराजवळ सरकारच्या आर्किऑलॉजिकल खात्याचे लोक खणीत असतां त्यांना या स्तूपाचा शोध लागला व त्यांत एका सुवर्णकलशांत पाहून ठेविलेली बुद्धाची रक्षाही सांपडली. प्रसिद्ध स्पेन देशीय परिव्राजक अलबेरुनि हिंदुस्थानांत आला होता तोंपर्यंत हा स्तूप कायम होता. त्यावेळीं याला लोक 'कनकचैत्य' म्हणत असत. या स्तूपाजवळ बौद्धांचा एक विहारही बांधलेला होता. तो इ० स० च्या ९ व्या १० व्या शतकापर्यंत बौद्धविद्येचें आगर गणिला जात असे. हा विहार अत्यंत विशाल असून त्याचें शिल्पकाम फार सुंदर आहे असें अलबेरुनीच्या प्रवासवृत्तांत म्हटलें आहे. यावरून मुसलमानांच्या कारकीर्दीत बहुधा या इमारतींचा नाश झाला असावा असें वाटतें.

भारतीय बौद्ध राजांच्या जीवनाचा आदर्श म्हणजे अशोकाचें चरित्र असें प्राचीनकाळापासून सामान्यतः मानण्यांत आलें आहे. यामुळें कनिष्काच्या

चरित्राची हकीकत लिहितांना बौद्धग्रंथकारांनीं बहुतेक अशोकाच्या चरित्रा चीच पुनरावृत्ति केली आहे! पूर्ववयांतला तो अल्लडपणा, क्रूरता, धर्म व नीति यांच्याशीं विरोध, साधूचा छळ व नंतर एखादा अलौकिक चमत्कार पाहिल्यानंतर डोळे उघडणें, पश्चात्ताप, वृत्तांत घडणारें परिवर्तन, धर्मोत्साह, धर्मपरतेची परमावधि, इ. गोष्टींत अशोक व कनिष्क यांच्या चरित्रांत इतकें साम्य आहे कीं, हें सगळें ऐतिहासिक सत्य आहे असें मानण्याकडे विचारी माणसाची प्रवृत्तिच होत नाहीं. अशोकाला उपगुप्त हा गुरु भेटला, तसा कनिष्काला सुदर्शन नांवाचा भिक्षु भेटला. नांवांत काय तो फरक, बाकी सगळें चरित्र येथून तेथपर्यंत एक! सुदैवानें अशोकाच्या चरित्रांतल्या ठळक ठळक गोष्टींचा उल्लेख त्याच्या आदेशांत व शिलालेखांत तरी सांपडतो, व त्यामुळें ऐतिहासिक सत्य आणि दंतकथा यांच्यांतला भेद ओळखण्याला कांहीं साधन तरी आहे. कनिष्काच्या चरित्राचीं अशीं विश्वसनीय साधनें अद्यापि उपलब्ध झालेलीं नाहींत व दंतकथा पहाव्या तर अशोकाविषयाच्या दंतकथांची नक्कल! अशा स्थितींत कनिष्काचें विश्वसनीय चरित्र लिहिण्याचें काम किती मुष्किलीचें आहे तें कोणालाही कळेल.

बौद्धधर्माच्या इतिहासांत कनिष्काचें नांव प्रसिद्ध आहे, तें विशेषत त्याच्या आश्रयाखालीं भरलेल्या तिसऱ्या धर्मसभेमुळें आहे. ही सभा कोठें भरली याविषयीं अनिश्चितपणा आहे. कोणी म्हणतात कीं, जालंधरापाशीं कुवन येथील बौद्ध विहारांतच ती भरली होती. किल्कॉर्न्याच्या मतें काश्मीरांत कुवलयन विहारांत ती भरविण्यांत आली होती. सभेंत झालेल्या चर्चेसंबंधानें व कामाविषयींही असाच मतभेद आहे. तारानाथ नांवाच्या तिबेटी ग्रंथकारानें बौद्धधर्माचा जो इतिहास लिहिला आहे, त्यांत असें म्हटलें आहे कीं, सुमारें अठरा वर्षे भिक्षूंच्या संघांत जे तट पडले होते, ते मोडून टाकण्याचें श्रेय या सभेनें घतलें. अठरा पंथ स्थापन झाले होते, ते सगळे मान्य केले. सूत्रग्रंथ व अभिधम्म (तत्त्वज्ञानविषयक ग्रंथ) यांच्यांतले कित्येक अलिखित व लिखितांपैकींही कित्येक जे अमान्य होते ते काढून टाकण्यांत आले. महायान पंथाचे ग्रंथ या वेळीं लिहून झाले

होते, तरी श्रावकांनीं (शून्यापंथाच्या बौद्धांनीं) त्याच्या संबंधानें आक्षेप घेऊन विचका केला नाहीं, हें त्यांना भूषणावह आहे.

दुसऱ्या एका तिबेटी ग्रंथांत या सभेविषयीं असें झटलें आहे कीं, ही तिसरी धर्मसभा धर्मग्रंथांचें संकलन करण्यासाठीं पार्श्वप्रभृति ५०० अर्हत् व वसुमित्रप्रभृति ५०० बोधिसत्व यांनीं भरविली होती. ह्यूएन-त्संगच्या ग्रंथांत याविषयीं बरीच माहिती आहे, पण ती बहुधा दंतकथांच्या साह्यानें लिहिली असावी. तिच्यावरून असें दिसतें कीं, बौद्धसंघांत जे वाद त्या काळीं चालले होते, ते मिटून सर्वांची एकवाक्यता व्हावी, अशी कानिष्काची फार इच्छा होती. त्यामुळें त्यानें आपले परमपूज्य गुरु पार्श्विक यांच्या विचारानें सर्व धर्मग्रंथांचें एकीकरण करणारे भाष्यग्रंथ तयार करण्याच्या उद्देशानें ही तिसरी धर्मसभा बोलाविली होती. वसुमित्राच्या अध्यक्षत्वाखालीं सभेच्या कामाला सुरवात होऊन सुत्त, विनय, व अभिधम्म या तिन्ही ग्रंथांवर एकेक लक्ष श्लोकात्मक भाष्यग्रंथ लिहिण्यास आरंभ झाला. सर्व निरनिराळ्या मतांच्या पंथांचें समाधान करण्यासारखे भाष्यग्रंथ लिहिण्याचें काम किती कठीण व जोखमीचें किंबहुना अशक्य आहे, याची कल्पना वसुमित्रासारख्या विद्वानाग्रणीला झाली नसेल, असें म्हणवत नाहीं. तथापि हें काम त्या सभेच्या हातून झालें असेल तर तें एकाच शर्तीवर होणें शक्य होतें. ती शर्त ही कीं, बहुतेक सगळे हजर असलेले भिक्षु हीनयान पंथाचे किंवा त्याच्या पोटपंथांचे असतील, आणि महायान पंथाचे असले तरी ते फारच थोडे असतील, व बहुमतापुढे त्यांचें कांहीं चाललें नसेल. असो, या धर्मसभेंत सुत्त, विनय व अभिधम्म या ग्रंथांच्या सुधारलेल्या आवृत्त्या तयार झाल्या. या सभेला कोक बरेच हजर असले पाहिजेत. पण हे स्थविरवादी आणि सीलोनचे विभाज्यवादी हे एकच कीं भिन्न, तें मात्र खात्रीनें सांगतां येत नाहीं. सीलोनचे विभाज्यवादीही आपणां स्वतःला मूळचे शुद्ध अस्सल स्थविरवादी म्हणवितात, ही नोंद येथें सांगितली पाहिजे.

---

१. यांना अनुक्रमें उपदेश, विनय-विभाषा व अभिधर्म-विभाषा अशीं नांवें आहेत.

ही तिसरी धर्मसभा भरली त्या काळची बौद्धधर्माची स्थिति लक्षांत धरल्याशिवाय या सभेचें खरें महत्व बरोबर लक्षांत येणें अशक्य आहे. गौतमबुद्धाच्या वेळचा बौद्धधर्म आणि कनिष्काच्या वेळचा बौद्धधर्म यांत बरेंच अंतर पडलें होतें, यांत शंका नाही. बौद्धधर्माचें मूळचें शुद्ध स्वरूप आतां राहिलेलें नव्हतें. ब्राह्मणधर्माशीं विरोध संघट्टन व सिथियन, बॅक्ट्रियन, मंगोलियन इत्यादि परकीयांच्या स्वाऱ्या, वगैरे अनेक कारणांमुळें त्याचें स्वरूप पालटलें होतें. अशोकाच्या मागें मगधाचे अफाट राज्याचा कारभार दक्षतेनें करण्यासारखा खंबीर मनुष्य कोणी राहिला नव्हता. याच वेळीं ग्रीक, बॅक्ट्रियन, शक वगैरे लोकांच्या टोळ्या हिंदुस्थानांत कायमचें बि हाड देण्याच्या विचारांत होत्या. मगधराज्याची विपन्नावस्था पाहून त्या राज्याचे लचके तोडण्यामध्यें त्या लोकांची आपापसांत स्पर्धा लागली होती यामुळें उत्तर हिंदुस्थानांत, विशेषत उत्तर व वायव्य या दिशाकडील प्रांतांत, बरीच राजकीय धामधूम सुरू होती. या धामधुमींत कुशान वंशाला राज्यस्थापनेच्या कामीं यश आलें तसें आपणांलाही यावें, म्हणून बाकीच्या लोकांचे प्रयत्न जारीनें चालले होते कनिष्कराजानें आपल्या पूर्वीच्या धर्माचा त्याग करून बौद्धधर्म स्वीकारल्यापासून आणि बौद्धधर्माच्या प्रसारार्थ प्रचारक पाठविल्यापासून या परकीयांशीं बौद्धधर्मीयांचें विशेष संघट्टन होत चाललें होतें त्याच वेळीं इकडे ब्राह्मणधर्मीयांशीही सलोखा करण्याचे प्रयत्न सुरू होते. दक्षिणेकडचे, म्हणजे सीलोन–सयामकडील बौद्धलोक सलोखा करण्यास व ब्राह्मणधर्मांतील आचारविचारांचें आपल्या धर्ममतांशीं व आचारांशीं मिश्रण होऊं देण्यास कबूल नव्हते. उत्तरेकडच्या लोकांना हा त्यांचा दुराग्रह वाटत होता व ते हळूहळू त्यांच्यापासून भिन्न होऊं पाहत होते महायान व हीनयान असे जे बौद्धांत

---

१ यान म्हणजे गाडी किंवा नाव. हा दुस्तर भवसमुद्र तरून जाण्यास अथवा हा कंटकमय विषम संसारमार्ग आक्रमून निर्वाणाच्या मुक्कामाला पोंचण्यास बौद्धधर्म हें सोयीचें व उत्कृष्ट साधन आहे, असें दाखविण्यासाठीं त्या धर्माचें चित्र नाना–या रूपानें काढण्याची वहिवाट असे. महायान म्हणजे मोठें यान–अर्थात् सुधारलेला बौद्धधर्म, व हीनयान म्हणजे निकृष्टप्रतीचें यान–अर्थात् जुनापुराणा

दोन पथ झाले, त्याचें मूळ येथेच होतें. आणि यामुळेंच कनिष्कानें भरविलेल्या धर्मसभेला एकाच पंथाचे लोक विशेषतः आले, दुसऱ्या पंथाचे मुख्य मुख्य पुढारी मुळींच आले नसावे असें दिसतें. महायान व हीनयान या दोन पथांत मूळचें अंतर जरी थोडें होतें, तरी दिवसेंदिवस तें वाढत जाऊन कनिष्काच्या वेळीं तर त्यांच्यांत फारच थोडें साम्य उरलें होतें. मूळच्या बौद्धमतांत आणि महायान पंथाच्या मतांत कोठें कोठें अंतर पडलें होतें, तें पाहिलें म्हणजे वरील विधानाची सत्यता दिसून येईल

कनिष्क राजाच्या वेळचा बौद्धधर्म अनेक बाबतींत मूळच्या शाक्य गौतमाच्या बौद्धधर्माहून निराळा होता. आचारांतच नव्हे, तर विचारांत व धर्म-मतांतही अंतर पडलें होतें. कांहीं कांहीं बाबतींत तर मतांत विलक्षण क्रांति झाली होती उदाहरणादाखल पुढील कित्येक गोष्टी येथें देतां येतील

१ बुद्धाच्या काळीं लोकांची देवावर श्रद्धा असे बुद्धानें या श्रद्धेला विरोध केला नाहीं, व उत्तेजनही दिलें नाहीं बुद्धाच्या मतें जसे इतर प्राणी तसेच देवही होते इतरांच्यापेक्षा ते अधिक सुखी होते, एवढेंच काय तें. हें सुख त्यांना लाभण्याचें कारण त्यांचें पवित्र आचरण होय पण तेही माणसांसारखेच

बौद्धधर्म. 'हीनयान' हें तिरस्कारदर्शक किंवा व्यंगसूचक नांव अर्थात् महायान पंथी (उत्तरेकडच्या) लोकांनीं विरुद्ध मताच्या (दक्षिणेकडच्या) लोकांना दिलेलें आहे महायान पंथाचे लोक तिबेट, नेपाळ, चीन, जपान, कोरिया वगैरे देशांत आहेत, आणि हीनयान पंथाचे लोक सयाम, ब्रह्मदेश, सीलोन वगैरे देशांत आहेत महायान पंथाच्या लोकांनीं ब्राह्मणधर्मांतल्या पुष्कळशा गोष्टी उचलल्या. त्यांचे ग्रंथ देववाणींत म्हणजे संस्कृत भाषेंत आहेत, हीनयानाचे पाली भाषेंत आहेत. हिंदुस्थानांत हे दोन्ही पंथ जवळ जवळ होते कित्येक विहारांतून तर दोन्ही पंथांचे भिक्षु एकत्र राहत. त्यांच्यांत वादविवाद चालत, पण ते कधीं विकोपाला गेले नाहींत. पुढें पुढें मात्र या मतभेदांना उग्र स्वरूप प्राप्त झालें, व कनिष्काचे कारकीर्दींच्या शेवटीं शेवटीं हे दोन पंथ उघड उघड वेगळे झाले होते.

परिवर्तनशील आहेत. सद्वर्तनाबद्दलचें बक्षीस ज्याप्रमाणें सुखाच्या रूपानें त्यांना मिळालें आहे, त्याप्रमाणें दुर्वर्तनाबद्दलचा दंडही त्यांना झाल्यावांचून राहावयाचा नाहीं; जशी उन्नति तशी अवनतिही त्यांच्या कर्माशीं बद्ध आहे. कधीं काळीं त्यांच्या हातून दुष्कृत्यें घडल्यास त्याबद्दल त्यांनाही दुर्गति प्राप्त व्हावयाची हें ठरलेलें आहे; निर्वाणाप्रत पोंचलेल्या बुद्धाइतकी उच्च पदवी देवांची मुळीं नाहीं, ते अद्यापि भवचक्रांतच आहेत. असें बुद्धाचें मत होतें. पण हें मत, कनिष्काच्या काळीं देवाविषयींचें जें मत महायानबौद्धांत रूढ होतें, त्याहून फार निराळें होतें. देव हा सर्वांहून श्रेष्ठ, सृष्टीचा निर्माणकर्ता व अनाद्यनन्त आहे, आणि गौतम बुद्ध हा त्या देवाचा एक अंश आहे, हें या काळच्या बुद्धांचें मत होतें.

२ बोधिसत्त्व हें नांव बुद्धाच्या काळीं अशांना लावीत असत कीं, जे आर्य-अष्टांगिक मार्गांत सांगितल्याप्रमाणें वागून बुद्धत्वप्राप्तीच्या अगदीं जवळ जवळ पोंचलेले होते. हा मूळचा अर्थ बहुतांशानें पुढेंही कायम राहिला, पण त्यांत ब्राह्मणधर्मी कल्पनेची भर पडून लोकांची अशी समजूत झाली कीं, बोधिसत्त्व हे स्वर्गलोकीं असतात व तेथून जगांतल्या लोकांच्या आध्यात्मिक उन्नतीची काळजी वाहत राहतात; इतकेंच नाहीं, तर प्रसंगविशेषीं स्वतःच्या निर्वाण-प्राप्तीवर पाणी सोडून लोकांच्या उद्धारार्थ अवतार घेऊन येतात व लोकांना धर्मोपदेश करतात. हे बोधिसत्त्वाचे अवतार म्हणजे निरनिराळे देव व देवता होत.

३. गौतमबुद्धाच्या काळीं अर्हत् पद म्हणजे अति उच्च पद होतें बुद्धाच्या धर्मनियमांप्रमाणें उत्कृष्ट आचरण ठेवून निर्वाणप्राप्तीची पात्रता ज्यांना आली असेल ते अर्हत् समजले जात. कनिष्काचे काळीं अर्हतांवर बोधिसत्त्वांचा नंबर लागला, आणि स्वतःच्या आचरणाची शुद्धता मागें पडून दुसऱ्याच्या उद्धाराविषयींच्या कळकळीला अधिक महत्त्व मिळालें

४. गृहस्थाश्रमी लोकांना स्वतःच्या शुद्ध वर्तनाच्या द्वारें निर्वाणप्राप्तीचा मार्ग खुला करून घेतां येत असे आतां बोधिसत्त्वावरच्या श्रद्धेच्या हातीं निर्वाणाच्या किल्ल्या आल्या. मुमुक्षूनें बोधिसत्त्वाचा धावा करावा, म्हणजे तो त्याला निर्वाणाला नेईल, ही समजूत दृढ होऊन बसली

५. बुद्धाची निर्वाणाची कल्पना म्हणजे राग, तृष्णा, द्वेष इ० चा नाश अशी होती. ती जाऊन आतां निर्वाण म्हणजे स्वर्गसुख अशी लोकांची समजूत झाली के सदाचरणी असतात ते स्वर्गलोकीं जाऊन अवर्णनीय-कल्पनातीत-सुख भोगतात, व दुराचारी असतात त्यांना दुःख भोगावें लागतें, अशी लोकांची समजूत झाली. अशा पापी लोकांसाठीं नरकाचीही योजना तयार झाली.

६. बुद्धाच्या वेळी प्रव्रज्या ग्रहण करतांना ज्या दशशीलाचें ग्रहण करावें लागे, त्यांची नांवें विनयपिटकांत दिलीं आहेत. त्यांपैकीं पहिलीं पांच आतांपर्यंत कायम होतीं. अपराह्ण भोजन, नृत्यगीतादिकांचें दर्शन, भूषणासाठीं मालाधारण, उच्चासनावर उपवेशन व शयन, व सुवर्ण किंवा रौप्य यांचा प्रतिग्रह (स्वीकार) या गोष्टींचा बुद्धानें निषेध केला होता. हा निषेध काढून टाकून पुढील दशशीलें ठरविण्यांत आलीं —१ प्राणातिपात (अहिंसा), २ अदत्तादान, ३ कामेषु मिथ्याचार, ४ सुरामेरेय मद्यपान, ५ मृषावाद ६ पिशुनवाक्, ७ संभिन्न प्रलाप (छचोरपणाचे, अनादर दाखविणारे किंवा हलकटपणाचे शब्द), ८ अभिध्या (लोभ), ९ व्यापाद (द्वेष किंवा मत्सर), व १० मिथ्यादृष्टि (नास्तिकपणा) यांच्यापासून निवृत्त राहणें. यांचें नांव दशकुशल अथवा दशशीलें.

७. महायान बौद्धांनी ब्राह्मणधर्मांतल्या देवदेवतांचा स्वीकार कांहीं ठिकाणीं त्यांचीं नांवें बदलून व कांहीं ठिकाणी त्यांच्या मूलस्वरूपांत केला, इतकेंच नाहीं, तर त्यांच्या संबंधाच्या पौराणिक कथाही उचलल्या. ब्राह्मणधर्मांतील ब्रह्मदेव तो त्यांचा महाब्रह्मा, विष्णु तो बौद्धांचा पद्मपाणि (अवलोकितेश्वर), व शिव तो त्यांचा महायोगी. शिवाचीं महाकाल, भैरव, भीम वगैरे निरनिराळीं रूपें व तायबयी मंत्रतंत्र ही बौद्धधर्मांत आलीं. पार्वती, दुर्गा, काली वगैरेंच्या मूर्ति, देवळांतून जाऊन बसल्या त्यांच्या प्रीत्यर्थ बळी अर्पण होऊं लागले. बौद्धांमध्ये तारा नांवाची एक नवी शक्ति निर्माण होऊन ती देवांच्या प्रमा-

१ महावस्तु (Senaart s edition' vol II P 99.)

वर्चीत जाऊन बसली. बुद्धाच्या वेळची बुद्ध, धर्म, व संघ ही त्रयी केवळ शब्दस्वरूपात होती. आता तिच्या प्रतिमा झाल्या, आणि त्यांना मंजुश्री, अवलोकितेश्वर ( पद्मपाणि ) आणि वज्रपाणि अशी नांवें मिळाली मंजुश्री म्हणजे प्रज्ञा, अवलोकितेश्वर म्हणजे विष्णु आणि वज्रपाणि म्हणजे शिव किंवा इंद्र. सर्वशक्तिमान् आद्य परमेश्वराची एक निराळी मूर्ति बनून तिला ' आदिबुद्ध ' असें नांव मिळालें. नेपाळांत वज्रधात्री, लोचना, मामकी, पाण्डुरा व तारा-देवी असें देवींचें पंचायतन देव्हाऱ्यांत जाऊन उपासकांकडून पूजा अर्चा घेऊं लागलें. देवींच्या बरोबर भूत, प्रेत, राक्षस, पिशाच, नाग, यक्ष, किन्नर, गरुड, वगैरे गोष्टीही बौद्धधर्मांत घुसल्या.

बुद्धाच्या रक्षेच्या संरक्षणार्थ कनिष्कानें जे स्तूप बांधले, त्यांचा उल्लेख मागें आलाच आहे या स्तूपांचा शोध हिंदुस्थानसरकारच्या पुराणवस्तुसंशोधन खात्याला नुकताच लागला आहे. स्तूपांचीं जीं वर्णनें प्रसिद्ध झालीं आहेत, त्यांवरून तत्कालीन भारतीय शिल्पकलेशीं विदेशी शिल्पकलेचें मिश्रण किती झालें होतें तें स्पष्ट दिसतें. हा काळ बौद्धधर्माच्या अवनतीचा होता, या-विषयींही संशय राहत नाहीं कारण, हुएनत्संगानें या स्तूपाचें वर्णन देतांना असें म्हटलें आहे कीं, बौद्धधर्मी लोक पूर्वीपासून या स्तूपाला नवस करीत आले आहेत ! नवसाची कल्पनाच मूळ बौद्धधर्माला परकी आहे, हें येथें सांगावयाला पाहिजे असें नाहीं. या स्तूपात सांपडलेल्या करंडकावर खरोष्ट्री भाषेत कांहीं लेख कोरलेले आहेत, व त्याच्यावर बुद्धाची मूर्ति काढलेली असून त्याच्या दोन्ही बाजूंस दोन बोधिसत्व ब्रह्मा आणि इंद्र यांच्या रूपानें काढले आहेत, व ते बुद्धाची पूजा करीत आहेत असें दाखविलें आहे तत्कालीन बौद्धधर्माचें

---

१. मंजुश्री नांवाच्या बौद्धधर्मोपदेशकानें बौद्धधर्म प्रथम नेपाळांत नेला. त्यालाच देवाचें स्वरूप देऊन त्याची मूर्ति बसविण्यांत आली असावी, असा कित्येक पाश्चात्य पंडितांचा तर्क आहे.

२. फा-ह्यान हा प्रसिद्ध चिनी प्रवासी महायान पंथाचा होता. हा अव-लोकितेश्वराची अर्चा करीत असे, असें म्हणतात.

( म्हणजे महायान पंथाचें ) ब्राम्हणधर्माशीं झालेल्या मिश्रणाविषयीं मागें जें सांगितलें आहे, त्याला हा एक उत्कृष्ट पुरावा आहे.

बुद्धाची रक्षा ठेवलेल्या करंडकाचे आंत ब्रांज नांवाच्या धातूचा केलेला एक करंडा सांपडला असून त्याची उंची ७ इंच व लांबी ५ इंच आहे; व त्याचें एकंदर स्वरूप पूर्वीच्या काळच्या ग्रीक रमणींच्या तपकिरीच्या डबीसारखें आहे, असें एका लेखकानें म्हटलें आहे हा करंडक तयार करणारा अगि-सालॉस नांवाचा कोणी ग्रीक कारागीर होता. या कारागिरानें महोसेदई येथील लिंगाराम नांवाचा कनिष्कस्तूप बांधला असें म्हणतात. यावी गोष्टीवरून त्या काळीं भारतीय शिल्पकला अवनतीच्या पंथाला लागलेली होती, व ग्रीक कलेनें आपला पगडा तिच्यावर पूर्णपणें बसविला होता, असें अनुमान काढ-ल्यास तें चुकीचें ठरेल असें दिसत नाहीं.

याप्रमाणें हिंदुस्थानच्या प्राचीन इतिहासात संस्मरणीय अशीं कृत्यें करून कनिष्क राजा इ. स १५० च्या सुमारास मरण पावला या राजाच्या मृत्यूसंबधानें मॉ. सिल्व्हेन लेव्ही यांनी एक फार गमतीची हकीकत दिली आहे ती अशी —

" माथर नांवाचा कनिष्काचा एक प्रधान होता याची बुद्धि असामान्य होती. तो राजाला म्हणाला, ' महाराज, आपण या दासाची विनती ऐकाल तर या त्रिखंड पृथ्वीचें राज्य आपणांस मिळेल, यच्चयावत् प्राणी आपल्या हुकु-मात राहतील, आणि अष्ट दिशा आपल्या पुण्याचे अंशभागी होतील ' असें म्हणून त्यानें राजाच्या कानांत कांहीं गोष्ट सांगितली आणि ती गुप्त ठेव-ण्याविषयीं त्याला बजावलें. राजानें ती गोष्ट कबूल केली, आणि आपल्या सैन्यावरील अधिकाऱ्यास बोलावून चतुरंग सेना सज्ज केली. ती घेऊन तो जिकडे जिकडे जाई, तिकडे तिकडे लोक त्याला मुकाट्यानें शरण येत. पूर्व, पश्चिम व दक्षिण अशा तिन्ही दिशांस जाऊन त्यानें दिग्विजय केले. आतां फक्त उत्तर दिशा राहिली. तेवढी जिंकली म्हणजे पुन, शत्रूचें नांव घ्यावयाला नको, असा कायमचा बंदोबस्त होईल, असें कनिष्काला वाटून उत्तर दिशा जिंकण्याला काय युक्ति करावी अशा विचारांत तो होता. इकडे लोकांच्या

अमर्णीना राजाची ही महत्वाकांक्षा व राज्यलोभ पाहून भीति वाटली सैन्या-तल्या शिपायांनाही दूरदूरच्या देशात जाऊन राहावें लागल्यामुळें तेही असंतुष्ट झाले अशा अकल्पित रीतीनें पेरल्या गेलेल्या असंतोषरूपी बीजाचा लवकरच वृक्ष होऊन त्याची विषारी फळें राजाला चाखावीं लागलीं राजाची प्रकृति अस्वस्थ झाली असतां व तो अंथरुणावर तळमळत पडला असतां दोघा चौघा मारेकऱ्यांनीं येऊन एकदम त्याच्या तोंडावर पांघरूण घातलें व गळा दाबून श्वास कोंडून त्यास ठार मारलें! याप्रमाणें दुष्टबुद्धि मंत्र्याच्या शब्दावर विश्वास ठेवून वागणाऱ्या या निष्कलकीर्ति राजाचा असा शोचनीय प्रकारें अंत झाला ”

कनिष्क राजाविषयीं आतापर्यंत एवढीच माहिती उपलब्ध झाली आहे, आणि जी झाली आहे तिच्यासबंधानें बराच मतभेद झालेला आहे, हें वरील विवेचनावरून दिसून येईल हा मतभेद नाहींसा होऊन कनिष्क राजाच्या कारकीर्दीचा इतिहास निश्चित होण्याला बराच कालावधि लागेल, असा सुमार दिसतो कारण या राजासबधाच्या प्रत्येक गोष्टीविषयीं भिन्न भिन्न विद्वानांची भिन्न भिन्न मतें आहेत कोणी म्हणतात कीं, हा मु द्दे ची पैकीं कुशान वशांतला होता, तर कोणी म्हणतात कीं, पहिले दोन काडफिसेस राजे एवढेच काय ते कुशानवशांतले असून कनिष्क राजानें नवा वंश उदयास आणिला होता कनिष्क राजा हा दुसरा काडफिसेस याचा प्रत्यक्ष मुलगा नसला तरी संबधी होता, असें कित्येक म्हणतात, तर कित्येक म्हणतात कीं, त्यांचा अर्थाअर्थी सबंध नव्हता व दुसरा काडफिसेस याचा मृत्यु व कनिष्कराजाचें राज्यारोहण यांच्या मध्यतरीं बराच काळ गत झाला असला पाहिजे कोणी म्हणतात कीं, हुविष्क (यांचें नांव हुविष्क, हुष्क, हुविक्ष व हुक्ष अशा निरनिराळ्या तऱ्हांनीं निरनिराळ्या ग्रथकारांनीं लिहिलेलें आढळतें ) हा कनिष्काचा आजा होता, तर कोणी म्हणतात कीं तो त्याचा मुलगा होता। कोणी म्हणतात कीं हुविष्क व कनिष्क यांच्या मध्यतरीं वासिष्क नांवाचा आणखी एक राजा होऊन गेला! या सबधांत मद्रास स्टँडर्ड नांवाच्या पत्राच्या ता. १९ सप्टेंबर १९१२ च्या अकांत म्हटलें आहे—

“ The Superintendent of Hindu and Buddhist Monuments (Northern circle) states in his annual

Report just issued that a discovery was made at Isapur, situated on the left bank of the river Jumna which has proved of the highest importance to the Scythian period of Indian history. The discovery consists of an inscription which establishes beyond doubt that between Kanishka and Huvishka, the great Kushan rulers, there reigned a sovereign of the name of Vashishka, whose authority was acknowledged at Mathura. The inscription was discovered by Pundit Radha Krishna and it has been deposited in the Muttra Museum."

राजतरंगिणीत जुष्काचें नाव आहे. मि० न्हिस डेव्हिड्स साहेबांच्या मतें हुष्क ( हुविष्क? ) हा कनिष्काचा अनुगामी होता. डॉ० फ्लीट साहेब म्हणतात कीं, वसिष्क हा राजा कनिष्क व हुविष्क यांच्यामध्यें किंवा हुविष्कानंतर झाला. मि. व्हिन्सेंट स्मिथ यांनी या राजांच्या वेळच्या सांपडलेल्या दाखल्यांच्या आधारानें डॉ० फ्लीट साहेबांचा वरील तर्क निराधार आहे, असें तर या शिलालेखावरून पुष्टीचें आहे त्यांचें म्हणणें असें आहे कीं, वासिष्क व वासुदेव मात राहतील, आणि अष्ट हिंजा हुविष्काच्या नंतर झाला असला पाहिजे. कारण म्हणून त्यानें राजाच्या कानात ची नाणी काबुलापासून मगधापर्यंत हवी तेवढी त्याविषयी त्याला बजावलें. राजा झाला असता तर त्याचींही नाणी सांपडान्यावरील अधिकाऱ्यास बोलावून चर्चिलें, पण नाणी मात्र पावली नाहींत, असें जिकडे जिकडे जाई, तिकडे तिकडे ण्णें छत्र व चामरें, त्याप्रमाणेंच स्वत:च्या पूर्व, पश्चिम व दक्षिण अशा तिन्हीं दिशा राजलक्षण गणिलें जात असे सारांश, आतां फक्त उत्तर दिशा राहिली. तेव्हां जिकडे एका पंडिताचें मत दुसऱ्या न्यायपाला नको, अशा कायमचा बंदोबस्त होऊं देयाति आहे.
दिशा जिंकण्याला काय युक्ति करावी असा विचा

# प्रकरण १६ वें.

## बौद्धधर्माचा भरतखंडांत लोप.

[ बौद्धधर्माचा प्रसार—त्या धर्माचा छळ झाल्याचीं कित्येक उदाहरणें–त्यावरून निघणारीं अनुमानें–बौद्धधर्माच्या अवनतीचा क्रम–उत्तरहिंदुस्थानांत झालेला ऱ्हास–दक्षिण हिंदुस्थानांतला बौद्धधर्म–लोकांच्या भ्रामक समजुती व बौद्धधर्माच्या लोपाचीं कारणें. ]

कनिष्कानंतर हिंदुस्थानांत बौद्धधर्माचा पुरस्कर्ता असा कोणी बलाढ्य राजा राहिला नाहीं तथापि तो धर्म पुढें कित्येक शतकेंपर्यंत ठिकठिकाणीं जीव धरून राहिला होता, आणि कांहीं कांहीं प्रांतांत त्याची भरभराटही होती असें चिनी प्रवाशांनीं लिहून ठेवलेल्या प्रवासवृत्तांवरून दिसतें. इ. स. च्या पांचव्या शतकांत काबुलापासून मगधापर्यंत ठिकठिकाणीं बौद्ध लोकांचे विहार असून बौद्धभिक्षूविषयीं लोकांचे मनांत पूज्यबुद्धि होती असें फा–ह्यान यानें म्हटलें आहे. हुएन त्संगच्या वेळेस बौद्धधर्म अफगाणिस्थानांत होता, पण हिंदुस्थानांत पेशावराजवळ पुष्कळ ठिकाणीं बौद्धविहार अत्यंत जीर्ण व शीर्ण स्थितींत असलेले त्याला आढळले. ब्राह्मण लोकांनीं बौद्ध लोकांचा छळ करून त्यांना हाकून लाविलें व त्यांच्या विहारांचा नाश केला, अशी दंतकथा आहे कांहीं अंशीं ती गोष्ट खरी असली तरी सर्वांशीं ती गोष्ट खरी दिसत नाहीं. तो काळ लढायांचा होता, आणि पुष्कळ वेळां पराजित सैन्यांतले शिपाई प्राणरक्षणार्थ विहारांचा आश्रय करीत व जेते त्यांचा पाठलाग करून त्यांना आश्रय देणाऱ्या इमारतींचा उच्छेद करीत. अशा रीतीनें बऱ्याच विहारांचा नाश झाला पण तो धर्मच्छल नव्हे. काश्मीरांत हुएनच्या वेळीं बौद्धधर्म चांगल्या स्थितींत होता. त्या देशांत नुसती बौद्धभिक्षूंची संख्या पांच हजार होती व पांचशें विहार कायम होते. सिंधप्रांतांत हीनयान बौद्धपंथ लोकांत मान्यता पावला होता. गंगा व यमुना या नद्यांच्या तीरांवरील तीर्थांतून

ब्राह्मणधर्म वर डोकें काढीत होता, तरी बौद्धधर्माचें तेज कमी झालें नव्हतें. कनोज येथें शिलादित्य नांवाचा राजा राज्य करीत होता. हा राजा स्वतः निष्ठावत बौध्दधर्मी होता, तथापि त्याच्या वेळीं ब्राह्मण धर्मालाही बौध्दधर्मा-बरोबरच मान मिळत असे. या राजानें इ० स० ६३४ मध्यें कान्यकुब्ज ( कनोज ) येथें एक धर्मसभा बोलावून हीनयान मताचा निषेध केला होता.

---

१ श्रीहर्ष हें या राजाचें खरें नांव होतें. तें बदलून शिलादित्य हें नांव त्यानें का धारण केलें, याविषयीं एक चमत्कारिक कथा हुयनत्संगानें दिली आहे. ती अशी —कान्यकुब्जाधिपति प्रभाकरवर्धन याच्यामागें त्याचा वडील मुलगा राज्य-वर्धन गादीवर बसला. पण गौडराजा शशांक यानें विश्वासघातानें त्याला मारिलें. तेव्हां राज्यवर्धनाचा धाकटा भाऊ श्रीहर्षवर्धन यास गादीवर बसण्याविषयीं प्रधानानें विनंति केली. पण श्रीहर्षाची बोधिसत्वाचे ठायीं श्रद्धा होती. म्हणून त्याच्याकडून दृष्टांत मिळावा यासाठीं त्यानें तपश्चर्या केली बोधिसत्वानें दृष्टांत देऊन सांगितलें कीं तू राज्य चालीव, पण सिंहासनावर बसू नकोस किंवा महाराज ही पदवी धारण करूं नकोस या आज्ञेप्रमाणें त्यानें स्वत चें नांव बद-लून कुमारराज शिलादित्य असें नवें नांव धारण केलें या राजाचा काळ इ स. ५८० चा सुमार हा होता. कारण ६० वर्षांपूर्वी शिलादित्य राजानें माळव्यावर स्वारी केली, असें हुयन आपल्या प्रवासवृत्तांत म्हणतो, आणि हा प्रवासी इ स. ६४० मध्यें माळव्यांत गेला होता.

२ 'या राजानें या वेळीं तीन महिनेपर्यंत बुद्धाचा महोत्सव केला. त्यांत तो इद्राचा पेषाक करून छत्र धरीत असे. या उत्सवांत राजे, सरदार, भिक्षु, ब्राह्मण वगैरे अनेक लोक आले होते उत्सवमूर्ति सोन्याची होती. मिरवणूक निघाली तेव्हां तींत दोन हजार शृंगारलेले हत्ती चालविले होते मूर्तीपुढें सुवर्णाचीं फुलें व मोत्यें यांचा वर्षाव होत असे. . .शेवटच्या दिवशीं आग लागून देऊळ जळू लागलें. तेव्हां माझ्या पुण्याईनें अग्नि शांत होवो, असें हर्षानें म्हणतांच अग्नि विझाला. (या गोष्टीवरून उपरति होऊन ) हर्षानें आपल्या अंगावरचे वस्त्रा-लंकारसुद्धां दिले व आपली बहीण राजश्री हिच्यापासून जुना पोषाख मागून घेऊन धारण केला.' ( पारखीशास्त्रीकृत श्रीहर्ष-पृ ३९)

मगधदेशांत बौध्दधर्माचें प्रावल्य अद्याप होतें या देशांत नालंद हें मुख्य विद्यापीठ होतें या ठिकाणी अध्ययनासाठीं दूरदूरच्या देशांहून लोक येत असत ओरिसा प्रांतांत ही बौध्दधर्म अद्याप जागृत होता पश्चिमेकडे म्हणजे गुजराथ, खानदेश व कोंकणाचा कांहीं भाग यांवर वल्लभी राजांचा अमल असे. हा सगळा प्रदेश बौध्दधर्मी होता कोसल ( नागपूर ) येथें ही बौध्दधर्माची भरभराट होती दक्षिणेकडे कलिंग व तैलगण हे प्रदेश खरीज करून सर्वत्र बौध्दधर्म प्रचलित होता

हुएन त्संग हिंदुस्थानांतला आपला प्रवास संपवून परत गेल्यावर म्हणजे इ. स ७५० च्या नंतर बौद्धधर्माला उतरती कळा लागली असावी असें दिसतें. या वेळीं दक्षिणेंत कुमारिलभट्ट नांवाचा एक विद्वान् ब्राह्मण बौद्धांशीं व जैनांशीं वाद करून ब्राह्मणधर्माचा प्रसार करण्याचा खटपट करीत होता कुमारिला च्या मागून श्रीशंकराचार्यांनीं ब्राह्मणधर्माची पताका हिंदुस्थानांत आसेतु हिमाचल फडकविली, आणि जागोजागीं मठांची स्थापना करून ब्राह्मणधर्माला स्थिरता आणिली एकीकडून ब्राह्मणधर्मी धर्मप्रचारकांची बौद्धधर्माच्या उच्छेदाची जंगी खटपट चालू असतां दुसरीकडून म्हणजे पश्चिमेच्या बाजूनें अरब लोक हिंदुस्थानांत शिरून मुसलमानी धर्माचा प्रसार तरवारीच्या जोरावर करू लागले होते या दोहोंच्यामध्यें सांपडून बौद्धधर्माचा कोंडमारा झाला, आणि आपापसांतले मतभेद व द्वेष, भिक्षु व भिक्षणी यांच्यामध्यें वाढलेली अनीति, व या धर्मतत्वांचें होत चाललें विस्मरण, परमार्थाच्या लाभापेक्षा ऐहिक अर्थकामाकडे होत गेलेली बौद्धांची प्रवृत्ति, वगैरे क्षयाची बीज बौद्धधर्मांत अशोकानें रुजलीं होतीं, त्यांना ब्राह्मणधर्मप्रवर्तकांकडून झालेल्या उद्योगामुळें जोवन मिळून बौद्धधर्माचा हिंदुस्थानांत झपाट्यानें ऱ्हास झाला व ब्राह्मण धर्मांत प्रविष्ट होऊन त्यानें हिंदुधर्म हें नवें नांव व नवें स्वरूप धारण केलें

बौद्धधर्मी लोकांच्या छळाचीं उदाहरणें अगदींच घडलीं नाहींत असें नाहीं कांहीं राजांनीं बौद्धधर्माविषयीं अतिशय द्वेषबुद्धि दाखवून राक्षसी कृत्यें केलीं हुएन-त्संग यानें आपल्या प्रवासवृत्तांत मिहिरकुल राजानें केलेल्या छळाचें

थोडेसें वर्णन दिलें आहे, तें अंगावर शहारा आणणारें आहे. मिहिरकुल हा काश्मीर देशाचा राजा होता. यानें गांधार देशावर स्वारी केली असतां वाटेंत जेवढे बौद्धांचे विहार व स्तूप लागले तेवढ्या सगळ्यांना आग लावून दिली! किंत्येक स्तूप खणून काढले, व बौद्ध भिक्षु व भिक्षुणी यांना ठार केलें. वॉग-पू नांवाच्या प्रवाशानें या प्रसंगाची हकीकत देतांना म्हटलें आहे कीं, या राजानें इतके बौद्ध मारले कीं, त्यांच्या रक्ताच्या नद्या वाहिल्या! बौद्ध पाहिला कीं या राजाच्या कपाळाला तिडीक चढत असे. त्यानें स्वतःचा प्रधान बौद्धधर्मी होता, त्यालासुद्धां ठार मारण्यास कमी केलें नाहीं. राजतरंगिणी नांवाचा जो काश्मीर देशाचा इतिहासग्रंथ संस्कृतांत प्रसिद्ध आहे, त्यांतही या राजाच्या या भयंकर कृत्याचा उल्लेख असून त्यांत या राजाला राक्षसी म्हटलें आहे.

कर्णसुवर्णाचा ( बंगालचा ) राजा शशांक यानेंही असाच बौद्धांचा उच्छेद मांडला होता. नुसत्या बौद्धांना ठार मारूनच याची तृप्ति झाली नाहीं. यानें त्यांचा पूज्य बोधिवृक्ष समूळ उपटून टाकिला, बुद्धाची मूर्ति छिन्नविच्छिन्न करून फेंकून दिली व त्या जागीं महेश्वराच्या मूर्तीची स्थापना केली. एकसुद्धां बौद्ध आपल्या राज्यांत राहूं दिला नाहीं.

---

१ हा मिहिरकुल राजा शाकल देशाचा असून म्लेंच्छ किंवा हूण जातीचा होता. ग्वाल्हेरच्या शिलालेखावरून कळतें कीं, यानें उत्तर हिंदुस्थानावर स्वारी करून बराच विजय संपादन केला. पण पंधरा वर्षांनी त्याचा पराभव होऊन त्याला परत आपल्या देशीं जावें लागलें. ब्राह्मणधर्मावर याची श्रद्धा होती असें दिसतें. कारण कीं, त्याच्या नाण्यावर शिव आणि वृषध्वज यांच्या मूर्ति कोरलेल्या असत. बौद्धधर्माविषयीं त्याची द्वेषबुद्धि होण्याचें कारण काय - तें कळत नाहीं. पण त्यानें पुष्कळ बौद्धांचा छळ केला एवढी गोष्ट निर्विवाद आहे. मिहिरकुल राजाचा काळ इ. स. ५१५-५४५ पर्यंत देतात. राजतरंगिणी ग्रंथांत म्हटलें आहे कीं, हा राजा सूर्योपासक होता. यानें मिहिरेश्वर नांवाचें सूर्यमंदिर बांधलें होतें. मिहिरकुलाच्या बापाचें नांव मुकुल, वासुकुल, वामकुल असा निरनिराळ्या तऱ्हेनें निरनिराळे ग्रंथकार देतात.

मौर्यवंशांतला शेवटचा राजा आणि अशोकाचा सहावा वंशज राजा पुष्य मित्र हा बौद्धधर्माचा कट्टा शत्रु होता यानें तर असा जाहिरनामा प्रसिद्ध केला होता कीं जो कोणी श्रमणाचें डोकें कापून आणून देईल त्याला शंभर *दिनार बक्षीस मिळतील। अर्थात् लोकांनी द्रव्याच्या आशेनें हजारों निरुपद्रवी* श्रमण व अर्हत् यांची डोकीं कापून आणून राजाला नजर केलीं

माधवाचार्यांच्या शांकरदिग्विजय ग्रंथांत व आनंदगिरिकृत शांकरविजयांत कुमारिल भट्टाच्या शिकवणीवरून सुधन्वा राजानें बौद्धांचा भनन्वित छळ केल्याचें वर्णन आहे बौद्ध दिसेल तेथें त्याला ठार करावा, आणि जो कोणी हें करण्यास चुकेल त्याचे डोकें उडविलें जाईल असा जाहिरनामा या राजानें प्रसिद्ध केला होता हा सुधन्वा राजा कोणत्या प्रांतांत व कोणत्या काळीं राज्य करीत होता याबद्दल उल्लेख मात्र कोठें सांपडत नाहीं, हें मोठें आश्चर्य आहे

बौद्धलोकांना मारून त्यांच्या विहारांना आगी वगैरे लाविल्याचीं व अन्य प्रकारें त्यांचा नाश केल्याचा चिन्हें काशीजवळ सारनाथ येथें सांपडलेल्या तत्कालीन वस्तूंच्या स्वरूपावरून स्पष्ट दिसत आहेत

या व दुसऱ्या कित्येक उदाहरणांवरून आणि प्रचलित दंतकथांवरून बौद्धांचा छळ कित्येक राजांनीं अगदीं अमानुष रीतीनें केला असें कबूल करणें भाग पडतें *पण या छळाबद्दल विशेष माहिती कोठें मिळत नाहीं वस्तुतः तत्कालीन बौद्ध ग्रंथांतून याविषयींची माहिती असण्याचा विशेष संभव पण पाली ग्रंथांतून या* छळाविषयींचा कोठें उल्लेख सुद्धां आढळत नाहीं, इतकेंच नाहीं, तर ब्राह्मणधर्मी आणि बौद्धधर्मी लोक बंधुप्रमानें राहत, परस्परांना योग्य मान देत आणि परस्परांच्या गुणांचें कौतुक करीत असें त्या ग्रंथांवरून दिसतें

*मि॰ हॉजसन या इंग्रज गृहस्थांनीं* नेपाळ व तिबेट या देशांतल्या अनेक बौद्ध हस्तलिखित ग्रंथांच्या आधारानें तद्देशीय भाषा व वाङ्मय यांचा इतिहास लिहून ठेविला आहे त्यांत ते म्हणतात कीं, 'कांहीं मायेफिरू ब्राम्हणधर्मीयांनीं बौद्धांची दाणादाण केली, आणि बौद्धधर्मी ग्रंथ जळविण्याचा यत्न केला, पण तो सिद्धीस गेला नाहीं शंकराचार्यांना बौद्धधर्मी आचार बुडविले व बुद्धाची पूजा नष्ट केली, पण यापलीकडे कांहीं केलें नाहीं '

डॉ० बुल्हर यांनीं पश्चिमहिंदुस्थान व दक्षिण यांतल्या कांहीं शिलालेखाचा शोध लाविला. त्यावरून असें दिसतें कीं, इ स. ८०० च्या नंतर सुद्धां बौद्धधर्मी लोक हिंदुस्थानात पुष्कळ होते, इतकेंच नाहीं, तर त्याना सन्मानानें वागविण्यांत येत असे.

इ. स. ८४३–४४ व ८५१ या सालचे कान्हेरी येथील दोन शिलालेख, इ. स १०५५ मधील दंबळ येथील शिलालेख व इ. स. १११० मधील मिरजचा शिलालेख यांवरून नवव्या, दहाव्या, अकराव्या व बाराव्या शतकात हीच प्रशंसनीय स्थिति होती असें दिसतें. यापैकीं कान्हेरीच्या पहिल्या म्हणजे ८४३ च्या शिलालेखांत कोंकणच्या शिलाहार राजाच्या प्रधानाकडून बौद्ध भिक्षूंना दानपत्र मिळाल्याचा उल्लेख आहे. ८५१ च्या शिलालेखांत बंगाल्यांतला कोणी एक बौद्ध कान्हेरीस येऊन राहिला, आणि त्यानें कांहीं नवीं लेणीं तयार करविलीं असें म्हटलें आहे. दंबळच्या शिलालेखावरून असें दिसतें कीं, धारवाड जिल्ह्यांत दोन नवे बौद्ध विहार बांधण्यांत आले, आणि त्यांचा खर्च कोणा एका श्रीमान् व्यापाऱ्यानें दिला. मिरजेच्या शिलालेखांत कोल्हापूरच्या राजानें एक तलाव खोदल्याचा उल्लेख आहे. या तलावाच्या काठीं त्यानें शिव, बुद्ध, आणि अर्हत् अशा तीन मूर्तींची स्थापना करून त्याच्या पूजेसाठीं कांहीं इनाम जमीन लावून दिली होती. यावरून त्या काळीं त्या राज्यांत जितका हिंदु-(ब्राह्मण) धर्माला, तितकाच बौद्ध व जैनधर्मालाही मान मिळत होता असें दिसतें. बौद्धधर्माविषयीं तत्कालीन ब्राह्मणधर्मीयांचें उदार वर्तन असे, या गोष्टीला पुराव्यादाखल अशीं पुष्कळ प्रमाणें देतां येतील पण ग्रंथविस्तारभयास्तव तसें करता येत नाहीं. या विषयासंबंधानें ज्यांना ज्यास्त जिज्ञासा असेल त्यांनीं 'इंडियन अँटिक्वेरी' मासिक पुस्तकाचें १८९६ सालचें पुस्तक (पृष्ठ २४५ व ३४५) व डॉ. भांडारकर यांचे धर्मपर लेख व व्याख्यानें (आवृत्ति दुसरी) पृष्ठ १०५–१०८ हीं पहावीं.

'प्रबोधचंद्रोदय' हें संस्कृत नाटक बाराव्या शतकांत रचिलें गेलें. त्या नाटकाच्या रचनेच्या काळीं बौधधर्म ऱ्हासाच्या पंथाला लागला होता, पण

नामशेष झाला नव्हता ब्राह्मणधर्माचा पगडा बौद्धधर्मावर तोंपर्यंत पूर्णपणें बसला नव्हता, असें अनुमान त्या नाटकावरून आमणांस काढतां येतें.

इसवी सनाच्या १३ व्या शतकांत ( १२७६ या वर्षी ) श्रावस्ती येथें एक बौद्ध मंदिर बांधण्यात आलें

चौदाव्या शतकात ( इ स १३३१ या वर्षी ) गया येथाल बौद्ध मंदिराची डागडुजी करण्यांत आली

१५ व्या शतकाच्या उत्तरार्धात ( इ स १४८५ या वर्षी ) नवद्वीपांत वैष्णव-शिरोमणी चैतन्य देव याचा जन्म झाला त्या वेळीं हा अवतारी पुरुष जन्मास आला आहे असें समजून हिंदूनीं तर महोत्सव केलाच, पण बौद्धांनीं सुद्धां केला, असें चैतन्याचा एक चरित्रकार लिहितो. यावरून त्या वळेपर्यंत बरेच ठिकाणी थोडे फार तरी बौद्ध होते, असें दिसतें

सोळाव्या शतकाच्या पूर्वार्धांत हिंदुस्थानांत बौद्धशास्त्राचें अध्ययन कोठें कोठें चालत असे याच शतकाच्या अखरीस बंगाल्यांतल्या एका कात्यायनगोत्री ब्राह्मणाला त्याची बौद्धधर्माकडे प्रवृत्ति दिसल्यावरून गांवकऱ्यांनी काढून दिलें होतें, अशी माहिती मिळते हा ब्राह्मण पुढें उघड रीतीनें स्वतः ला बौद्ध म्हणवून आणि बुद्धश्रमचक्रवर्ति हें नांव धारण करून सालोनमध्यें गेला, व तेथें त्याच्या पांडित्याबद्दल लोकांनीं त्याचा सत्कार केला, अशी एक कथा आहे

१६ व्या शतकाच्या अखेरास प्रसिद्ध तिबेटी लामा तारानाथ यानें हिंदुस्थानांत बौद्धधर्माची स्थिति कशी आहे हें पाहण्यासाठीं मुद्दाम दोन वकील इकडे पाठविले होते त्यांनीं इकडे बारकाईची चौकशी करून असा रिपोर्ट केला कीं, ओरिसा व पश्चिम बंगाल या प्रांतांत अद्याप बौद्ध धर्म जीव धरून आहे

वरील प्रमाणांवरून शंकराचार्यांच्या वेळीं म्हणजे ८ व्या शतकांतच हिंदुस्थानांतून बौद्धधर्माचें उच्चाटन होऊन तो नामशेष झाला, हें विधान बरेंच अति शयोक्तीचें आहे असें दिसून येईल आतां प्रश्न असा उद्भवतो कीं, जर सतराव्या शतकापर्यंत तो धर्म थोड्या फार अंशानें हिंदुस्थानांत होता, तर त्यानंतर तो केव्हां नाहींसा झाला ? त्याचें कांहींच स्वरूप पुढच्या दोन तीन शतकांत

कोठें दिसत नाहीं, हें कसें? या प्रश्नाला माझ्या मतें हें उत्तर आहे कीं, तो ब्राह्मणधर्मांत मिसळून जाऊन त्याचें विशिष्ट स्वरूप नष्ट झालें यामुळें तो हिंदुधर्मांतून वेगळा काढतां येत नाहीं हें नुसतें अनुमान नाहीं. बौद्धधर्म आपल्या उच्च ध्येयापासून भ्रष्ट होऊन ब्राह्मणी धर्मांत कसा प्रविष्ट झाला, त्याचा मागमुद्दा काढतां येतो कलकत्याचे प्रसिद्ध विद्वान् महामहोपाध्याय पंडित हरप्रसाद शास्त्री एम. ए. यांना हा माग काढला आहे, तो असा—

प्रथम बौद्धधर्मांत हीनयान आणि महायान असे दोन पंथ झाले. या पंथांच्या उत्पत्तीसंबंधानें पूर्वीच्या प्रकरणांत बरीच माहिती येऊन गेलेलीच आहे. हीनयान हा पंथ सामान्य लोकांच्या मनाची तृप्ति करणारा नव्हता. यामुळें त्याचें क्षेत्र बरेंच आकुंचित राहिलें महायान हा पंथ त्यांना अधिक सोयीचा वाटला, आणि पुष्कळसे लोक त्या पंथाला मिळाले. ज्यानें त्यानें स्वतः चिंतन करून आणि चित्त शुद्ध ठेवून धर्माचरण करणें हा हीनयानांचा मार्ग दुष्कर होता. त्यापेक्षां बुद्ध आणि त्याचा शिष्यवर्ग यांचे उपदेश ग्रथित केलेला स्तोत्रें —यांना धारणी म्हणत—यांचे पाठ नित्य नेमानें करणें व हाच पुण्यप्राप्तीचा मार्ग समजणें, हें ज्यास्त सुलभ होतें. अर्थात् सामान्य लोकांनीं हाच मार्ग धरला. पण पुढें पुढें या धारणींची जुनी भाषा कठिणशी झाली, तेव्हां ज्यांचा अर्थ कळत नाहीं असे लांब लांब पाठ म्हणण्याचा लोकां कंटाळा येऊ लागला. तेव्हां अशा लोकांसाठीं होमिओप्याथिक पाठ अथवा मंत्र तयार झाले मंत्र म्हणण्याला सोपे वाटू लागतांच तिकडेच बहुतेक आम समाजाची प्रवृत्ति झाली, आणि अशा रीतीनें मंत्रयान हा एक तिसरा पंथ महायानांतून निर्माण झाला. हा ७ व्या शतकाच्या नंतर कित्येक वर्षे चांगला उत्कर्षावस्थेत होता. नंतर कोहीं कायानें हाही मार्ग पडून वज्रयान म्हणून एक नवाच पंथ उदयास आला.

महायान पंथाच्या मताप्रमाणें परम श्रेष्ठ प्रतीचें ज्ञान ( ज्याला वेदांती परा-विद्या अशी संज्ञा देतात तें ) मिळवू इच्छिणारा मनुष्याचा आत्मा या ऐहिक पसारापासून अलिप्त होऊन प्रथम कामलोकास, नंतर रूपलोकास व त्या-नंतर अरूपलोकास यांप्रमाणें क्रमानें वाढत चढत जातो, व अखेरीस त्याला

निर्वाणप्राप्ति होते. या निर्वाणाच्या स्वरूपाचें आकलन सामान्य बुद्धीला करतां येत नाही. म्हणून वज्रयान पंथांत त्याला मूर्तस्वरूप देण्यांत आलें व त्या स्वरूपाला 'निरात्मा देवी' असें नांव मिळून तिची स्थापना अरूप लोकामध्यें झाली. या लोकापर्यंत चढत येणारें मन निरात्मा देवीच्या आलिंगनानें परम सुखाचा प्रत्यक्ष अनुभव घेऊं लागतें व त्या सुखांतच निरंतर निमग्न होऊन लय पावतें, असें एक नवें मत प्रस्थापित झालें. यालाच वज्रयान म्हणतात. या मतांतला लोकांवर मोहिनी घालणारा भाग म्हणजे निरात्मा देवीच्या संगतींत अक्षय व निरुपम अशा सुखप्राप्तीची आशा, हा होता.

याप्रमाणें सिद्धार्थ गौतमबुद्ध यानें तत्त्वविचाराच्या उच्च पदावर नेऊन बसविलेला बौद्धधर्म एकेक पायरी खालीं येत येत सुखाभिलाषाच्या नीचतम पायरीपर्यंत येऊन पोंचला. पण त्याला अजून खालीं यावयाचें होतें. याच्या खालची पायरी म्हणजे कालचक्रयान ही होय. कालचक्र म्हणजे नाशरूपी चक्र. त्यापासून संरक्षण करून घेण्याचा उपाय ज्यांत सांगितला आहे असा पंथ तो कालचक्रयान. हा उपाय कोणता ? तर भूत, प्रेत, पिशाच इ०ची पूजा या पंथाचा मुख्य गुरु जगद्दल विहारांत राहणारा विभूतिचंद्र नांवाचा एक पुरुष होता बौद्ध धर्माच्या अधोगतीचा इतिहास असा मोठा गमतीचा आहे असो

या अधोगतीच्या चक्रांत गोते खात असतां बौद्धधर्मानें आणखी पुष्कळपंथ आपणांत सामील करून घेतले. त्यांतला एक पंथ म्हणजे नाथपंथ हा होय. हा योगसाधन करणारांचा एक निकृष्ट पंथ होता. बुद्ध किंवा पतंजली यांचा मार्गही योगमार्गच होता. म्हणजे चित्तवृत्ति कांहीं एका साध्याच्या केंद्राच्या ठायीं लावणें हाच त्यांचा उद्देश होता पण बुद्ध व पतंजली यांचें ध्येय उच्च-निर्वाण किंवा मोक्ष-हें होतें. नाथपंथी लोकांचें ध्येय म्हणजे ऐहिक सिद्धीची प्राप्ति हें होतें; आणि यासाठीं श्वासाचा निरोध करून मूलाधारापासून श्वास वर चढवीत चढवीत कपाळांत नेणें हा त्या सिद्धिप्राप्तीचा उपाय नाथपंथांत सांगितलेला होता. या पंथाचा प्रवर्तक मत्स्येंद्रनाथ हा होता. याला मच्छगणपाद असेंही म्हणतात. हा अवलोकितेश्वराचा अवतार आहे, अशी लोकांची समजूत होती. ही समजूत नेपाळांतल्या पुष्कळ बौद्धांची अजूनही आहे, व ते त्याचा मोठा

साधव दरसाल करीत असतात मत्स्येंद्रनाथ बौद्धधर्मी नव्हता पण त्याच्या शिष्यवर्गात अनेक बौद्धधर्मी लोक होते. त्यांतलाच गोरक्षनाथ हा एक होता. याचें मूळचें नांव रमणवज्र हें होतें. हा वज्रयान पथाचा होता. पुढें तो नाथ-संप्रदायास जाऊन मिळाल्यावर त्यानें पूर्वीचें नांव टाकून गोरक्षनाथ हें नवें नांव धारण केलें

याशिवाय सहजिय नावाचा आणखी एक पंथ ९ व्या शतकांत निघाला होता. विषयसुखाचा उपभोग हा मोक्षप्राप्तीचा सुलभ मार्ग आहे असें या पंथाचें मत होतें. या पंथाचें वज्रयानाशीं बरेंच साद्दश्य होतें. म्हणून तो वज्रयानांत प्रविष्ट झाला या पंथाचा मुख्य गुरु कृष्णाचार्य ऊर्फ कान्हु हा होता तिबेटांतले लोक याची अद्याप पूजा करीत असतात या सहजिय पंथांत मोक्षप्राप्तीचे तीन मार्ग होते–१ अवधूति मार्ग, २ चाण्डाली मार्ग व ३ डोंबी मार्ग विस्तारभयास्तव या तीन मार्गांचें विवेचन येथ करीत नाहीं

वर सांगितलेल्या पथांखेरीज आणखी एक तान्त्रिकाचा पथ होता यांत शक्तीची पूजा मुख्य होती पचवीस वर्षांपूर्वी पुष्कळ विद्वानांची अशी समजूत होती कीं, तंत्र किंवा शाक्तपथ ब्राह्मणधर्मांतर्गत असून त्यापासून बौद्धधर्मानें तो घेतला. पण पुढें ही समजूत खोटी ठरली, आणि ब्राह्मणधर्म व बौद्धधर्म या दोहोंहूनही तो अगदीं भिन्न असून स्वतंत्र असा एक पथ होता, असें सिद्ध झालें त्या शाक्तपथानें बगाल्यांतल्या पुष्कळ बौद्धांना आपल्यांत ओढलें. शाक्तपंथाला जाऊन मिळालेले हे बौद्ध स्वत ला अद्याप बौद्ध म्हणवीत पण आचरण मात्र शाक्तपथाचें करीत. अशा लोकांची संख्या बरीच मोठी होती होता होता हाही पंथ बौद्धधर्मांत प्रविष्ट झाला.

पुढें १२ व्या शतकांत मुसलमान लोकांच्या स्वाऱ्या या हिंदुस्थानावर होऊं लागल्या हे मुसलमान ब्राह्मणीधर्म व बौद्धधर्म यांच्यामध्यें भेद न मानतां दोघांनाही सरसकट हिंदु म्हणू लागले. बौद्धांना आपणांत मिसळून घेण्याच्या ब्राह्मणी धर्माच्या लोकांच्या उद्योगाला यामुळें पुष्कळच उत्तेजन मिळालें, आणि कांहीं दिवसांनीं त्या दोन्ही धर्मांचें पूर्ण ऐक्य होऊन बौद्धधर्माचें विशेषत्व नष्ट झालें.

याप्रमाणें

याप्रमाणें बौद्धधर्माचा ऱ्हास होऊं लागल्यापासून तीन चार शतकांच्या आंत बौद्धधर्माचा हिंदुस्थानांत पूर्णपणें लोप झाला. कुमारिल भट किंवा श्री शंकराचार्य यांनीं बौद्धधर्माला हिंदुस्थानाबाहेर घालवून दिलें अशी जी सार्वत्रिक समजूत आहे, तिचा अर्थ इतकाच घ्यावयाचा कीं त्यांच्या वेळेपासून बौद्धधर्म निरनिराळ्या रूपानें ब्राह्मणी धर्मांत अंतर्भूत होऊं लागला आणि क्रमक्रमानें त्याचें विशिष्ट स्वरूप लोप पावूं लागलें. या अंतर्भावाचीं चिन्हें अद्यापही हिंदुधर्मांत सूक्ष्म दृष्टीनें पाहणारास दिसून येतात. जगन्नाथपुरी येथें यात्रेकरू जातिभेद न मानतां किंवा स्पर्शास्पर्शाचा विचार न करतां शिजविलेला भात देवाचा प्रसाद म्हणून भक्तियुक्त अंतःकरणानें सेवन करतात. तसेंच दक्षिणेंत

---

१ श्रीक्षेत्रजगन्नाथ हें मूळचें बौद्धस्थान होतें, असें म्हणण्याला पुष्कळ प्रमाणें आहेत. जगन्नाथ हा देवता विष्णूचा बौद्धावतार म्हणून लोक समजतात. दशावतारांचा जो चित्रपट मिळतो त्यांत बौद्धावताराच्या जागीं जगन्नाथाचें चित्र असतें. जगन्नाथक्षेत्रांतल्या त्रिमूर्ति, तेथील रथोत्सव व विष्णुपंजर हे उघड उघड बौद्ध धर्माचे अवशेष आहेत. चिनी प्रवासी ह्युएन संग हा पर्वतांच्या बाजूस चरित्रपुर नामक एका बंदरीं गेला होता, तेथें त्यानें पांच बौद्धस्तूप पाहिले. त्या पांचां पैकीं जगन्नाथाचें मंदिर हा एक स्तूप असावा, असें जनरल कनिंगहाम यांचें मत आहे. स्तूपांत बुद्धाचे अस्थि व केश असतात. त्यांचेंच रूपांतर विष्णुपंजर यांत झालें असावें. फा ह्यान हा प्रवासी हिंदुस्थानांत आला, यापूर्वी त्यानें तातरी देशांत खोतान येथें बौद्धांचा महोत्सव पाहिला होता. त्या उत्सवांत रथाची मिरवणूक सुरू होती. त्या रथांत मधोमध बुद्धाची मूर्ति व दोन्ही बाजूस दुसऱ्या दोन मूर्ति होत्या. जगन्नाथक्षेत्रांतला रथ सर्व सुप्रसिद्धच आहे. या उत्सवांतल्या रथावरही तीनच मूर्ति, जगन्नाथ व दोन्ही बाजूस बलराम व सुभद्रा, अशा असतात. बौद्धांच्या तीन मूर्ति बुद्ध, धर्म आणि संघ यांच्या वाचक आहेत. बौद्ध लोक 'धर्मा'ला स्त्रीरूप मानतात. नेपाळांत या धर्ममूर्तीनें 'प्रज्ञापारमिता देवी' हें नांव धारण केलें, व तीच जगन्नाथपुरी येथें सुभद्रा झाली असावी. बौद्धग्रंथांत बुद्धाच्या पायावर चक्र होतें असें वर्णन आहे व बौद्ध लोक या चक्रचिन्हाची भाविकपणें पूजा करतात. बौद्ध मंदि

पंढरपूर येथें जाणारे यात्रेकरू जातिभेद न पाळतां सर्व वारकऱ्यांना ते कोणत्याही जातीचे असले तरी पूज्य समजून परस्परांच्या पायां पडतात; व गोपाळकाल्यांत बंधुभावानें सामील होऊन स्पर्शास्पर्शाचा विचार न करतां प्रसाद ग्रहण करतात हा बंधुभाव बौद्धधर्मातल्या विश्वमैत्रीचाच शेष आहे, असें विचारी मनुष्यास आढळून येईल ओरिसा प्रांतांत धर्ममंगल म्हणून जो पंथ आहे तो बौद्धधर्माचाच अवशेष आहे, असें महान् पंडित हरप्रसादशास्त्री यांचें मत आहे

ही उत्तरहिंदुस्थानाची गोष्ट झाली दक्षिणहिंदुस्थानच्या इतिहासाची माहिती विशेषशी नसल्यामुळें तिकडे बौद्धधर्माचा प्रसार कितीसा झाला, व त्याचीं कोणकोणतीं स्थित्यंतरें झालीं, याची साग्र हकीकत देतां येत नाहीं, ही खेदाची गोष्ट आहे तथापि एवढी गोष्ट खरी की, महिंद व संघमित्रा यांनीं बोधिवृक्षाची (बौद्धधर्माची) जी शाखा सिंहलद्वीपांत नेली, तिच्या पारंब्या कालांतरानें दक्षिणहिंदुस्थानांत जागोजाग पसरत गेल्या होत्या हिंदुस्थान देशाच्या या भागांत उत्तरेकडून अशोकराजानें पाठविलेल्या धर्मप्रचारकांकडून व दक्षिणेकडून सिंहलद्वीपचा राजा तिष्य यानें पाठविलेल्या धर्मप्रचारकांमार्फत अशा दोन्ही

रावर हें चक्र खोदलेलें असतें, त्याला ते साष्टांग नमस्कार घालतात जगन्नाथ येथें या चक्राला विष्णूचें सुदर्शनचक्र मानून लोक त्याची पूजा करतात विष्णूचीं मंदिरें हिंदुस्थानांत जागोजाग आहेत पण दुसऱ्या कोणत्याही विष्णुमंदिरांत हें सुदर्शनचक्र दिसत नाहीं अशा अनेक प्रमाणांवरून जगन्नाथ हें हिंदूंचें क्षेत्र मूळचें बौद्धांचें होतें व तेथें जातिभेदाला जो फाटा मिळाला आहे, तो बौद्ध धर्मातल्या जातिभेदनिषेधाचा अवशेष आहे, असें डा राजेंद्रलाल मित्र यांचें मत आहे व तें खरें दिसतें पंढरपूरचाही कांहीं असाच प्रकार आहे तेथील विठोबाची मूर्ति व शिखरावर खोदलेल्या बौद्धमूर्ति यांच्या स्वरूपावरून हें दृश्य व विठोबा-रखुमाई यांचीं पृथक् पृथक् मंदिरें, आणि गोपाळकाल्याचे वेळीं जातिभेदतत्त्वाला मिळणारा फाटा, या गोष्टी ब्राह्मणधर्माच्या सांप्रदायिक पद्धतीला सोडून आहेत यावरून तेथील क्षेत्र मूळचें बौद्धांचें असावें व बौद्धधर्माचा ह्रास झाल्यावर ब्राह्मणधर्मानें त्या मूळच्या बौद्धपद्धतीचा आपल्यांत संनिवेश करून घेतला असावा, असें दिसतें

बाजूनें त्या धर्माचा प्रसार झाला. या गोष्टीला पुरावा प्रसिद्ध चिनी प्रवासी फा-हयान याच्या प्रवासवृत्तांतांत आहे ह्युएन-त्संग याच्याही प्रवासवर्णनांत या गोष्टींचा उल्लेख आहे ह्युएन हा इ. स. ६४० च्या सुमारास कांजीवरम् येथें गेला होता. त्या वेळीं तेथें अनेक बौद्धस्तूप त्यानें पाहिले. इतकेंच नाहीं, तर पाण्ड्य देशांत ब्राह्मणीधर्माच्या बरोबरीनें बौद्धधर्माची छाप लोकांवर असलेली त्याच्या दृष्टीस पडली

चोल आणि पल्लव देशांत मात्र बौद्ध स्तूप वगैरे कोठें आढळले नाहींत तथापि मणिमेखला नांवाच्या तामिळ काव्यांत चोलांची प्राचीन राजधानी कावेरीपट्टनम् येथील बौद्ध विहाराचें वर्णन आहे. त्याचप्रमाणें तोंडमन्नार किल्लि आणि दुणार्विल किल्लि या दोन राजांनीं बौद्ध चैत्य बांधिले, असेंही त्या काव्यांत म्हटलें आहे

याशिवाय अमरावती (धान्यकटक) येथें पूर्वशिलासंघाराम आणि अपर शिलासंघाराम अशा नांवाचे दोन मोठे व इतर अनेक मठ होते

शातवाहन कुळांतले राजे इ. सनापूर्वीच्या दुसऱ्या शतकांत बौद्धधर्माचे मोठे पुरस्कर्ते होऊन गेले त्यांचें राज्य धान्यकटक, चितळदुर्ग, शिमोगा, कोल्हापूर, पैठण वगैरे दूरदूरच्या ठिकाणीं निरनिराळ्या दिशांस पसरलें होतें त्या त्या ठिकाणीं अद्याप त्या काळचे बौद्धशिलालेख व नाणीं सांपडतात. यावरून बौद्धधर्माचा प्रसार या राजाच्या काळीं दक्षिणेंत बऱ्याच भागांत झाला होता असें दिसतें.

मौर्य राजा अशोक व सिंहलद्वीपचा राजा तिष्य यांच्या प्रयत्नांशिवाय आणखी एक कारण बौद्धधर्माचा दक्षिणेंत प्रसार होण्यास झालें हें कारण म्हणजे पल्लव व गुप्त वंशांचें दक्षिणेंत आगमन हें होय. पल्लववंशाचे आरंभाचे राजे तरी निर्विवाद बौद्धधर्मी होते त्यांच्या वंशांतली एक कन्या चोल राजांपैकीं एकाला दिली होती आणि तो कांची येथें बौद्धभिक्षूपाशीं बसून त्यांचीं धर्मविषयक प्रवचनें ऐकत असे, अशा कथा तत्कालीन वाङ्मयांतून आढळतात चोल व पाण्ड्य या दोन्ही घराण्यांत अनेक बौद्धधर्मी राजे झाले असावेत, हें या व इतर प्रमाणांवरून बरेंच संभवनीय दिसतें.

पण बौद्धधर्माबरोबरच जैनधर्महि या काळीं दक्षिणेंत पुष्कळ प्रचलित होता, आणि दक्षिण हिंदुस्थानांत बौद्धधर्माचा प्रसार होण्याला पहिला प्रतिबंध जैनधर्मानें आठव्या किंवा नवव्या शतकाच्या सुमारास केला असावा, असें संस्कृत व तामिल वाङ्मयावरून अनेक पंडितांनी निश्चित केलें आहे. सामंतभद्र व अकलङ्क देव हे जैनांचे प्रमुख आचार्य या काळीं होते व त्यांचे तोडीचे कोणी विद्वान् बौद्ध आचार्य त्यांच्याशीं वाद करण्यास नसल्यामुळें त्यांनीं वाग्युद्धांत बौद्धांवर सहज विजय संपादिला. याप्रमाणें बौद्धधर्माचें पाऊल मागें पडण्यास सुरुवात झाली. पुढें कालांतरानें शैव व वैष्णव या पंथाचा उत्कर्ष होऊन त्याच्या आघातानें अगोदरच डळमळीत व जीर्ण झालेली बौद्धधर्माची इमारत हां हां म्हणतां कोसळून खालीं बसली! शैवाचार्यांत नानसंबंध, तिरुनावक्करासु आप्पर आणि सुंदर हे तिघे आचार्य बौद्धांशीं वाद करण्यांत प्रमुख होते, तसे वैष्णवांत नम्माळ्वार, मधुकर कवि आणि तिरुमङ्गइ हे तिघे धर्मवीर प्रसिद्ध होते. याशिवाय प्रसिद्ध अद्वैतमतप्रस्थापक शंकराचार्य आणि माणिक्यवाचंगर यांनीं बौद्धधर्माचा उच्छेद करण्याची मोठीच कामगिरी बजाविली, अशा दंतकथा प्रचलित आहेत.

ज्याप्रमाणें उत्तरहिंदुस्थानांत त्याचप्रमाणें दक्षिणेंत ही प्रतिस्पर्ध्यांच्या श्रेष्ठत्वापेक्षा बौद्धांची स्वतःची अवनतावस्था व दुराचार हींच त्यांच्या अपकर्षाला विशेषतः कारण झालीं असें म्हटलें पाहिजे. भिन्नभिन्न संप्रदाय व आचार यांच्याशीं बौद्धांचा संसर्ग घडून आल्यामुळें त्या त्या संप्रदायांच्या मतांची व

१ नानसंबंध याचा कटाक्ष बौद्धांपेक्षां जैनांवरच विशेष असावा, असें दिसतें कारण पांड्य राजा सुंदरपांड्य हा जैनधर्मी होता. यानें जैनमताचा त्याग करण्याला नानसंबंध हा मुख्य कारण झाला.

२ हा पांड्य राजाचा मुख्य प्रधान होता. यानें चिदंबरम् येथें बौद्धांशीं जंगी वाद करून त्यांना पराभूत केलें अशी दंतकथा आहे. या वादासाठीं बौद्धांनीं सिंहलद्वीपांतून मोठमोठे नामांकित आचार्य आणिले होते. पण त्यांचें माणिक्यवाचगर याच्यापुढें तेज पडलें नाहीं.

आचारांची छाया बौद्धमतावर व आचारावर पडली. बौद्धधर्ममतांत झालेलें हें रिंगयंतर क्रियेकांना अनिष्ट वाटून ते उघडपणें याकाच्यांचा निषेध करूं लागल्यामुळें बौद्धांच्या संघांत दुफळी झाली. पैकीं क्रियकांनीं तत्कालीन राजांचा आश्रय केला. धर्ममताचा व आचरणाची शुद्धता हळू हळू नष्ट झाला. बौद्धधर्माचा प्रसार करणाराचें लक्ष आपल्या धर्मांत येणारांच्या आचरणाकडे राहावयास पाहिजे होतें, तसें राहिलें नाहीं. बौद्धभिक्षूंत विचार व आचार यांच्यांत छत्तिसाचा आंकडा अनेक प्रसंगीं दिसून आल्यामुळें त्या धर्मांविषयीं चा लोकांची श्रद्धा नष्ट झाली. अशा अनेक कारणांनीं पुढें पुढें लोकांना बौद्ध धर्मापेक्षा नवीन उदय पावत असलेला हिंदुधर्मच श्रेष्ठ व मोहक वाटू लागला. शेवटीं आपलें कांहीं चालत नाहीं असें पाहून बौद्धधर्माविषयीं अर्धवट श्रद्धा असलले लोक हळू हळू स्वतः स हिंदुधर्मांत प्रविष्ट करून घेऊं लागले. आणि असें होतां होतां ९ व्या शतकानंतर थेड्याच काळांत बौद्धधर्माचा दक्षिणेंत पूर्णपणें लोप झाला.

बौद्धधर्माचा हिंदुस्थानांत लोप होण्याचा असा हा मोठा घोटाळ्याचा पण मनोरंजक व बोधप्रद इतिहास आहे. या इतिहासाचा सूक्ष्मदृष्टीनें विचार करणारास असें दिसून येईल की बौद्धधर्माच्या लोपाविषयीं सामान्य लोकां मध्यें ज्या समजुती पसरलेल्या आहेत त्या भ्रामक आहेत. बौद्धधर्म कुमारिल भट्टाच्या किंवा शंकराचार्यांच्या प्रयत्नांनीं नष्ट झाला नाहीं किंवा त्याचा हिंदु स्थानांतून उच्चाटनहाही झाला नाहीं. ब्राह्मणधर्मीयांनीं त्याचा विशेषसा छळही केला नाहीं, किंवा युक्तिवादांत हरून त्यानें आपलें पाऊल मागें घेतलें असेंही घडलें नाहीं. त्याच्या लोपाचीं अनेक कारणें आहेत. पैकीं कांहीं बाह्य व कांहीं अंतस्थ आहेत. या कारणांचा आतां आपण विचार करूं. पण ह्यां सर्वांत तीन चार कारणें प्रमुख आहेत तीं येणेंप्रमाणें —

पहिलें बाह्य कारण मुसलमानांचा अत्याचार. मुसलमान लोक आले होते ते त्यांना धनलाभापुढें कशाचीही मातब्बरी वाटत नव्हती. धर्म आणि भूतदया या गोष्टी त्यांच्या गांवींही नव्हत्या. अरबस्थानासारख्या रुक्ष देशांतून

आलेल्या या आइदाद ओकांच्या हातांत असलेल्या कोलीतीनें हिंदुस्थानांतल्या बौद्धधर्माच्या भव्य आणि मनोहर इमारतीस आग लावून तिचा नाश केला. मुसलमान जेते हिंदुस्थानांत आले, त्यापूर्वींच बुद्ध व त्याचा धर्म यांच्याशीं त्यांचा परिचय झाला होता. कारण त्या वेळीं बौद्धधर्माचा प्रसार हिंदुस्थानाबाहेर मध्यएशिया व काबूल, कंदाहार वगैरे देशांतून झालेला होता आणि हिंदुस्थानांत आल्यावरही त्यांना जिकडे तिकडे बुद्धाचें नांव ऐकू येऊ लागलें, व बौद्ध चैत्य, मठ व विहार दिसू लागले बौद्धधर्माच्या उत्कर्षाचा काळ जरी मागेंच निघून गेलेला होता, तरी अद्यापपर्यंत त्याचा गौरव बराच मोठा व मुसलमानांच्या डोळ्यांस येण्यासारखा होता. यापूर्वीं मध्यएशियांत त्यांनीं बौद्धमंदिरांचा उच्छेद करून त्यांच्या जागा मशिदी बांधिल्या होत्या. तोच क्रम त्यांनीं हिंदुस्थानांत आल्यावरही कायम ठेविला. गिझनीचा महमद हा नुसता धनलोभी नव्हता, तर धर्मांधही होता. त्यामुळें त्यानें बौद्धमंदिरें जेथें जेथें आढळलीं तेथें तेथें त्यांचा नाश केला. हें नाशाचें काम महमुदाच्या मागून बख्त्यार खिलजी यानें अधिक आवेशानें केलें गंगेच्या उत्तरतीरावर विक्रमशिला नांवाचें योगाचार-बौद्धसंप्रदायाचें मुख्य स्थान होतें. या ठिकाणीं एक अप्रतिम बौद्ध विश्वविद्यालय व अनेक विहार होते. त्यांचा नाश बख्त्यार खिलजीच्या वेळेस झाला. त्याच्यापूर्वीं म्हणजे ८ व्या शतकाच्या अखेरीस नालंदा येथील जगी विश्वविद्यालय असाच रीतीनें मुसलमानांकडून नाश पावलें होतें बख्त्यार खिलजीचे मागून अल्लाउद्दिन खिलजी यानेंही तेंच नाशाचें व्रत पुढें चालविलें होतें. याप्रमाणें मुसलमान लोक बौद्धांच्या मागें एकसारखे हात धुऊन लागल्यामुळें व बौद्धांना ब्राह्मणी राजांपैकीं कोणाचाही पाठिंबा न मिळाल्यामुळें त्यांचा या वेळीं सर्वस्वीं नाश झाला. लोकशों चैत्य व विहार यांचा ध्वंस झाला अनेक महत्त्वाचे ग्रंथ अग्नीच्या भक्ष्यस्थानीं पडले व पुष्कळ नामांकित बौद्धपंडितांना देशत्याग करावा लागला. कुमारिलभट्ट व शंकराचार्य यांच्या विरोधाला त्यांनीं विशेषसें जुमानिलें नाहीं, पण मुसलमानांच्या या अत्याचारांपुढें मात्र त्यांचा टिकाव निघेना अनेक बौद्ध या वेळीं अशरण होऊन मुसलमानांच्या जुलमाला बळी पडले व बौद्धधर्माचा त्याग करून मुस-

ग्रंथकारांनीं बौद्धधर्मावर प्रखर टीकास्त्र चालविलें होतें व तें चालवितांना किलेक प्रसंगी अन्यायमार्गानेंही अवलंबन त्यांचे हातून घडलें किलेक ग्रंथकारांनीं निष्कारण त्या धर्माची निंदा करून लोकांची मनें कलुषित करून टेविलीं किलेकांनीं त्या धर्माचा छळ करण्याचे कामीं राजदंडाचाही उपयोग केला. अशीं उदाहरणें फार थोडीं घडलीं एकदरीत ब्राह्मणधर्मी ग्रंथकारांची वृत्ति उदारपणाचीच होती याचा परिणाम असा झाला कीं, बौद्धधर्मीयांत खरी तेजस्विता उरली नाहीं. घर्षणानें उष्णता उत्पन्न होत असते तसें घर्षणच फारसें न घडल्यामुळें उष्णतेपासून स्फुलिंगाची प्राप्तिही अर्थात् घडली नाहीं शीलवान् व कर्तृत्ववान् माणसेंहीं शान्ततेच्या कालापेक्षां संकटकालींच अधिक निर्माण होतात पण तो संकटकाळ ब्राह्मणधर्मीयांच्या उदारवृत्तीमुळें बौद्धधर्मावर फारसा कधीं आलाच नाहीं यामुळें अशा कर्तृत्ववान् व शीलवान् नायकांच्या अगत्त्या गुणांचा जो लाभ बौद्धधर्माला एरव्हीं मिळाला असता, त्याला तो धर्म मुकला त्यामुळें त्याची अवनति एकदां जी सुरू झाली ती एकसारखी तशीच होत राहिली तिची लाट परत फिरविण्या रा प्रभमनाच्या अभावामुळें बौद्धधर्माचा ऱ्हास त्वरेनें होत गेला.

वर ज्या ब्राह्मणधर्मी टीकाकारांचा उल्लेख करण्यांत आला आहे, त्यांच्या संबंधानें दोन शब्द येथें सांगणें जरूर आहे सहाव्या शतकांत झालेला न्यायवार्तिकाचा कर्ता प्रसिद्ध पंडित उद्योतकराचार्य हा या टीकाकारांत प्रमुखापैकीं होता हा मोठा नैयायिक होता

यदक्षपादः प्रवरो मुनीनां । शमाय शास्त्रं जगतो जगाद ।
कुतार्किकध्वान्तनिरासहेतोः । करिष्यते तत्र मया निबंधः ॥१॥

अशी प्रतिज्ञा करून त्यानें न्यायवार्तिकाची रचना केली याच्या लेखांत ओजस्वितेचा गुण विशेष होता त्यामुळें त्याच्या टीकेचा लोकांच्या मनावर बराच परिणाम झाला.

पुढें सातव्या शतकांत कुमारिलभट्ट दक्षिणेंत अवतीर्ण झाले त्यांचा मीमांसावार्तिक ग्रंथ सुप्रसिद्ध आहे यांनेंही बौद्धमतखंडनाचे कामीं असामान्य

नैपुण्य दाखविलें. माधवाचार्यांच्या शंकरविजयांत म्हटलें आहे कीं, पूर्वी पौराणिक युगांत ज्याप्रमाणें स्वामी कार्तिकेयानें असुरकुलाचा उच्छेद केला, त्याप्रमाणें वैदिककर्मपराङ्मुख बौद्धांचा उच्छेद करण्यासाठीं कुमारिलभट्टाचा अवतार झाला होता व तें अवतारकृत्य उत्तम रीतीनें तडीस गेलें. हा कुमारिलभट्ट प्रथम एका बौद्धगुरूजवळ शिष्यत्वानें राहून बौद्धमत शिकला व मग आपल्या गुरूशीं व गुरुबंधूंशीं वाद करून त्यांचा त्यानें पराभव केला. पुढें आठव्या शतकांत शंकराचार्य झाले. यांच्या कित्येक मतांत व बौद्धमतांत पुष्कळ साम्य होतें. अद्वैतमताचा पायाभूत जो मायावाद तो तर त्यांनीं बौद्धांपासून घेतला, अशी पूर्वीच्या लोकांची समजूत होती, व म्हणून आचार्यांना 'प्रच्छन्न बौद्ध" असें कित्येक ठिकाणीं म्हटलें आहे. तथापि बाह्यार्थवाद, विज्ञानवाद, शून्यवाद असीं परस्पर विरुद्ध मतें निर्माण केल्याबद्दल त्यांनीं आपल्या ग्रंथांत बुद्धाला जागोजाग दूषणें दिलीं आहेत व 'असंबद्धप्रलापी' म्हटलें आहे. मनुष्यांना मूढ करून त्यांना धर्मबाह्य मार्गाला नेण्यासाठीं बुद्ध अवतीर्ण झाला व त्यासाठींच त्यानें अशीं परस्पर विरुद्ध मतें निर्माण केलीं, असें त्यांनीं एके जागीं म्हटलें आहे. वस्तुतः शंकराचार्यांनीं केलेला हा आरोप खऱ्या बुद्धमतापेक्षां बुद्धाच्या मागून निर्माण झालेल्या अनेक बौद्धपंथांच्या मतांना यथार्थ रीतीनें लागू होता. तथापि आचार्यांना या सर्व वादांचें कर्तृत्व खुद्द गौतमबुद्धाच्या माथीं मारून त्यालाच असंबद्धप्रलापी ठरविलें. हा अर्थात् त्यांचा भ्रम होता. हा भ्रम त्यांच्या पथ्यावर पडला. कारण या मूळ बुद्धालाच असंबद्धप्रलापी ठरविल्यानें बौद्धधर्माचें मूळच दूषित आहे, असें त्यांना मानिक लोकांस सांगतां आलें, व त्यामुळें बौद्धधर्मापासून लोकांना पराङ्मुख करण्याचें त्यांचें कार्य सुलभकर झालें. शंकराचार्यांनीं बौद्धांवर विजय कशा रीतीनें मिळविला याविषयींच्या ज्या दंतकथा प्रचलित आहेत, त्या जर खऱ्या मानिल्या तर तत्कालीन लोकांची अंधश्रद्धा व मताच्या सत्यत्वाविषयींची कसोटी यांची मोठी गंमत वाटते. असें सांगतात कीं, आचार्य दिग्विजयास निघत तेव्हां त्यांचेबरोबर एक मोठी लोखंडाची कढई असे. वादाच्या वेळीं ती कढईंत तापलेल्या तेलानें भरून ठेवीत आणि वाद न देणारा झाला म्हणजे

त्या तेलांत बुडी मारून दिव्य करण्याची सूचना करीत शंकरभक्त म्हणतात कीं, या दिव्यांत ईश्वरप्रसादानें आचार्य नेहमी यशस्वी होत. दुसरे कित्येक म्हणतात कीं, व दांत हरलेल्या बौद्धांना या तप्ततैलपूर्ण कटाहांत टाकून आचार्य त्यांना मोक्ष देत तिबेटांत 'शंकरकटाह' नांवाचें स्थान आहे तेथें ही कढई अद्याप दाखवितात ही तेथें कशी आली या विषयींची दंतकथा अशी आहे कीं, आचार्य दिग्विजय करीत करीत तिबेटांत गेले तेथें तांत्रिक संप्रदायी लोकांशी त्यांचा बराच वाद झाला. अखेर आचार्यांचा शिष्य आनंदगिरि त्यांना म्हणाला. "भगवन्, आतां अधिक वादाचें कारण नाहीं, आणि आपण अखिल भरतखंड जिंकलेंच आहे, तेव्हां पुढें जाण्याचेंही आपणांस कारण नाहीं. तेव्हां आपल्या दिग्विजयाची खूण म्हणून या कटाहाची येथेंच स्थापना करावी." त्याप्रमाणें आचार्यांना ती कढई तेथेंच ठेविली. याच्या उलट तिबेटी लामांत अशी दंतकथा प्रचलित आहे कीं, वादांत आचार्यांचा पराभव झाल्यामुळें वादाच्या आरंभीं प्रतिज्ञा केल्याप्रमाणें त्यांना स्वतः सांच बरोबर आणिलेल्या कढईत देहत्याग करावा लागला' आचार्यांच्या मागून १० व्या शतकांत वाचस्पति मिश्र हा एक मोठा नैयायिक झाला. यानेंही बौद्धमतावर बरीच टीका केली. दिशा नैयायिक पद्धतीची होती. तो म्हणत असे कीं, वेद ईश्वरप्रणीत आहेत; अर्थात् ते प्रमाण मानलेच पाहिजेत बौद्धशास्त्र ईश्वरप्रणीत आहे, असें स्वतः बौद्ध म्हणत नाहींत, तें बुद्धानें केलें आहे, आणि बुद्ध कांहीं सर्वज्ञ नव्हता, अर्थात् तें प्रमाण मानतां येत नाहीं (न्यायवार्तिकटीका तात्पर्य २।१।६८) बाराव्या शतकांत उदयनाचार्य नांवाचा एक मिथिलदेशीय पंडित निर्माण झाला यानेंही बौद्धमताचें खंडण करण्याचा यत्न केला. आत्मतत्त्वविवेक अथवा बौद्धाधिकार या नांवाचा याचा एक स्वतंत्र ग्रंथ या विषयावर आहे. यांत क्षणभंगवाद व शून्यवाद या मतांचें खंडण करून आत्म्याचें अस्तित्व सिद्ध करण्याचा यत्न केलेला आहे, व न्यायकुसुमांजली ग्रंथांत निरीश्वरवादाचें खंडन केलेलें आहे यांच्याविषयीं अशी आख्यायिका आहे कीं, ईश्वराच्या अस्तित्वाविषयीं बौद्धाशीं वाद चालला असतां निकाल लागेना म्हणून तो एक बौद्ध व एक ब्राह्मण यांना घेऊन एका पर्वतशिखरावर गेला, व बोलतां बोलतां दोघांनाही त्यानें खालीं ढकलून दिलें.

पैकीं ब्राह्मण जिवत राहिला बौद्ध मात्र ठार मेला त्यावरून उदयन लोकांना म्हणाला, 'यावरूनच बघा ईश्वर आहे की नाहीं ?' तथापि बौद्धाला मारण्याचें पापाबद्दल त्याचें मन त्याला खाऊ लागलें. म्हणून तो प्रायश्चित करण्यासाठीं तीर्थयात्रेला निघाला तो जगन्नाथाला आला तेथें त्यानें तीन दिवस कडकडीत उपास केला जगन्नाथानें स्वत आपणास दर्शन देऊन पावन करून घ्यावें असा हट्ट धरून तो निश्चयानें देवाच्या द्वारीं बसला पण जगन्नाथानें दर्शन दिल नाहीं तिसरे रात्रीं देवानें स्वप्नात येऊन त्याला सांगितलें कीं, तू पापी आहेस, काशीस जाऊन तुषानलाचें प्रायश्चित्त घे, म्हणजे तुझ्या पापाचें क्षालन होऊन माझें दर्शन घडेल " तेव्हां संतापून त्यानें जगन्नाथाला उद्देशून म्हटलें—

ऐश्वर्यमदमत्त सन् मामवज्ञाय वर्तसे
पुनर्बौद्धे समायाते मदधीना तव स्थितिः।

लौकिकी भाषेत बोलावयाचें म्हणजे या श्लोकाचा अर्थ असा हे तो कीं, 'तू आपल्या ऐश्वर्याच्या घमेंडींत जाऊन माझा उपमर्द करतो आहेस पण चवारामजी, प्रभाकून राहा पुन बौद्ध डोकें वर काढतील तेव्हां तुझे पाय माझ्याशिवाय कोण टिकू देतो तें पाहीन ' उदयनाचार्यानंतर जयन्तस्वामी यानीं आपल्या न्यायमंजरी ग्रंथात बौद्धमताचें खंडन केलें या ग्रंथात ते बौद्धा विषयीं म्हणतात —

नास्त्यात्मा फलभोगमात्रमथ च स्वर्गाय चैत्यार्चनम्
संस्कारा क्षणिका युगस्थितिभृतश्चैते विहारा कृता ॥
सर्वं शून्यमिदं वसूनि गुरवे देहीति चादिश्यते
बौद्धाना चरितं किमन्यदियती दंभाय भूमि परा ॥

यानंतर बाराव्या शतकात रामानुजाचार्य व त्याचे मागून मध्वाचार्य, बहू आचार्य आणि सर्वदर्शनसंग्रहाचा कर्ता माधवाचार्य या सर्वांनीं आपापल्या बुद्धिप्रभावानुसार बौद्धमताचें खंडन केलें पण या सर्व टीकाकारांच्या टीकेचें एक स्वरूप विशेष लक्षांत घेण्यासारखें आहे या टीकाकारांची दांडगी विद्वत्ता, विशालबुद्धि, अप्रतिम वादकौशल्य व असा.

प्रचलित असलेल्या धर्मपद्धतीशी व आचारांशी सख्य केलें, कोठेंही विरोध केला नाहीं इतकेंच नाहीं, तर त्या धर्मांशीं व आचारांशीं समरूपत्व करण्यासाठीं त्यांचें स्वतःशीं मिश्रण होऊं दिलें. पूर्वी रोमन लोकांनीं दूरदूरचे प्रांत जिंकून आपलें साम्राज्य विस्तारलें, तेव्हां तेथील लोकांच्या रंजनार्थ त्या त्या देशच्या धर्मांचें व आचारांचें स्वतःशीं असेंच मिश्रण होऊं दिलें होतें. छप्पन देशांच्या देवांच्या मूर्ति त्या काळीं रोमन लोकांच्या देवाच्या प्रभावळींत समाविष्ट झाल्या होत्या. रोमन लोकांच्या धर्माला ग्लानि येण्याला व तो लोप पावण्याला हें एक मोठें कारण झालें होतें. तोच प्रकार बौद्ध धर्मासंबधानें झाला. वरील कारणामुळें बौद्धधर्माचें एक ठरीव स्वरूप राहिलें नाहीं. हिंदुस्थानांत त्याला हिंदुधर्माचें, नेपाळांत शैव व तांत्रिक धर्माचें, तिबेटांत पैशाचिक धर्माचें, अशीं निरनिराळीं स्वरूपें प्राप्त झालीं. एक स्वरूप न राहिल्यामुळें त्याच्या भक्तांत सहृति किंवा एकाचें बळ राहिलें नाहीं, आणि त्याच परमाणु विस्कळीत होऊं लागले. परमाणु विस्कळित झाल्यावर मग काय राहिलें ! बौद्ध धर्माचा डोलारा हां हां म्हणतां खालीं आला.

सहावें कारण—बौद्धविहारांना मिळालेला राजाश्रय व त्यामुळें भिक्षु व भिक्षुणी यांच्यांत उत्पन्न झालेली सुखलालसा. बुद्धानें संघाची स्थापना केली ती कोणत्या उद्देशानें तें मागें सांगितलेंच आहे. आपल्या मागें आपल्या धर्माचा प्रसार झाला पाहिजे, एतदर्थ प्रपंचाचा त्याग करून कडकडीत शुद्ध आचरण ठेवणारे, शीलवान्, व त्यागी, असे शिष्य मिळवून त्यांना सह कारित्वानें धर्मप्रचाराचें थोर कार्य करतां यावें, म्हणून बुद्धानें संघ व विहार यांची स्थापना केली, व अशा धर्मप्रचारकांना केवळ प्राणधारण व शरीर रक्षण यापुरता योगक्षेम भिक्षेवर चालविण्याचा नियम घालून दिला. भिक्षूंनीं लोभ धरावयाचा नाहीं व संग्रह करावयाचा नाहीं, असा त्याचा निर्बंध होता. पुढें अशोकासारख्या धर्मपरायण राजांनीही हे भिक्षुभिक्षुणींचे संघ धर्मप्रचाराचें पुण्यकर्म एकनिष्ठेनें करीत असलेले पाहून त्यांनीं हातीं घेतलेल्या पुण्यकृत्याला मदत करण्याच्या उदार उद्देशानें संघांना व मठांना नेमणुका करून दिल्या. त्यामुळें भिक्षूंना अन्नवस्त्र, व अध्ययन अध्यापनादि व्यासंग चालणारी साधनें

यासाठीं दारोदार भिक्षा मागण्याची अवश्यकता राहिली नाहीं, व धर्मप्रचाराचें व विद्याप्रसाराचें काम सुकर झालें. पण आरंभीं सदुद्देशानें आरंभिलेला उद्योग कधीं कधीं कालांतरानें अनपेक्षित तऱ्हेनें विफल होत असतो तसा प्रकार येथें झाला प्राणधारणासाठीं भिक्षा मागण्याची अवश्यकता दूर होतांच हळू हळू कष्टपराङ्मुखता भिक्षुवर्गात प्रथम दिसू लागली, आणि पुढें तिचीच परिणति सुखाच्या लालसेंत व लोभांत होऊन जे मठ पुण्याचरणाचीं पीठें होतीं तेच अनाचाराचे व व्यसनी लोकांचे अड्डे होऊन बसले. येथेंही रोमन इतिहासांतल्या एका प्रसंगाशीं या स्थितीचें पूर्ण सादृश्य दिसतें. कान्स्टंटाईन नांवाच्या धार्मिक बुद्धीच्या रोमन बादशहानें ख्रिस्ती साधूंचा योगक्षेम चालावा म्हणून त्यांच्या मठांना मोठाल्या नेमणुका करून दिल्या होत्या. त्यांचा परिणाम असा झाला की, त्यामुळें धर्माचरणाला उत्तेजन मिळावयाचें तें दूरच राहिलें, उलट लोभ, दांभिकता व अनाचार हीं वाढविण्यास मात्र तो राजाश्रय कारण झाला इतिहासांत घडलेली ही पुनरावृत्ति विचारणीय आहे

सातवें कारण—जातिभेद उडविण्याचा बौद्धधर्माचा यत्न जातिभेद न ठेवतां सर्वांना भिक्षूंच्या व भिक्षुणींच्या समांत घेण्याचा प्रघात गोतमबुद्धानें घातला, व अखेर तोच त्या धर्माच्या उच्छेदाला कारण झाला गोतमबुद्ध हा कपिल, गोतम, कणाद, पतंजलि यांप्रमाणें नुसता दर्शनप्रणेता असता व मग त्यानें आपल्या दर्शनांत निरीश्वरवाद, किंवा त्यासारखा कोणताही अप्रियवाद प्रतिपादिला असता, तरी लोक त्याला ब्राह्मणधर्मबाह्य समजले नसते. चार्वाक व कपिल यांप्रमाणें तोही एक हिंदु दार्शनिक म्हणून राहिला असता. पण त्यानें आपलें मत केवळ शाब्दिक स्वरूपांत न ठेवतां त्याला आचाराचें स्वरूप दिलें व जातिभेदासारख्या कित्येक शतकें चालत आलेल्या संस्थेवर एकदम जोराचा प्रहार केला, येथें घोडें बिघडलें. जोंपर्यंत नुसता तात्त्विक मतभेद असतो, तोंपर्यंत ब्राह्मणधर्माला सहिष्णुता अंगीं धारण करतां येते. पण विचाराची मर्यादा ओलांडून आचाराच्या क्षेत्रांत पाऊल टेकल्याबरोबर त्याचा क्रोध अनावर होतो त्याच्या दृष्टीनें विचाराला प्रायश्चित्ताची अपेक्षा नाहीं; पण आचाराला मात्र तें अवश्य

पाहिजे. नाहींतर समाजांत केव्हां उत्पात घडून येतील त्याचा नेम सांगतां येणार नाहीं व समाजाचें अस्तित्वच संदेहात्मक होईल. म्हणून ब्राह्मणधर्माचा जो कटाक्ष होता तो बौद्धदर्शनावर नव्हता, बौद्धनीतिसूत्रांवर नव्हता, बौद्ध-शास्त्रनियमांवरही नव्हता, तर जातिभेदासारख्या जुन्या संस्थेचें उन्मूलन करून टाकणाऱ्या संघावर विशेष होता. या संस्थेच्या रक्षणार्थ ब्राह्मणधर्मानें आटोकाट प्रयत्न केले. बौद्धांनीं वैदिक कर्मकांड नष्ट केलें, व यज्ञयागांतली पशुहिंसा बंद केली. या गोष्टीचा ब्राह्मणांना येवढा राग आलेला दिसला नाहीं; पण सर्व जातींच्या लोकांना संघाचें मुक्तद्वार ठेवून त्यांनीं ब्राह्मणधर्माला उघड उघड युद्धार्थ आव्हान केलें. बौद्धधर्म तरणाबांड व ब्राह्मणधर्म जीर्ण व शीर्ण अशी विषमता असतांही भीष्मार्जुनाच्या युद्धाप्रमाणें या युद्धांत ब्राह्मणधर्माची श्रेष्ठता अखेर स्थापित झाली, व जातिभेदाची संस्था नष्ट होईल अशी शंका वाटत होती, त्या ठिकाणीं ती संस्था नष्ट करूं पाहणाऱ्या बौद्धधर्माचाच लोप होऊन जातिभेदासारख्या हानिकारक संस्थेला उलट दीर्घायुष्याचा पट्टा मात्र अकल्पित रीतीनें प्राप्त झाला.

बौद्धधर्माचा हिंदुस्थानांत लोप होण्याला दुसरींही अनेक कारणें झालीं त्या सर्वांचा येथें उल्लेख करणें अशक्य आहे. यासंबंधानें ठाम मत देणेंही कठीण आहे. वर जी ठळक कारणें सांगितलीं आहेत त्यांच्यासंबंधानेंही तीव्र मतभेद होण्याचा किंबहुना कालांतरानें ज्यास्त सबळ पुरावा उघडकीला आल्यास त्या पुराव्यानें तीं खोटीं ठरण्याचाही संभव आहे. अनंत कालोदरांत कोणकोणत्या गोष्टी भरल्या आहेत तें कोणी सांगावें ! आतापर्यंत उपलब्ध झालेल्या ऐतिहासिक गोष्टींच्या आधारानें व सशास्त्र तर्कपद्धतीनें जीं अनुमानें साधारणपणें काढतां आलीं तीं वर निर्दिष्ट केलीं आहेत तीं निर्भ्रांत, निश्चित किंवा अढळ आहेत असें आग्रहपूर्वक प्रतिपादण्यास मी तयार नाहीं.

---

# प्रकरण १७ वें.

## हिंदुस्थानाबाहेर प्रसार.

[ बौद्धधर्माचा प्रसार—सीलोन, ब्रह्मदेश, पूर्वेकडील द्वीपकल्प, तिबेट, चीन, कोरिया, जपान, अमेरिका या देशांतून आढळणारी बौद्धधर्माची सद्य स्थिति. ]

हिंदुस्थानांत बौद्धधर्माचा प्रादुर्भाव कसा झाला, तो कसा पसरला व कसा लय पावला या विषयींचा वृत्तांत आतापर्यंत सांगितला. पण हिंदुस्थानाबाहेर सीलोन, सयाम, कंबोडिया, ब्रह्मदेश, चीन, जपान, कोरिया, तिबेट इ० देशांतून हा धर्म कसा प्रसार पावला व त्याचें आज तेथें काय स्वरूप आहे हें सांगितल्याशिवाय बौद्धधर्माचा इतिहास अपुरा राहील. म्हणून या प्रकरणांत या निरनिराळ्या देशांतल्या बौद्धधर्माविषयीं चार शब्द सांगण्याचें योजिलें आहे.

**सीलोन**—ज्या वेळीं हिंदुस्थानांत अशोक राजाचें साम्राज्य सुरु होतें, त्याच वेळीं सिंहलद्वीपांत तिष्य नांवाचा एक राजा राज्य करीत होता. अशोक राजाची कीर्ति ऐकून त्याच्याशीं आपली मैत्री असावी अशी इच्छा तिष्याचे मनांत उत्पन्न झाली व त्यानें आपला वकील सम्राट् अशोक याच्याकडे पाठविला. अशोकानेंही उलट आपला मुलगा महेंद्र याला सिंहलास पाठवून तिष्याविषयीं आपला आदर व्यक्त केला, व या महेंद्रानें तिष्याला बौद्धधर्माचा उपदेश केला. महेंद्राच्या मागून त्याची बहीण संघमित्रा ही सिंहलाला गेली व तिनें आपल्या बरोबर नेलेली बोधिवृक्षाची फांदी राजा तिष्य याला नजर केली, अशी एक दंतकथा आहे. ही फांदी अनुराधापुराजवळ रोंवण्यांत आली. कालक्रमानें तिचा मोठा वृक्ष झाला. व हा वृक्ष अद्यापही तेथें आहे असें सांगतात. कित्येक म्हणतात कीं, संघमित्रेनें तिष्यराजाला बोधिवृक्षाची फांदी नजर केली व त्यानें ती तेथें रोंविली, ही कथा लाक्षणिक आहे. ज्याप्रमाणें महेंद्रानें तिष्य राजास त्याचप्रमाणें संघमित्रेनें त्याच्या राणीस व इतर स्त्रियांस बौद्धधर्माचा उपदेश करून बौद्धधर्माचीं मुळें त्या बेटांत चांगलीं रोंविलीं, असा त्या लक्ष-

गेचा अर्थ घ्यावयाचा. कांहींही असो, येवढें खरें कीं, तिष्य राजाचे वेळीं महेंद्र व संघमित्रा याच्या परिश्रमानें बौद्धधर्माचा सिंहलांत जारीनें प्रसार झाला व तिष्य राजानें बौद्धभिक्षु व भिक्षुणी यांच्यासाठीं मोठाले विहार बांधून दिले. पुढें इ. स. च्या तिसऱ्या शतकांत हिंदुस्थानांतून बुद्धाच्या दांताचा एक अवशिष्ट भागही तेथें मोठ्या समारंभानें नेण्यांत आला, आणि क्यांडी येथें अद्याप या दांताच्या दर्शनासाठीं यात्रेकरूंच्या झुंडीच्या झुंडी दरसाल जात असतात.

सिंहलद्वीपांत बौद्धधर्माचा प्रचार करण्याचा अग्रमान महेंद्र व संघमित्रा यांना जसा देण्यांत येतो, तसा त्याच्या खालोखालचा मान बुद्धघोष नांवाच्या एका पंडिताला देतात. या पंडितानें बौद्धशास्त्रग्रंथावर अट्ठकथा (अर्थकथा) नांवाचें मोठें भाष्य केलें आहे.

तिष्याचे मागें सिंहलद्वीपांत कित्येक शतकेंपर्यंत बौद्धधर्माचा सारखा उत्कर्षच होत गेला; पण कालांतरानें त्याला उतरती कळा लागत चालली होती. इतक्यांत इ. स. च्या १२ व्या शतकांत तेथें पराक्रमबाहु नांवाचा मोठा पराक्रमी राजा झाला. त्यानें बौद्धधर्माला पुनः उचलून धरलें. पण सोळाव्या शतकानंतर तेथें पोर्तुगीज, डच, व इंग्रज यांची सत्ता क्रमाक्रमानें झाल्यावर बौद्धधर्माचें तेज हळू हळू मंदावत गेलें, तथापि त्या देशांतल्या लोकांच्या बुद्धिमत्तेवर व नीतीवर बौद्धधर्मानें जी छाप बसविली ती एकंदर अंशानें अद्याप कायम आहे.

ब्रह्मदेश—या देशांत बौद्धधर्म कसा प्रविष्ट झाला याविषयीं दोन निरनिराळीं मतें आहेत. कोणी म्हणतात कीं अशोक राजानेंच स्वर्णभूमीला (ब्रह्मदेशाला) दोन धर्मप्रचारक पाठविले होते. त्यांनीं तेथील लोकांना बौद्धधर्मी बनविलें. खुद्द ब्रह्मदेशांतल्या लोकांची समजूत अशी आहे कीं, वर सांगितलेल्या बुद्धघोष नांवाच्या पंडितानें ब्रह्मदेशाला बौद्धधर्म आणिला. पण बुद्धघोष सिंहलद्वीपांतून येथें कधीं आला होता, कोठें राहिला होता, वगैरेबद्दल कांहीं माहिती मिळत नाहीं. येवढी गोष्ट खरी कीं, या महापंडितानें केलेले भाष्य वगैरे ग्रंथ ब्रह्मदेशांत अत्यंत मान्यता पावले आहेत.

पूर्वेकडील द्वीपकल्प—यांत सयाम, कंबोडिया व आन संस्थानें यांचा अंतर्भाव होतो. या देशांतले मूळचे लोक अगदीं रानवट स्थितींतले होते. तथापि व्यापाराच्या वगैरे निमित्तानें हिंदुस्थानातले बरेच लोक तिकडे जात; आणि त्यांच्या संसर्गानें तिकडील लोकांच्या मनावर सुधारणेचा संस्कार पडूं लागला होता. तथापि तेथें बौद्धधर्म जो गेला तो मात्र हिंदुस्थानांतून नव्हे, तर ब्रह्मदेशांतल्या लोकांनीं बरोबर नेला. इ. स. च्या सातव्या शतकाच्या पुढें या देशांत बौद्धधर्माचा प्रवेश झाला असला पाहिजे. त्यापूर्वी येथें बौद्धधर्म होता याविषयीं कांहीं एक चिन्ह दिसत नाहीं. कंबोडिया देशांत अनेक कोरीव लेख सांपडतात, पण ते सगळे आठव्या नवव्या शतकाच्या पुढचे. या देशांतल्या बौद्धधर्मांत रानटी लोकांचा भुतांखेतांवरचा विश्वास, मूर्तिपूजा, वगैरे अनेक गोष्टींचें आरंभीं आरंभीं मिश्रण होतें. यावरून महायान पंथाची छाप तेथें अधिक होती, असा निष्कर्ष कित्येक पाश्चात्य पंडित काढतात; पण तो बरोबर नाहीं. कारण, बौद्धधर्मासारखा बुद्धिविशिष्ट धर्म प्रविष्ट होतांच तेथील लोकांनीं आपल्या जुन्या समजुती एकदम टाकून देणें शक्य नव्हतें. कांहीं दिवस तरी जुना मूर्तिपूजक धर्म व बौद्धधर्म यांचें मिश्रण असणें अपरिहार्य होतें. तसें मिश्रण तेथें दिसलें येवढ्यावरून तेथें महायान बौद्धपंथाचें प्राबल्य होतें असें म्हणणें युक्त होणार नाहीं. या द्वीपकल्पाचा निकट संबंध तिबेट, नेपाळ वगैरे देशांपेक्षां सिंहलद्वीपाशींच अधिक असल्यामुळें सिंहलद्वीपांतला हीनयान बौद्धधर्मच तेथें होता हें अधिक संभवनीय आहे. अद्यापही सयाम व कंबोडिया हे देश हीनयान पंथाचे कट्टे अभिमानी समजले जात आहेत.

तिबेट—या देशांत बौद्धधर्माचा झालेला प्रवेश हा तेथील इतिहासाचा प्रारंभकाल समजतात. हा काल म्हणजे इ. स. चें सातवें शतक होय. स्रांगपो नांवाच्या एका तिबेटी राजानें प्रथम बौद्धधर्म स्वीकारला व मग त्याचें उदाहरण पाहून त्याच्या प्रजेनेंही तसेंच केलें. या राजाला एक चीनच्या राजघराण्यांतली व दुसरी नेपाळी अशा दोन राण्या होत्या. दोन्ही अर्थात् बौद्धधर्मी असल्यामुळें त्या राजाचीही बौद्धधर्मावर भक्ति बसली. तथापि बौद्धधर्माची महती कळण्याइतका शिक्षणाचा संस्कार लोकांच्या मनावर झालेला नसल्यामुळें

बौद्धधर्माचा प्रसार फार मंदगतीनें होत गेला. स्रांग-पो याच्या मागून झालेल्या सहाव्या राजानें हिंदुस्थानांतून बौद्ध भिक्षु, व त्यांचे ग्रंथ आणविले होते पण या काळीं हिंदुस्थानांतच बौद्धधर्म ऱ्हासाच्या पंथाला लागलेला असल्यामुळें शुद्ध बौद्धधर्म शिकविणारा कोणी बौद्ध आचार्य त्याला मिळाला नाहीं. त्याचें ऐवजीं बौद्धधर्म आणि तान्त्रिक पंथ यांची खिचडी करणारा एक आचार्य त्यानें तिबेटांत नेला, आणि त्यानें अर्थात् तसल्याच मतांचा प्रसार तिकडे केला. या आचार्याचें नांव आचार्य पद्मसंभव हें होतें. तिबेटी भाषेंत त्याला गुरु रिंपो-चे म्हणतात

बौद्धधर्म तिबेटांत प्रविष्ट होण्यापूर्वी तेथें बोनधर्म या नांवाचा एक धर्म होता. मुर्ते, पिशाचें व पूर्वजांचे आत्मे यांची पूजा व जादुटोणा, यज्ञयाग, मनुष्यबळी वगैरे गोष्टी त्या धर्मांत होत्या हा बोनधर्म व बौद्धधर्म यांचे मिश्रणापासून लामाधर्माची तेथें उत्पत्ति झाली लामाधर्म म्हणजे लामांनी ( बौद्ध-भिक्षूंनीं ) लोकांवर आपली छाप ठेवण्यासाठीं मूळचा बोनधर्म व बौद्धधर्म यांचें केलेलें मिश्रण होतें. या धर्मांत गुरूचें महत्व राजापेक्षांही अधिक आहे पुढें तेराव्या चवदाव्या शतकांत मोगल लोकांनीं तिबेटावर स्वाऱ्या केल्या, तेव्हां मोगल बादशहा कुबलइखान यानें आपला राजकीय हेतु साधण्यासाठीं लामांना हाताशीं धरून त्या धर्माला उत्तेजन दिलें त्यामुळें अनेक लामा ग्रंथांचीं मोगली भाषेंत भाषांतरें झालीं. पुढें लामा सोंग-कापा यानें त्या धर्मांत आणखी पुष्कळ विधि व संस्कार घुसडून त्याला अगदीं निराळें स्वरूप दिलें

चीन — इ स ५८–७६ यांच दरम्यान केव्हां तरी चीन देशांत बौद्ध-धर्माचा प्रवेश झाला असला पाहिजे, असें पुष्कळांचें म्हणणें आहे. या काळीं मिंग ती नांवाचा राजा चीन देशावर राज्य करीत होता अशी दंतकथा सांगतात कीं, या राजाला एके रात्रीं स्वप्न पडलें, आणि त्या स्वप्नांत एका सुवर्णदेवतेनें राजवाड्यांत प्रवेश केलेला त्यानें पाहिला त्यावरून राजानें आपल्या मंत्र्यांना त्या स्वप्नाचा अर्थ विचारला. त्या राजाचा एक भाऊ मोठा पंडित होता. त्यानें असा अर्थ केला कीं, पश्चिम दिशेकडे शाक्यमुनि गोतम याचा धर्म प्रसार पावत आहे, त्याला चीनाधिपतींनें शरण जावें त्यावरून राजानें बौद्धधर्माची

माहिती करून घेण्यासाठीं हिंदुस्थानांत महापंडितांचें एक मंडळ पाठविलें त्यांनी हिंदुस्थानांत येऊन बौद्धधर्माचा स्वीकार केला व परत जातांना पुष्कळ बौद्ध-ग्रंथ व बोधिसत्त्वांच्या तसबिरी वगैरे नेल्या. राजानें या बौद्ध झालेल्या पंडितासाठीं विहार बांधून दिले व स्वत बौद्धधर्माची दीक्षा घेऊन आपल्या राजधानींत बौद्धमंदिर बांधिलें. तेव्हांपासून चीन देशांत बौद्धधर्माचा प्रसार होऊं लागला. तथापि त्या प्रसाराची गति फार मंद होती. प्रथम बौद्धभिक्षु होण्याला राजाची परवानगी लागत असे, आणि ती फारशी कोणाला मिळत नसे. यामुळें हिंदुस्थानांतून आणि मध्य एशियांतून गेलेल्या भिक्षूंकडेच धर्मप्रचारकाचें काम असे. इ० स० च्या चौथ्या शतकापासून राजाच्या परवानगीचा निर्बंध काढून टाकण्यात आला, आणि तेव्हांपासून भरसक चिनी बौद्धभिक्षूंची संख्या वाढत गेली. यांपैकीं कित्येक भिक्षु हिंदुस्थानांत येऊन बौद्धशास्त्राचें अध्ययन करीत व परत आपल्या देशांत गेल्यावर तेथें विहारांत राहून त्या ग्रंथांचीं चिनी भाषेंत भाषांतरें करीत. अशा रीतीनें चिनी भाषेंत बौद्धग्रंथांचा चांगला भरणा झाला. फाहयान, हुएनत्संग, व इत्सिंग हे सुप्रसिद्ध प्रवासी अशा रीतीनेंच हिंदुस्थानांत येऊन गेले. सुंग-युन हा एक चिनी प्रवासी हिंदुस्थानांत बौद्धधर्माचें अध्ययन करण्याकरितां इ० स० ५१८ मध्यें आला होता. हा भिक्षु नसून गृहस्थाश्रमी होता. फाहयान हिंदुस्थानांत आला, त्याच सुमारास कुमारजीव नांवाचा हिंदुस्थानचा बौद्धभिक्षु चीन देशांत जाऊन तेथें बौद्धधर्माचा प्रसार करण्यांत व बौद्धग्रंथांचीं चिनी भाषेंत भाषांतरें करण्यांत गुंतलेला होता. याच्या व याच्याबरोबर गेलेल्या दुसऱ्या कांहीं भिक्षूंच्या प्रयत्नास इतकें यश आलें कीं, चीनचा बादशहा स्वत: बौद्धभिक्षूची दीक्षा घेऊन विहारांत जाऊन राहिला. चीनच्या दक्षिण भागांत बोधिधर्म नांवाच्या भिक्षूनेंही अशीच मोठी कामगिरी करून तेथील राजास बौद्धधर्म स्वीकारण्यास लाविलें.

१ फा-हयान याचा हिंदुस्थानांतला प्रवास इ० स० ३९९-४१३ मध्यें, हुएन-त्संग याचा इ० स० ६२९-६४५ मध्यें, व इत्सिंग याचा इ० स० ६७१-६९५ मध्यें झाला.

चीन देशांतल्या बौद्धधर्म प्रचारकांना पुढें पुढें फार छळ सोसावा लागला. ८ व्या शतकाच्या प्रारंभीं खुद्द सरकारी हुकमानें त्यांच्या छळाला प्रारंभ केला आणि १२००० भिक्षु व भिक्षुणी यांना आपलें व्रत सोडून मुकाट्यानें परत जावें लागलें नवव्या शतकांत ४६०० मठ व विहार यांचा ध्वंस करण्यांत आला व अर्धाच लक्ष भिक्षु व भिक्षुणी यांना गृहस्थधर्मांत प्रविष्ट व्हावें लागलें, असा एके ठिकाणीं उल्लेख आहे १० व्या शतकांत दहा हजार बौद्धमंदिरांचा विध्वंस करण्यांत आला इतका वेळ बौद्धधर्माला कन्फ्युशियसचा धर्म हा एकटाच प्रतिस्पर्धी होता, आतां यापुढें त्याला आणखी एका प्रतिस्पर्ध्याशीं झुंजावें लागलें हा प्रतिस्पर्धी म्हणजे टाओ धर्म या टाओ धर्मांतही भिक्षूंचें प्रस्थ मोठें होतें हें बौद्धधर्मापासूनच त्यानें उचललें होतें, व दुस याही कित्येक बाबतींत बौद्धधर्माशीं त्याचें साम्य होतें. हें पाहून एका चिनी बादशहानें ते दोन्ही धर्म एक करण्याचा प्रयत्न केला व त्याला या कामीं पुष्कळ यशही आलें

**कोरिया**—या देशांत बौद्धधर्म गेला तो हिंदुस्थानांतून नव्हे तर चीन देशांतून गेला ( इ. स. ३७२ ) सदो नांवाचा एक चिनी मनुष्य बुद्धाच्या मूर्ति आणि कांहीं ग्रंथ घेऊन भेट कोरियाच्या राजाच्या दरबारांत गेला यावरून चिनी राजानें त्याला पाठविलें असावें असा पुष्कळांचा तर्क आहे. त्याचा दरबारावर चांगली छाप पडून लवकरच त्या राजाच्या राजधानींत दोन विहार बांधण्यांत आले पुढें तेथील राजानें चीनच्या राजाकडून मारानद व दुसरे दहाजण धर्मप्रचारक आणविले व त्यांनी धमप्रचार करतां करतां बौद्धधर्माचा प्रसार पन्नास वर्षांत बहुतेक सगळ्या कोरियाभर केला पुढें एक बौद्ध भिक्षुच स्वतः या देशांत राजपदारूढ झाला, तेव्हां तर बौद्धधर्माला चांगलेंच उत्तेजन मिळालें या राजानें असा कायदा केला होता कीं, ज्याला तीन मुलगे असतील त्यानें एका मुलास बौद्ध भिक्षूची दीक्षा दिली पाहिजे बौद्धधर्मामुळें कोरिया देशांत सुधारणेचा प्रसार झपाट्यानें झाला कोरियन लोकांचा स्वतःची लिपि नव्हती. ती एका बौद्ध भिक्षूनें चिनी लिपींत कांहीं सुधारणा करून तयार केली चौदाव्या शतकाचे अखेरीस कोरियांत मोठी राज्यक्रांति होऊन तेथील राजसत्ता मोगल राजघराण्याच्या हातून निघून

चीनच्या मिंग घराण्याचे हातात गेली. या घराण्यांतील राजांनीं बौद्धधर्मास मिळत असलेला राजाश्रय काढून घेऊन तो कन्फ्यूशन धर्माला दिल्यामुळें बौद्धधर्माला उतरती कळा लागली, तथापि तो अजीबात नष्ट झाला नाहीं. अजूनही बौद्धधर्म तेथें जीव धरून राहिला आहे.

जपान– चीनमधून कोरियांत व तेथून, जपानमध्यें बौद्धधर्म गेला. कोरियाच्या राजानें इ स ५५२ मध्ये मुद्दाम दूत पाठवून जपानच्या राजापाशीं बौद्धधर्माची तारीफ केली, आणि त्याच्याकडे कांहीं बौद्धग्रंथ, मूर्ति, तसबिरी वगैरे पाठविल्या. त्यापूर्वीही जपानांत बौद्धधर्म गेला होता असें सांगतात. पण असला तरी त्याचा प्रसार फारसा झाला नव्हता. इ. स. ५५२ नंतर सुद्धां त्याचा प्रसार फार मंदगतीनेंच झाला याचें कारण जपानच्या मूळच्या शिंटोधर्माकडून त्याला फार विरोध झाला. जपानचा राजा शोटोकुदेशी यानें बौद्धधर्माच्या प्रसाराला फार मदत केली. म्हणून या राजाचें नांव तेव्हांपासून बौद्धधार्मिकांच्या मालिकेंत गोंविलें गेलें. बौद्धधर्मी भिक्षूंनीं या वेळीं मोठ्या धोरणानें वर्तन केलं. शिंटोधर्मांतल्या देवतांची आपल्या याधिसत्वांत गणना करून त्यांची पूजा केली नसती तर शिंटोधर्मानें बौद्धधर्मांचें डोकें वर होऊं दिलें नसतें. पण या युक्तीनें शिंटोधर्मांच्या विरोधाची तीव्रता एकदम कमी झाली ही युक्ति करणारा बौद्धगुरु कोबोदेशी याला साधु मानून जपानी लोक अद्याप त्याची पूजा करतात. जपानचा समाज व जपानचीं सुधारणा यांवर बौद्धधर्मानें कायमचा ठसा उमटविला आहे इ स. १८६८ पर्यंत बौद्धधर्माला जपानचा राजाश्रय होता. तो या वर्षी काढून घेण्यांत आला, तरी बौद्धधर्मांची छाप त्या राष्ट्रावर अद्याप कायम आहे

अमेरिका—हिंदुस्थानाच्या सीमेवरच किंवा जवळपास असलेल्या सीलोन, ब्रह्मदेश, सयाम, मंगोलिया, तिबेट इ० देशांतून बौद्धधर्माचा प्रसार कसा झाला त्याचा वृत्तांत संक्षेपानें आतांपर्यंत सांगितला. तो आश्चर्यकारक तर खराच, पण याच्याही पलीकडे आश्चर्य वाटण्यासारख्या आणखी कांहीं गोष्टी सांगावयाच्या आहेत त्या गोष्टी म्हणजे हिंदुस्थानापासून हजारों कोस दूर असलेल्या अशा जावा व अमेरिका वगैरे देशांतूनही बौद्धधर्मानें प्रवेश करून

घेतला या होत. जाव्हा बेटांत बौद्धधर्म कसा गेला, याविषयीं साधारण हकी-कत उपलब्ध नाहीं, पण तेथें बुद्धाच्या मूर्तीसारख्या ध्यानस्थ मूर्ति सांपडल्या आहेत, यावरून बौद्धधर्मप्रचारकांचा प्रवेश तेथें झाला असला पाहिजे असें अनुमान करतां येतें. अमेरिकाखंडांत बौद्धधर्म गेला होता याला कांहीं प्रमाणें देतां येतील, आणि त्यावरून त्या खंडाचा शोध कोलंबसाच्याही पूर्वी एक हजार वर्षे आमच्या लोकांना लागला होता, असें सप्रमाण दाखवितां येईल. या संबंधानें एका अमेरिकन मासिक पुस्तकांत 'कोलंबसाच्या पूर्वी अमेरिकेचा शोध' या मथळ्याखाली एक लेख आला आहे तो अत्यंत वाचनीय आहे. त्या लेखाचा सारांश असा आहे.—

"कित्येक प्रमाणांवरून असें सिद्ध झालें आहे कीं, पांच बौद्ध भिक्षु रशियाच्या उत्तर सीमेवरील कामश्चाटका द्वीपकल्पांतून पासिफिकमहासागर ओलांडून आलास्काच्या बाजूनें अमेरिकेंत उतरले आणि दक्षिणेस मेक्सिकोपर्यंत जाऊन पोंचले होते." या मार्गानें अमेरिकेंत उतरणें अशक्य नाहीं हा मार्ग किती सोपा आहे तें नकाशा समोर ठेवून पाहिलें असतां कोणालाही दिसणार आहे. हिंदुस्थानांतल्या हिंदुस्थानांत अनेक उंच पर्वत व विस्तीर्ण नद्या उल्लंघून एका प्रांताच्या टोंकापर्यंत जाण्यापेक्षा तें अधिक कठीण नाहीं मेक्सिकोमधील मूळ राहिवाशांचा प्राचीन इतिहास, त्यांचा धर्म, आचारविचार व प्राचीन कीर्तीचीं अवशिष्ट चिन्हें हीं सर्व या गोष्टींच्या सत्यत्वाबद्दल साक्ष देत आहेत चीनच्या प्राचीन ग्रथांत फुसम् नावाच्या एका प्राच्य देशाचा उल्लेख आहे हें नांव त्या देशांतल्या एका वृक्षाच्या नांवावरून पडलेलें असावें मेक्सिकोमध्यें 'मागुये' किंवा 'मागुये' नांवाचा जो वृक्ष आहे त्यामध्यें व फुसम् या वृक्षामध्यें सादृश्य दिसतें. चिनी भाषेंत हुएन-त्सग यानें जो प्रवासवृत्तांत लिहून ठेविला आहे तो काल्पनिक नाहीं. जें दृष्टीस पडलें त्याची हकीकत अगदीं सरळ आणि मोकळ्या मनानें त्या प्रवाशानें लिहून ठेविलेली आहे. या प्रवासवृत्तांतावरून असें दिसतें कीं, इ स ४९९ मध्यें म्हणजे चिनी राजा यु-आन याच्या कारकीर्दीत तो फुसम् येथून किचेन येथें गेला होता तो राज्यक्रांतीचा काळ असल्यामुळें राजदर्शनाचा योग त्याला घडला नाहीं. पण राज्यक्रांतीचीं

गडबड शांत झाल्यावर तेथील नव्या राजाची भेट त्यानें घेतली, आणि फुसम् देशून आणिलेल्या कित्येक चमत्कारिक वस्तु त्यानें राजाला नजर केल्या. या नजर केलेल्या वस्तूंत एक विचित्र प्रकारचें कापड होतें. हें रेशमासारखें मऊ होतें. त्याचें सूत बारीक असून इतकें मजबूत होतें कीं, त्यांत एखादा जड पदार्थ घालून टांगून ठेविला तरी तें फाटत नसे. मेक्सिकोमधल्या 'आगेव' नांवाच्या वृक्षापासूनच अशा प्रकारचें वस्त्र तयार होतें. दुसरी नजर केलेली वस्तु एक सुंदर आरसा ही होती अशा प्रकारचे आरसे मेक्सिकोच्या सीमेवरील लोकांत दृष्टीस पडतात. राजाशेवरून हुएन यानें आपला प्रवासवृत्तांत लिहिला. त्यांत बौद्धधर्मासंबंधानें जें लिहिलें आहे त्याचा सारांश येणेंप्रमाणें आहे:—

पूर्वी फुसम्‌च्या लोकांना बौद्धधर्माची कांहीं माहिती नव्हती. पण इ. स. ४५८ मध्यें सुंग वंशांतील ता-मिन् राजाच्या कारकीर्दीत काबुलाहून पांच बौद्धभिक्षु फुसम् येथें गेले व तेथें त्यांनीं बौद्धधर्माचा प्रचार केला. तेव्हां पुष्कळ लोकांनीं त्या धर्माची दीक्षा घेतली व तेव्हांपासून तेथील लोकांच्या नीतिमत्तेंत सुधारणा झाली. हे बौद्ध भिक्षु कामस्कटकाहून कोणत्या मार्गानें गेले, व वाटेंत किती अंतरावर कोणकोणतीं स्थळें त्यांना लागलीं, तेथील लोकांचे आचारविचार कसे होते वगैरे सगळी हकीकत त्याच्या प्रवासवृत्तांत आहे. फुसम् वृक्षाचे गुणावगुण, आणि त्याच्या सालीपासून तंतु कसे काढतात व त्यांचें वस्त्र कसें विणतात किंवा त्यापासून कागद कसा करतात तेंही सगळें त्यांत विस्तारानें सांगितलें आहे. तेथें जी फळें होतात म्हणून त्या प्रवाशानें लिहून ठेविलें आहे, तीं फळें मेक्सिकोमध्यें होतात; त्या देशांत तांबें सांपडतें, पण तेथें लोखंडाच्या खाणी नाहींत, व सोनें आणि चांदी यांचा व्यवहार नाहीं असें म्हटलें आहे. तेथील लोकांची राज्यपद्धति, आचारविचार, विवाह व प्रेतसंस्कार, नगररचना, सैन्य व शस्त्रास्त्रें यांचा अभाव वगैरे संबंधानें त्या प्रवाशानें केलेलीं वर्णनें वाचल्यें आणि अमेरिकेचे मूळ रहिवासी—विशेषतः मेक्सिकोच्या सीमेवर राहणारे लोक—यांच्यामध्यें आढळलेल्या चमत्कारिक गोष्टी पाहिल्यातसें सादृश्य आश्चर्य वाटण्यासारखें आहे. मेक्सिको येथील लोकांत एक दंतकथा अशी आहे कीं, एक श्वेतकाय परदेशीय

पुरुष तेथें गेला होता व पापाचा परिहार करावा, न्याय व सत्य यांस धरून व्यवहार करावा, शिष्टाचार व मिताचार ठेवावा वगैरे गोष्टींचा उपदेश तो करीत असे. लोकांना त्याचा हा उपदेश न आवडून लोक त्याला मारावयास उठले, तेव्हां तो जीव घेऊन कोठें पळून गेला. तो कोठें गेला त्याचा शोध लागला नाहीं, पण एका पहाडावर त्याचीं पावलें उमटलेलीं दिसलीं त्याच्या स्मरणार्थ म्यापकालिना नांवाच्या गांवांत त्याची एक पाषाणमूर्ति ठेवण्यांत आली होती तिचें नांव उइ-चि-तेकोचा असें होतें दुसरा एक परदेशीय भिक्षु कांहीं लोकांसह पासिफिक महासागराच्या किनाऱ्यावर येऊन उतरला होता. हेच वर सांगितलेले पांच भिक्षु असावेत त्यांनीं ज्या गोष्टींचा उपदेश केला, त्या गोष्टींचें बौद्धधर्ममताशीं साम्य आहे स्पानिशलोकांनीं अमेरिका-खंड जिंकलें, तेव्हां त्यांना तेथील लोकांमध्यें प्रचलित असलेलीं धर्ममतें व आचार, त्याचें शिल्प, घरें बांधण्याची तऱ्हा, कालगणनेची पद्धति, वगैरे ज्या गोष्टी दिसून आल्या, त्यांत व एशियाखंडांतील धर्म आणि सुधारणा यांच्यांत इतकें साम्य आहे कीं, दोन देशांतल्या लोकांचें प्रत्यक्ष दळणवळण असल्या-शिवाय त्या साम्याचा उलगडा नीटसा करतां येत नाहीं

या गोष्टीला आणखी एक प्रमाण आहे तें भाषाविषयक होय बुद्धाचें नांव गोतम व त्याच्या वंशाचें नांव शाक्य गोतम व शाक्य हीं दोन्ही नांवें व त्याच-प्रमाणें दुसरीं कांहीं नांवें मेक्सिकोमधल्या नांवांशीं जुळतीं आहेत उदाहरण 'ग्वातिमाला' हें नांव 'गौतमालय' याचा अपभ्रंश स्पष्ट आहे पुरोहिताचें नांव 'ग्वातेमोट-निज' हें गोतम या नांवावरूनच निघालेलें दिसतें या-इकाका, जाकाटेकास, शाकाटापेक, जाकाटलाम, शाकापुलास, वगैरे नांवांशीं 'शाक्य' या नांवाचा निकट संबंध दिसतो पालेन्के येथें एक प्राचीन बुद्ध-मूर्ति आहे. तिचें नांव शाक-मोल अर्थात् शाक्यमुनि कोलोराडो नदीच्या खोऱ्यांत एक बेट आहे त्यांत एक पुरोहित राहतो त्याचें नांव गोतुशाका= गोतम शाक्य.

आणखी एक गोष्ट येथें सांगितली पाहिजे. ती ही कीं, अमेरिकेंत असे कित्येक शिलालेख आहेत कीं, त्यांवरून बौद्धधर्म तेथें प्रचलित होता याला उत्कृष्ट प्रमाण

त्यांत सांपडतें. ध्यानस्थ बुद्धाच्या मूर्ति, भिक्षु वेषांतल्या मूर्ति, हत्तीचे पुतळे (मेक्सिकोंत हत्ती हा प्राणीच नसतां त्याच्या मूर्ति तेथें कशा आल्या ?) चीनमधील प्यागोडा (बुद्धमंदिर) सारख्या आकृतीचीं देवालयें, तटावर चित्रें कोरण्याची पद्धति, कोरींव शिला, स्तूप, विहार, या सर्व गोष्टी बौद्धधर्माचा प्रसार तेथें झाला होता याच्या निदर्शक होत.

या सगळ्या प्रमाणांवरून प्रो० फ्रायर हे असें अनुमान काढतात कीं ( See the Buddhist discovery of America in the Harper's Magazine for July 1901 ) १५०० वर्षांच्या पूर्वी बौद्धभिक्षु अमेरिकेंत गेले होते व तेथें त्यांनीं आपल्या धर्माचा प्रसार केला होता.

आतापर्यंत हिंदुस्थानच्या बाहेर दूरदूरच्या देशांतून बौद्धधर्माचा प्रसार कसा झाला तें थोडक्यांत सांगितलें. हिंदुस्थानांत बौद्धधर्माची स्थिति आज कशी आहे, तो हिंदुधर्मांत लय पावला असें मानण्यास कोणतीं प्रमाणें आहेत, व ही स्थिति त्याला कोणत्या कारणांनीं प्राप्त झाली वगैरे गोष्टींचेंही विवरण मागल्या प्रकरणांत आलेंच आहे. आतां हिंदुस्थानाबाहेरील देशांत जेथें जेथें तो धर्म प्रचलित आहे तेथें तेथें त्याची स्थिति कशी काय आहे, त्याविषयीं थोडेंसें सांगून या प्रकरणाची समाप्ति करावयाची आहे.

सीलोन--हीनयान बौद्धपंथ ज्या ज्या देशांतून प्रचलित आहे, त्यांत सीलोन ऊर्फ सिंहलद्वीप प्रमुख आहे. खरें बौद्ध धर्माचें स्वरूप जर कोठें अंशतः तरी दिसत असेल तर तें हीनयानपंथांतच आहे हें मागें सांगितलेंच आहे. महायानपंथाच्या आचारांत, व लोकांच्या धर्मसंस्कारांत इतर धर्ममतांची व संस्कारांची जशी भेसळ झाली आहे, तशी हीनयान पंथांत नाहीं. तथापि हा पंथही अगदीं निर्मळ राहिला आहे असें मात्र नाहीं. बुद्धानें उपदेशिलेला खरा धर्म आपणांस सिंहलद्वीपांत पाहण्यास मिळेल अशी अपेक्षा करून जो मनुष्य सिंहलद्वीपास जाईल त्याची थोडीबहुत तरी निराशा झाल्यावांचून राहणार नाहीं. तथापि तेथें बुद्धाच्या खऱ्या धर्माचा उपदेश करणारे विद्वान् आचार्य थोडेबहुत तरी आज हयात असलेले सांपडतील. प्रव्रज्या धारण करतांना कोणकोणते विधि करावे लागतात, तें सिंहलद्वीपांतल्या

कोणत्याही मठांत आज पाहण्यास मिळेल. त्याचप्रमाणें मठवासी भिक्षूंचे साधे धार्मिक चारित्र्य, त्यांची पठन-पाठनाची पद्धति, त्यांचा वेष, भिक्षाटनपद्धति, विहारांची बांधणी, बुद्धमूर्तींचें शिल्पकाम, वगैरे गोष्टी बौद्धधर्माविषयीं माहिती करून घेऊं इच्छिणा या जिज्ञासूंस महत्वाच्या वाटतील. बौद्धधर्मी विहारांतून किंत्येक वेळां विष्णु आणि ब्रह्मा या ब्राह्मणधर्मी देवतांच्या मूर्तिही ठेविलेल्या आढळतील. बौद्धधर्मानें ब्राह्मणधर्माशीं सलोखा ठरण्यासाठीं केलेल्या प्रयत्नांचे हे अवशेष आहेत. त्याचप्रमाणें पावसाळ्यांत सगळे भिक्षु एकत्र 'वास' करीत असतां त्यांच्या समोरून धर्माचें प्रवचन (याला सीलोनमध्ये 'बाण' अशी संज्ञा आहे) करण्याकरितां विहारांतून ठरलेले मठाल प्रशस्त दिवाणखाने अद्याप पाहण्यास मिळतील व तेथें चाललेली प्रवचनेंही ऐकण्यास मिळतील. विहाराभोंवताल च्या अंगणांत एक घंटा, पुष्करिणी, बोधिवृक्ष, बुद्धाचें पदचिह्न व बुद्धाच्या मूर्ति इ. आढळतील.

हें सगळें बौद्धधर्माचें बाह्य अंग झालें. अंतरंगही तितकेंच सज्जल राहिलेलें आहे, असें मात्र आढळणार नाहीं. विद्योदयासारख्या महान् विद्यापीठांतून अध्ययन करणारे शिष्य व अध्यापन करणारे आचार्य यांच्यासारख्यांचीं उदाहरणें सोडून दिलीं आणि सामान्य प्रताच्या भिक्षूंकडे नजर फेकली तर असें दिसून येईल कीं, पुष्कळ बौद्धभिक्षूंना दशशील'चीं नांवें किंवा अष्टांगिक मार्ग याची ओळखसुद्धां राहिलेली नाहीं. ते पैशाचा देवघेव व व्याजबट्टा करतात. चोरी या व अनीतीचे दुसरे प्रकारही त्यांच्यांत दिसून होतात. पुष्कळसे भिक्षु विद्यरच्या नावानें रस्ता आवळतात. बौद्ध भिक्षूंना संख्या १८९१ च्या खानेसुमारीच बघीं ९५९८ होती, १९०१ मध्यें ती ७३३१ वर आली, आणि १९११ मध्यें ती सात हजारांच्याही खालीं गेली आहे. सिंहली बौद्धांचे सयामा, रामण्य (रंगूनचे) आणि अमरपुरी असे तीन पंथ झाले आहेत. अलीकडे 'बुद्ध शासन प्रमागम' नांवाचा एक चौथा पंथ निघाला आहे. त्या नव्या पंथांत युरोपियन आचारांचें पुष्कळसें मिश्रण झालेलें आहे. बौद्धधर्मांतलें मुख्य जें अहिंसातत्व त्याचाही विशेषसा आदर होतांना दिसत नाहीं, हें त्या दशा

तून कासवांना मारून त्यांच्या पाठी परदेशी पाठविण्याचा व्यापारावरून चांगलें दृष्टोत्पत्तीस येतें. अलीकडे शिक्षणाचा प्रसार झाल्यापासून मात्र सुशिक्षित लोकांचें लक्ष बौद्ध मताच्या अध्ययनाकडे व बुद्धाच्या आज्ञा विशेष शुद्ध रीतीनें पाळण्याकडे लागत असलेलें दिसत आहे, ही सुदैवाची गोष्ट आहे

ब्रह्मदेश—सीलोनपेक्षां या देशांतलें बौद्धधर्माचें स्वरूप अधिक मोहक आहे येथील बौद्ध भिक्षु आपलें आयुष्य व शारीरिक आणि मानसिक शक्ति शिक्षणप्रसाराचे कामीं खर्च करून देशावर मोठे उपकार करून ठेवीत असलेले दृष्टीस पडतात. भिक्षूंचा राहणी, त्यांचा वेष आणि त्यांची दिनचर्या बहुतेक सिंहलद्वीपांतल्या भिक्षूप्रमाणेच आहे. येथें भिक्षूंत निरनिराळे वर्ग आहेत. ज्यांनीं अधिक काळ मठांत शास्त्राध्ययन वगैरे करण्यांत घालविला, त्याचा दरजा उच्च समजण्यांत येतो ज्या मानानें हा काळ कमी असेल, त्या मानानें त्याचा दरजा खालचा समजतात.

ब्रह्मदेशांतले मठ व मंदिरें सगळीं लाकडाचीं व तीन चार याड उंचीच्या खांबावर उभारलेलीं आहेत या इमारतींचे दोन भाग असतात एकांत भिक्षूंचें राहणें, बसणें-उठणें व अध्ययन अध्यापन वगैरे चालतें दुसऱ्यांत बुद्धा या मूर्ति, पूजेचें साहित्य, ग्रंथसंग्रह वगैरे ठेवलेलीं असतात ब्रह्मदेशांत 'दागबा' नांवाच्या इमारतींचा अतिशय सुकाळ आहे. दागबा म्हणजे चैत्य अथवा समाधि मंदिरें होत दागबा बांधणें हे पुण्यकृत्य समजण्यांत येत असल्यामुळें पुण्यार्थी व धनवान् लोक निदान एकेक तरी दागबा बांधल्याशिवाय राहत नाहींत हीं मंदिरें बहुधा मठाच्या आसपास बांधतात. सध्या ज्या दागबांत श्वेडेगन हा फार नामांकित व सुंदर आहे ह्यांत बुद्धाच्या मस्तकावरचे आठ केस, भिक्षापात्र, दंड वगैरे वस्तु पुरलेल्या आहेत असें म्हणतात बौद्धकालीन वैभव व शिल्प यांचा उत्तम नमुना या ठिकाणीं पाहण्यास मिळतो या दागबाच्या दर्शनासाठीं चीन, जपान, कोरिया वगैरे दूरदूरच्या देशांहून यात्रेकरू येत असतात रंगूनच्या श्वेडेगनइतकेंच पगू येथील श्वेमॉडॉ आणि प्रोम येथील श्वेसनदॉ या स्थळांचें माहात्म्य मानण्यांत येतें या दागबांत अनेक लहान मोठ्या

घंटा टांगलेल्या असतात. यात्रेकरूंनी प्रार्थना आटोपल्यावर या घंटा वाजवावयाच्या असतात. सर्वांत मोठी घंटा मंडाले येथील मिंगन-देवळामध्यें आहे.

सिंहलद्वीपातल्यापेक्षा येथील भिक्षूंचें वर्तन अधिक धार्मिकपणाचें आहे. तरी येथील भिक्षुसुद्धां बुद्धानें घालून दिलेल्या नियमांचें पालन पूर्णपणें करतांना दिसत नाहींत. कित्येक भिक्षु भिक्षा मागतात, पण ती स्वतः न खातां कुत्र्यामांजरांना घालतात, किंवा गोरगरिबांस वाटतात, आणि मठांत शिजविलेल्या अन्नावर निर्वाह करतात. रेशमी वस्त्र बुद्धानें निषिद्ध ठरविलें असतांही तें पांघरतात. नाटकें, तमाशे, नाच इत्यादि करमणुकीचे प्रकारही त्यांच्यांत आहेत. *कित्येक भिक्षु तर पैशाचे देवघेवीचे व्यवहार व कोर्टांतून फिर्यादीही करतात.* तथापि सीलोनप्रमाणें कित्येक ब्रह्मी बौद्धांनाही ही धर्मभ्रष्टता पाहून वाईट वाटत आहे, आणि मठांतून व गृहस्थाश्रमी लोकांच्या वर्तनांत अधिक धार्मिकता आणण्याच्या उद्योगास ते लागले आहेत. यासाठीं व धर्मजागृतीसाठीं त्यांनीं 'बुद्ध शासन-समागम' सारख्या संस्था स्थापन केल्या आहेत, धर्म ८ पत्रे जात आहेत व मासिक पुस्तकें काढलीं आहेत.

ब्रह्मदेशच्या लोकांच्या राहणींत व एकंदर जीवनांत आज कित्येक शतकें बौद्धधर्ममतें मुरलीं आहेत, तरी बौद्धधर्माचा स्वीकार करण्यापूर्वीच्या त्यांच्या धर्माचे संस्कार अद्याप त्यांच्या वर्तनांतून बोकावतात. नात पूजा हा अशा पैकींच एक संस्कार आहे. नात म्हणजे पूर्वकालीन जे साई-जोसाईंसारख्या देवता होत. आपल्या इकडे जशा कुलदेवता, ग्रामदेवता, वास्तुदेवता, तशा ब्रह्मी लोकांत या नात देवता होत. त्यांची पूजा करतांना नवस वगैरे प्रकार ब्रह्मी लोकांत फार आहेत.

स्याम—स्यामांतल्या बौद्धधर्माची स्थिति बहुतेक सीलोन आणि ब्रह्मदेश यांतल्यासारखीच आहे. तेथें एकच गोष्ट विशेष आहे. ती ही कीं, तेथील राजा हा जरी मुख्य धर्मगुरु नाहीं, तरी धर्माचा मुख्य पुरस्कर्ता आहे, व आणि त्या राज्यांतील मुख्य धर्माधिकारी ( संघराज ) व इतर धर्माधिकारी यांच्या नेमणुका त्याच्याच हातीं आहेत. एखादा धर्माधिकारी मान्य होऊन त्याच्या अधिकाराला लांछन लावण्यासारखें कांहीं कृत्य झाल्यास त्याच्याकडून तो

अधिकार राजा काढून घेतो. राजाच्या हातीं येवढा अधिकार आहे, तरी धर्माधिका यांचा योग्य सन्मान राखण्यांत तो कसूर करीत नाहीं. त्यांना तो वंदन करतो. मात्र इतर लोकांनीं दोन्ही हातांनीं वंदन करावयाचें तें राजानें एक हात कपाळाला लावून सलामासारखें वंदन करावें, अशी पूर्वापार चाल पडली आहे. वर्षांतून एकदां राजाची स्वारी भिक्षूंना सन्मानाचे पोषाक देण्यासाठीं मोठ्या थाटानें मंदिरास जाते, आणि तेथील दिवे स्वत आपल्या हातानें लावून बुद्धमूर्तीला, बौद्धप्रधाना आणि मठांतल्या भिक्षूंना नम्रतापूर्वक वंदन करून भिक्षूंना पोषाख आणि मंदिराला देणग्या देऊन आणि भिक्षूंचे आशीर्वाद घेऊन परत येते. याप्रमाणें राजाकडून धर्माचा सन्मान अद्याप होत असतो तथापि सयामांतल्या बौद्धांनीं हिंदूंच्या व चिनी लोकांच्या पुष्कळ वेडगळपणाच्या चालीरीती घेतल्या आहेत त्यामुळें तेथेंही बौद्धधर्म शुद्ध स्वरूपांत दिसत नाहीं

तिबेट—या देशांत बौद्धधर्माला तेथील भिक्षू ( लामा ) मुळें जें विशेष स्वरूप प्राप्त झालें आहे, त्यावरून त्याला लामा धर्म असें नांव मिळालें आहे. हा लाम धर्म नुसत्या तिबेटांतच नाहीं, तर जवळपास असलेले हिमालयांतले दुसरे प्रांत–लादक, नेपाळ, भूतान, सिकीम आणि त्यांच्याही पलीकडे मंगोलिया व चीनचा कांहीं भाग यांतून पसरलेला आहे हा महायान पंथात समाविष्ट होतो हीनयान बौद्ध धर्माहून हा धर्म सर्वस्वी भिन्न आहे. या लामांचे मठांच्या सुद्धा रचना इतर मठांहून निराळी आहे. लामांचे मठ म्हणजे विशाल, व मजबूत किल्लेच होत या मठाचे संरक्षणार्थ अक्राळ विक्राळ स्वरूपाचे क्रूर कुत्रे ठेविलेले असतात मठाचे मध्यभागा पूजास्थान असतें त्याच्या दाराशीं पडदे लाविलेले असतात

हीनयानपंथांत फक्त बुद्धाच्याच मूर्ति असतात लामाधर्मांत बुद्धाच्या मूर्तिशिवाय इतर म्हणजे ऐतिहासिक व्यक्तींच्या, हिंदु देवतांच्या, मूनयोनींतल्या व्यक्तींच्या व ग्रामदेवतांच्याही मूर्ति असतात गौतमबुद्धाच्या अगोदर होऊन गेलेले बुद्ध व पुढें येणारा मैत्रेयबुद्ध मिळून एक बुद्धपंचायतनच असतें या पंचायतनांत ककुचंद, कनकमुनि, काश्यप, गोतम आणि मैत्रेय इतके बुद्ध

येतात. गौतमबुद्धाला 'अमिताभ' म्हणतात. याशिवाय अवलोकितेश्वर, मंजुश्री, सामंतभद्र, वज्रपाणी (इंद्र), तारादेवी, मरीची इ० बोधिसत्त्वांच्या व त्यांच्या पत्न्यांच्या मूर्ति असतात. याशिवाय कुबेर, यम इ० अष्ट दिक्पाळांच्या आणि मौद्‌गलायन, आनंद, उपालि, अश्वघोष, नागार्जुन, पद्मसंभव इ० साधु पुरुषांच्याही मूर्ति पूजेंत ठेविलेल्या असतात. द्वारांतल्या भिंतीवर धर्मचक्र काढलेलें असतें. त्यांत १२ निदानें दाखविलेली असतात. कांहीं जंगली पशु-( अस्वल, रेडे, माकडें ) ही मारून पेंढा भरून ठेविलेलीं असतात.

तिबेटांत लामांना मोठा मान मिळतो व लामा होण्यांत व्यावहारिक आणि पारमार्थिक असे दोन्ही प्रकारचे फायदे आहेत, ही गोष्ट लक्षांत घेऊन बहुतेक लोक आपल्या मुलांपैकीं निदान एकाला तरी लामा करितात. बायकांनाही भिक्षुणी होण्याची आणि मठांत जाऊन राहण्याची मुभा आहे, पण त्यांना लामाइतका मान नाहीं.

लामाची दिनचर्या हीनयान पंथाच्या भिक्षूंहून अगदीं निराळी असते. सकाळीं उठल्याबरोबर पहिलें काम म्हणजे पूजास्थानीं जाऊन चटईवर बसून सर्वांनीं मिळून स्तोत्रें म्हणावयाचीं. नंतर चहा घेतल्यावर पुनः स्तोत्रपाठ करून प्रत्येकजण आपापल्या खोलींत जातो. नंतर पुनः नऊ वाजतां, बारा वाजतां, तीन वाजतां व सहा वाजतां अशा तीन तीन तासांच्या अंतरानें प्रार्थना होतात. प्रत्येक वेळीं चहा मिळावयाचाच

या स्तोत्रपाठाशिवाय आणखी एक काम या भिक्षूंना करावें लागतें. भाविक लोक त्यांना आपल्या घरीं प्रार्थनेला बोलावतात, तेव्हां तेथें जाऊन त्या मोठ्यानें पाठ म्हणाव्या लागतात.

लामांना भिक्षा मागण्यास जावें लागत नाहीं. त्यांना घरीं बसल्या शिजविलेलें अन्न खाण्यास मिळतें. मठांत सगळी खाण्यापिण्याची व्यवस्था केलेली असते.

मठांतली सगळी व्यवस्था लामांकडेच असते. मठाशीं संबंध नाहीं असे देण्याघेण्याचे व्यवहार, सराफी, व्यापार वगैरे सुद्धां लामा करितात. मठाला पुष्कळ जमिनी दिलेल्या असतात. त्यांतून उत्पन्न काढणें, त्या जमिनी दुस-

ग्रास लावून देणें, मठाला देणग्या मिळतात त्यांची व्यवस्था, नवीन देणग्या मिळविण्यासाठीं हिंडण्याची खटपट, मठांत लामांकडून होणा या चोऱ्या व इतर गुन्हे यांची फौजदारी चौकशी व शिक्षा वगैरे व्यवस्था लामांकडेच सोपविलेली असते. ब्रह्मचर्याचा नियम त्यांच्याकडून कडक रीतीनें पाळला जात नाहीं

लामाग्रंथ सगळे तिबेटी भाषेंत आहेत मूळचे हे हिंदुस्थानांतल्या संस्कृत ग्रंथांचीं भाषांतरें करून लिहिलेले आहेत आणि कांहीं थोडे असल तिबेटी व कांहीं चिनी ग्रंथांवरून उतरलेले आहेत यातले कांहीं छापील व कांहीं हस्तलिखित आहेत दोन्ही प्रकारच्या ग्रंथांवर कुशल कारागिरांनीं सुंदर नकशी व चित्रें वगैरे काढलेलीं आहेत सूत्र, विनय आणि अभिधर्म या तीन मूळ ग्रंथांवर २२५ टीकाग्रंथ आहेत याशिवाय तंत्रशास्त्र, व्याकरण, अलंकार, न्याय तत्वज्ञान इ० विषयांवरचे ग्रंथही लामांच्या संग्रहांत आहेत या सर्व ग्रंथांना लामा अतिशय पूज्य मानून फार जपतात व त्यांची पूजा अर्चा करितात. त्या ग्रंथांतलें एखादें पान भुईवर पडूं देणें सुद्धां ते पाप गणतात

या लामाधर्मामध्यें पुष्कळ पंथ झाले आहेत त्यांचें वर्णन विस्तारभयास्तव येथें करीत नाहीं

लामांमध्येंही उच्च नीच असे दरजे आहेत हे दरजे कांहीं विद्वत्तेच्या मानानें, कांहीं आचरणाच्या उच्चनीचतेमुळें, व कांहीं पुनर्जन्माच्या समजुतीमुळें झालेले आहेत या शेवटल्याविषयीं येथें दोन शब्द सांगणें जरूर आहे

तिबेटी लोकांची अशी समजूत आहे कीं, कांहीं साधु पुरुष पुनर्जन्म घेऊन लामांच्या स्वरूपानें पुन या भूलोकीं अवतीर्ण होतात ज्या लामांच्या ठिकाणीं बोधिसत्व स्वत अवतीर्ण होतात त लामा अर्थात् अत्यंत उच्च होत अशा लामांना ते दलाई लामा म्हणतात अमक्याच्याच स्वरूपामध्यें बोधिसत्वाचा अवतार झाला आहे, हें ओळखण्याचीं कांहीं लक्षणें ठरविलेलीं आहेत एक दलाई लामा समाधिस्थ झाल्यानंतर चाळीस दिवसांनीं त्याच्या ठायीं असलेला बोधिसत्व पुनर्जन्म घेतो, अशी तिबेटी लोकांची समजूत आहे म्हणून दलाई लामाच्या मृत्यूनंतर चाळीस दिवसांनीं जन्म पावलेल्या अर्भकांच्या अंगावरचीं

लक्षणें तपासतात, व अशीं मुलें गोळा करून त्यांत पुन निवड करतात काहीं बुद्धांच्या अस्सल तसबिरी व मूर्ति, व कांहीं नक्कल तसबिरी व मूर्ति त्या मुलांपुढें टाकतात, आणि जे मुलगे अंतर्ज्ञानानें त्यांतून अस्सल मूर्तीला हात लावतील ते मुलगे वेगळे काढितात मग लाटरीनें त्यांतला एक निवडून त्याची दलाई लामा म्हणून निवडणूक करतात. या निवडणुकीचे वेळीं स्वत गव्हर्नर व तिबेटचे मोठमोठे अधिकारी हजर असतात ह्या निवडणुकीची बातमी चीनच्या बादशहाला तावडतोब देऊन त्याची मंजुरी आणवितात ती आली म्हणजे नेमणूक पक्की झाली मग त्या मुलाचें संगोपन व शिक्षण याची उत्तम प्रकारें सरकाराकडून तजवीज होते

दलाई लामाची योग्यता व अधिकार सर्वांत मोठा समजतात. त्याच्या खालोखाल ग्रँड लामा ( ताशी लपो ), उर्गा येथील ग्रँड लामा, भूतानचा ग्रँड लामा वगैरे यांचे दरजे आहेत

तिबेटांत सुमारें ३१०० मठ व एकेकांत ज्यास्तींत जास्ती १०००० भिक्षु राहतात सर्वांत दलाई लामाचा मठ फार महत्त्वाचा समजतात ह्या ल्हासा येथें आहे यथें एक माठी बुद्धाची मूर्ति आहे ही इतकी पवित्र मानण्यांत येते कीं, परकीयांच्या नजरेससुद्धां ती पडू देत नाहींत

तिबेटांत बौद्धधर्माचा प्रवेश होण्यापूर्वी तथाल लोक रानवट होते. त्यांना बौद्धधर्मानें सुशिक्षित करून सभ्यवर्गांत आणिलें, ही कांहीं सामान्य गोष्ट नाहीं बौद्धधर्मामुळेंच हे लोक घरेंदारें करून राहू लागले, व्यापार, कृषिकर्म, वगैरे उद्योगांत शिरले, नीतिमत्तेशीं त्यांचा परिचय झाला, लिहिण्यावाचण्याची कला शिकले, आणि शांततेनें राहू लागले

बौद्धधर्माच्या उन्नततत्त्वांपैकीं कांहीं तिबेटी लोकांच्या अंगांतून पूर्णपणें मुरलीं आहेत जसें कर्म करावें तसें फळ घ्यावें, ही समजूत त्यांपैकींच आहे आत्मा सत्कर्मानें मुक्त होऊन त्या मुक्त स्थितींत भ्रमण करीत करीत स्वर्गाला जातो, व दुष्कर्मामुळें नरकवास भोगतो, ही समजूत रूढ झाल्यामुळें लोकांचा सत्कर्माकडे साहजिकच प्रवृत्ति होते. दुष्कर्माकडे प्रवृत्त करणा या भूतयोनांपासून रक्षण व्हावें म्हणून मंत्रतंत्राचा उपयोग होऊ लागला या मंत्रांपैकीं ' ॐ मणिपद्मो

हुम्' हा मंत्र अत्यंत सामर्थ्यवान् आहे. त्याच्यायोगानें परलोकचें साधन होतें; इतकेंच नाहीं, तर इहलोकींसुद्धां इच्छित गोष्टींची प्राप्ति होते, अशी तिबेटी लोकांची समजूत आहे. या मंत्राचा विशिष्ट देवता आहे व विशिष्ट प्रकारें हा मंत्र जपला असतां ती देवता प्रसन्न होते, असें समजून मनुष्याच्या अस्थि, किंवा पोवळीं यांच्या माळा घेऊन त्यांनीं हा मंत्र जपतात, किंवा कागदावर तरी लिहून व तो ताईतांत घालून तो शरीरावर धारण करतात. आजारी माणसानें हा व दुसरे मंत्र कागदावर लिहून त्या कागदाच्या गोळ्या खाल्ल्या असतां तो रोगमुक्त होतो, अशीही त्यांची समजूत आहे. कित्येक असे मंत्र कापडावर शिवून त्यांचीं निशाणें घराला लावतात. त्यानें त्या घराला डाकिनी, पिशाचिनी वगैरेंची बाधा होत नाहीं, असें ते समजतात. तिबेटी लोकांत धर्मचक्र ही एक विशेष गोष्ट आहे. मंत्र लिहिलेले कागद एका सिलिंडराला (लवगोलाला) गुंडाळतात, आणि हा लवगोल एका पेटींत घालून तो हातानें फिरवितात. या गोलाचीं जितकीं परिवर्तनें होतील, तितकी पुण्यप्राप्ति अधिक असून भाविक लोक तोंडानें व हातानें कांहींही व्यवहार करीत असले तरी एका हातानें हें धर्मचक्र सारखें फिरवीत राहतात. फार काय, पण पाणचक्की किंवा पवनचक्की फिरत राहते, तसें कांहीं युक्तीनें हें धर्मचक्र सारखें फिरत ठेवण्याची तजवीज केलेली असते.

लामा धर्मांत कांहीं स्वस्तिकासारखीं चिन्हें पवित्र मानलीं आहेत. कमळाचें पुष्प हें अत्यंत पवित्र मानतात. हें बौद्धधर्माचें बाह्य चिन्ह समजण्यात येतें. वाघ, सर्प, पाकोळी वगैरेंच्या चित्रांना अशीच पवित्रता प्राप्त झालेली आहे. हीं चित्रें तिबेटी लोकांच्या मंदिरांतून जागोजागीं काढलेलीं असतात.

तिबेटांतील सामान्य प्रतीच्या लोकांत जादूटोणा करणारांचें प्रस्थ मोठें आहे. व या बौद्धधर्मांप्रमाणें पाहिलें तर पुरोहिताची मध्यस्थी व जादूटोणा मंत्रतंत्र, जपजाप्य यांचें कांहींच कारण नाहीं. पण तिबेटांत सगळा प्रकार उलटा झालेला दिसतो. येथें लामा हे इतर लोकांना धर्माचा मार्ग दाखविणारे नसून चैन, ऐषआराम, धनलोभ, अधिकारलोभ इ. दुर्गुणांचा मात्र उत्तम आदर्श दाखविणारे आहेत, हें बौद्धधर्माचें दुर्दैव म्हटलें पाहिजे, दुसरें काय?

चीन—या देशांत टाओधर्म, कनूफ्युशियसचा धर्म व बौद्धधर्म हे तिन्ही एकाच वेळीं प्रचलित असल्यामुळें त्या सर्वांचें कुळें कसें याव कित्येकांना आश्चर्य वाटतें पण खरोखर आश्चर्य वाटण्यासारखें त्यांत कांहीं नाहीं टाओधर्म खालच्या प्रतीच्या समाजाला आवडला, तरी बुद्धिमान् माणसाच्या समजुतीला तो पटणारा नाहीं, आणि कनफ्युशियन धर्माला धर्म ही महत्व खरोखर देतां येत नाहीं तो केवळ नीतिमार्ग असल्यामुळें बौद्धधर्माशीं त्याचा विरोध येण्याचा फारसा संभव नाहीं चीन देशांतल्या बौद्धधर्मांत पुष्कळ परिवर्तनें झालीं आहेत खरीं, तथापि बाह्यस्वरूप बदललें तरी मूळच्या धर्ममताचा प्रवाह त्या समाजांत स्पष्टपणें दृष्टोत्पत्तीस येतो. चीन देशांतले बौद्ध भिक्षूंचे मठ इतर देशांतल्या मठांपेक्षां निराळ्या पद्धतीनें बांधलेले आहेत, तरी आंतली व्यवस्था निराळी नाहीं या मठांतून स्वच्छता फार चांगली ठेवण्यांत येते.

चिनी बौद्धधर्मांत त्यांच्या धर्मांसारखी देवदेवतांची संख्या मोठी नाहीं तथापि चिनी बौद्ध बुद्ध, बोधिसत्व आणि कुलदेवता यांच्या प्रतिमा करून मठांतून ठेवतात बुद्धाच्या मूर्तींत पुन कित्येक प्रकार आहेत कांहीं मूर्ति शाक्य गोतमबुद्ध याच्या असतात, कांहीं बुद्ध दीपकार याच्या आहेत, व कांहीं इतर बुद्धांच्या आहेत भविष्यकाळीं अवतीर्ण होणा या मैत्रेय बुद्धाची मूर्ति मात्र या बुद्धमालिकेंत नसते ती कुलदेवतांच्या वर्गात ठेवतात तिचें स्थान मोठें गमतीचें असतें जमिनीवर बसलेला एक खूप लठ्ठ पुरुष, त्याच्या उजव्या हातांत जपमाळ किंवा गुलाबाची कळी, डावा हात एका थैलीच्या तोंडाभोंवती ठेविलेला, कोंके साफ तासलेलें, व अंगावर एक मोठें वस्त्र अशी ही मूर्ति असते बोधिसत्वांच्या मालिकेंत अवलोकितेश्वराची मूर्ति असते, पण ती स्त्रीरूपांत असते तिच्या जवळच महास्थाम, मञ्जुश्री, सामंतभद्र वगैरेंच्या मूर्ति असतात याशिवाय यम आणि त्याचे दूत हातांत निरनिराळ्या प्रकारचीं घातक शस्त्रें व क्रूर मुद्रा धारण केलेले दाखविलेले असतात याशिवाय गोतमबुद्ध, आणि त्याच्या दोन्ही बाजूस त्याचे हात जोडून उभे असलेले परम शिष्य आनंद आणि काश्यप यांच्या मूर्ति व त्याचप्रमाणें बौद्धधर्माचा परामर्ष घेणारे गतकालीन चिनी बादशहा, यांच्याही मूर्ति असतात होगचौ व वयोटन या दोन ठिकाणी

तर प्रसिद्ध युरोपियन प्रवासी मार्को पोलो याचीही मूर्ति बसविलेली आपण पाहिली, असें मि. हॅकमन हे जर्मन गृहस्थ आपल्या ग्रंथांत लिहितात.

बोधिधर्म, प्रसिद्ध सेनापति क्वांति, नीतिशास्त्रप्रणेता कनफ्यूशियस, व बँचांग यांच्याही मूर्तींना देवताच्या प्रभावळींत जागा मिळाली आहे.

देवांच्या मूर्ति लाकडाच्या किंवा मातीच्या केलेल्या असून वर उत्कृष्ट रंग दिलेल्या असतात. क्वचित् ब्रॉझ धातूच्या किंवा संगमरवरी पाषाणाच्याही आहेत. आपल्या सारखीच, मूर्तिस्थापनेच्या वेळीं त्यांची प्राणप्रतिष्ठा करतात. मात्र त्यांचा विधि फारच गमतीचा आहे. आपण मंत्रानें त्या मूर्तींत प्राणाचा संचार करतों, तर चिनी लोक मूर्तीच्या पाठीला ठेविलेल्या भोंकांतून एखादा सर्प, मांजर, बेडूक किंवा गोम यासारखा खरोखरीचा प्राणी पोकळ मूर्तीच्या आंत सोडून तें भोंक बंद करतात. तो प्राणी अर्थात् आंत मरतो, आणि त्याचा प्राण मूर्तीत संचार करतो, अशी त्या लोकांची समजूत आहे.

चीन देशांत बाळपणीं दीक्षा घेऊन भिक्षु झालेलेच पुष्कळ आहेत. मोठ्या वयांत भिक्षु झालेले थोडे. कांहीं लोक पैसे घेऊन आपल्या मुलांना मठांत भिक्षु होण्यासाठीं पाठवितात, व कोणी कोणी आईबापांनीं केलेले नवस फेडण्या-साठीं भिक्षु झालेले असतात. लहानपणापासून भिक्षुमताची माहिती झाल्यामुळें त्यांना त्या मतानें राहण्यांत कांहींच अडचण वाटत नाहीं. मठांतच त्यांचें धर्म-शिक्षण होऊन भिक्षूच्या कर्तव्याचें व्यावहारिक ज्ञान मिळतें. तेथें त्यांना तीन संस्कार करून घ्यावे लागतात. पहिला शिष्यवृत्तीचा, दुसरा भिक्षुवृत्तीचा आणि तिसरा बोधिसत्वाच्या वृत्तीचा. या तिसऱ्या संस्काराचे वेळीं त्यांना अंगावर दहा बीस जागीं तप्तमुद्रा घ्याव्या लागतात. या मुद्रांचे वण त्यांच्या अंगावर जन्मभर राहतात.

भिक्षूंचें पहिलें मुख्य काम म्हणजे दिवसांतून सहा वेळ होणाऱ्या उपासनांच्या वेळीं हजर राहणें. या उपासनांच्या वेळीं मंत्र व स्तोत्रें म्हणतात, आणि धर्म-ग्रंथांतून कांहीं अध्याय वाचतात. या उपासनांच्या वेळीं झांजा, चिपळ्या, नगारे वगैरे वाद्यें वाजवितात. याच वेळीं कांहीं हवनही होतें.

चिनी बौद्धांचे कांहीं ठराविक पवित्र दिवस आहेत त्यांना उपोसथ म्हणतात सगळ्या बौद्धांच्या व बोधिसत्त्वाच्या जयंत्या व कांहीं साधूंच्या पुण्यतिथिही विशिष्ट रीतीनें पाळतात.

चिनी बौद्धांत ध्यानाचें माहात्म्य फार मोठें आहे ध्यान व चिंतन करण्यासाठीं मठांत ठरीव एकांत जागा असते.

भिक्षूंना इतरही कांहीं कामें करावीं लागतात. तीं त्यांच्याकडून नीट करवून घेण्यासाठीं अधिकारी नेमिलेले असतात

मठांत नुसते भिक्षुच राहतात, असें नाहीं, इतर लोकांनाही राहण्याची तेथें तजवीज केलेली असते. मात्र त्यांनीं भिक्षूंची कांहीं तरी सेवा केली पाहिजे कोणी त्यांचे साठीं धान्य पिकवितात, कोणी लाकडें तोडून आणितात, व दुसरे इतर घरचीं कामें करतात

बौद्ध भिक्षूचें अन्न सात्त्विक असतें. वनस्पति-आहाराशिवाय दुसरा आहार त्यांना निषिद्ध आहे जेवतांना भिक्षूंना मौनव्रत ठेवावें लागतें त्यांचा पोषाख साधा असतो भिक्षूंनीं द्रव्यसाधन करावयाचें नाहीं, हा पूर्वीचा नियम आतां कोणी फारसा पाळीत नाहींत तथापि एकंदरीत वर्तनाचे नियम बरेच काळजी-पूर्वक पाळतात. पण बुद्धाच्या शिकवणीचा अंतरात्मा-शुद्ध व पवित्र चारित्र्य-मात्र त्यांच्या वर्तनांत नसतो भिक्षु मांसाहार करीत नाहीत, पण पशूंची शिकार करतात, खोटें बोलतात, जुगार खेळतात, वहून दरसाल तसमुद्रा घेतात, फार काय, पेटलेल्या अग्नींत आपल्या देहाची आहुती सुद्धां देतात, पण वर्तनांत नीति आणि अनीति यांना विशेषसा विधिनिषेध ठेवीत नाहींत.

बौद्धभिक्षूशिवाय चीन देशांत बौद्धधर्मी तापसी पुष्कळ आहेत हे पर्ण-कुटींतून किंवा गिरिकंदरांतून राहतात, व उदरपोषणापुरतें गांवांत येऊन भिक्षान्नावर किंवा मठांतून मिळालेल्या अन्नावर निर्वाह करतात हे भिक्षूंसारखें श्मश्रू करीत नाहींत. उलट आपल्या गोसाव्यांसारखे लांब लांब जटा वाढवितात

या देशांतल्या शास्त्रग्रंथांत महायान व हीनयान या दोन्ही पंथांतल्या ग्रथांचें मिश्रण आहे तेथें कांहीं फार सुंदर अक्षरांनीं लिहिलेले व सुवर्णादि मूल्यवान् धातु जडविलेले जुने शास्त्रग्रंथ आहेत आपल्या इकडल्याप्रमाणें

जुन्या पोथ्योची सुरी पानें खाली वर लाकडी फळ्या पाळून सुरक्षित ठेविलेली असतात. मोठाल्या मठांतून जुन्या शास्त्रग्रंथांच्या शुद्ध आवृत्ति छापण्यासाठीं छापखाने ठेविले आहेत. तेथें हे ग्रंथ व साधुसंतांच्या तसबिरी वगैरे विकत मिळतात.

टाओधर्मांत जसे धर्माधिक यांवर देखरेख करणारे वरिष्ठ अधिकारी आहेत, तशी व्यवस्था बौद्धधर्मासंबधानें नाहीं. एकेका मठापुरता एक मठाधारी असतो; पण एकदर सर्व धर्मसंस्थांवर देखरेख करणारा असा कोणी नाहीं. अलीकडे सरकारानें ही उणीव अंशतः दूर केली आहे.

इतर कोणत्याही बौद्धधर्मी देशांत दिसणारी एक विलक्षण गोष्ट चीन देशांत दिसते ती ही कीं, बौद्ध भिक्षुविषयीं सामान्य लोकांत आदरबुद्धि तर नाहींच, पण नुसती सहानुभूति सुद्धा नाहीं. हे भिक्षु म्हणजे लोकांच्या दृष्टीनें आळसाचे पिंड आहेत. यामुळें वरच्या वर्गांतले कोणी आपल्या मुलाला भिक्षूची दीक्षा घेऊं देत नाहींत. आणि त्यामुळें बहुतेक नीच प्रतीच्या समाजांतून हे भिक्षु आलेले असतात. याशिवाय या भिक्षूंना मठात जें शिक्षण मिळतें, तेंहि केवळ बौद्धग्रंथांचें आणि अध्यात्मविषयापुरतें; व त्या विषयांत सामान्य लोकांना गम्य नसतें. इतकेंच नाहीं, तर बौद्धधर्माचें शिक्षण एके प्रकारें राष्ट्राच्या उन्नतीस विघातक होणारें आहे, असा लोकांचा समज झालेला आहे. या भिक्षूंचें वर्तनहि पुष्कळ वेळां निंद्य प्रकारचें असतें. त्यांना धनलोभ सोडीत नाहीं, ब्रह्मचर्याचें व्रत त्यांच्यानें पाळवत नाहीं, व इतर दुर्गुणांचा ही प्रसार त्यांच्यांत पुष्कळ आहे.

बौद्धभिक्षूंविषयीं चिनी लोकांचें जरी इतकें वाईट मत आहे, तरी अनन्यगतिकत्वामुळें हे लोक भिक्षूंना नित्यनैमित्तिकांसाठीं आपले घरीं बोलावतात, त्यांना दक्षिणा देतात, व त्यांच्याकडून अवश्यक धार्मिक कृत्यें करवितातच. भोळे लोकांत या भिक्षूंचें माहात्म्य अधिक आहे. नवस करणारे, शकुन पाहणारे, चेटुकावर श्रद्धा ठेवणारे वगैरे लोकांपासून या भिक्षूंना चांगली प्राप्ति होते, आणि त्यांच्याच जिवावर मठांचा दांडगा खर्च वर्षानुवर्ष चालत आला आहे. यात्रा करण्यानें पापापासून मुक्ति व पुण्याचा लाभ घडतो, हा समज चिनी लोकांत प्रबळ आहे. अशा यात्रेकरूंच्या बुद्धांच्या सुद्धा बोधिसत्वांच्या चार

प्रमुख मंदिरांना जात असतात अशा यात्रांसाठीं आलेल्या यात्रेकरूना मंत्राचे ताईत किंवा गूढ चिन्हें काढलेलीं कागदावरचीं यंत्रें हे भिक्षु देऊन त्यांचेपासून द्रव्य काढतात.

बौद्धभिक्षूंनीं दुसरें कांहीं कार्य केलें नसलें तरी एक मोठें कार्य केलें आहे. चिनी लोकांच्या सर्वभक्षणप्रवृत्तीला त्यांनीं आपल्या सात्त्विक आहाराच्या बद्दल हरणानें पुष्कळ निर्बंध घातला आहे, यांत शंका नाहीं. निवृत्तमांसाहारी असा एक स्वतंत्र पंथच त्यांच्या प्रयत्नानें निर्माण झाला आहे. या पंथाच्या लोकांनीं हिंसेचा त्याग केला आहे, इतकेंच नाहीं, तर त्याबरोबर मूर्तिपूजा वगैरे अस्सल बौद्धधर्माला विरुद्ध अशा गोष्टींचा सुद्धां त्याग केला आहे. पण आश्चर्याची गोष्ट आहे कीं, या पथांतल्या लोकांनीं उघडपणें तसा उपदेश लोकांना केल्यास सरकारी अधिकाऱ्यांकडून त्यांचा छळ होतो! आणि त्याहून आश्चर्याची गोष्ट ही कीं, हे सरकारी अधिकारी बाहेरून जरी बौद्धधर्मासंबंधानें तिरस्कारव्यंजक उद्गार काढतात, आणि धार्मिक वृत्तीच्या माणसांचा छळ करतात, तरी अंतर्यामीं—विशेषतः 'कृतांतकटकामलध्वजा' त्यांच्या शिरावर फडकू लागली म्हणजे स्वतः च बौद्धधर्माविषयीं भाविक आणि श्रद्धावान् बनून घरांत कोणी न पाहील अशा ठिकाणीं बुद्धाची मूर्ति समोर ठेवून भजन, ध्यान, व चिंतन करतात! भिक्षूंना गुपचिप दक्षिणा देतात, आणि त्यांचा सन्मान करतात!

बौद्ध धर्माचा चिनी वाङ्मयावरही पुष्कळ परिणाम घडला आहे. त्या वाङ्मयांत बुद्धाच्या जातकांमधील निवडक कथानकांवर उत्तम कादंबऱ्या रचिल्या गेल्या आहेत व लोक त्या मोठ्या आवडीनें वाचतात. चित्रकलेवरही असाच परिणाम झालेला आहे. नामांकित चिनी चित्रकारांमध्यें भिक्षूंचा संख्या मोठी आहे.

कोरिया—या देशांत बौद्धधर्म अत्यंत अवनत अवस्थेंत आहे. आळस, उदासीनता, विरवाद वगैरे कोरियन लोकांच्या स्वभावांतलीं लक्षणें बौद्धधर्माला बाधक झालीं आहेत. तेथील बौद्ध मठांचा संख्या कमी झाली आहे. तथापि

बौद्धधर्म त्या देशांतून नष्ट झाला आहे, असें मात्र नाहीं चिनी लोकांप्रमाणें कोरियन लोकांमध्येंही भिक्षुविषयीं फार प्रतिकूल मत आहे, तरी लोकांकडून मठांना आश्रय मिळावयाचा तो मिळतोच आहे विशेष हें आहे, कीं, कोरियांत राज्यकर्त्यांकडूनही बौद्धधर्माला आश्रय मिळत आहे

मूळच्या बौद्धधर्माच्या मतांत आणि सध्या कोरियांत प्रचलित असलेल्या बौद्धधर्मांत पुष्कळच फरक आहे. याचें कारण चिनी लोकांची पूर्वजपूजेची कल्पना कोरियन लोकांना फार प्रिय आहे, व शिवाय त्यांत कोरियन लोकांच्या मूळ धर्मांतल्या मद्रिपूजा, प्राणिपूजा वगैरे रूढ होऊन असलेल्या कल्पनांची भर पडली अलीकडे अलीकडे तर या जुन्या कल्पनांचें पुनरुज्जीवन होत आहे

जपान—जपानी लोक स्वभावतःच स्वातंत्र्यप्रिय आहेत, आणि ही त्यांची स्वातंत्र्यप्रियता या देशांतल्या बौद्धधर्माच्या इतिहासांतही स्पष्ट दिसून येते गोतमबुद्धाचीं मूळ मतें कांहीं विशेष रीतीनें आचरणांत आणण्यासाठीं (दुसऱ्याचें अनुकरण न करतां) या लोकांची पूर्वीपासून खटपट आहे अलीकडे पाश्चात्य विद्या आणि प्राच्य बौद्धधर्म यांचें योग्य समेलन घडवून आणण्याच्या स्तुत्य उद्योगास ते लागले आहेत १८६८ सालीं जपानमध्यें मोठी क्रांति घडून आली, तेव्हांच तेथील सरकारानें बौद्धधर्माला आश्रय देण्याचें बंद केलें पण मागून बीसपंचवीस वर्षांनीं सरकारला आपली चूक कळून आली, आणि पाश्चात्यांचें अंध अनुकरण करण्यानें राष्ट्रीय स्वत्वाची हानि होईल हा विचार दूरदर्शी मुत्सद्यांच्या डोक्यांत येऊन त्यांनीं बौद्धधर्माला दुप्पट जोरानें प्रोत्साहन दिलें आणि बौद्धधर्माच्या ख या कल्पना लोकांत जितक्या ज्यास्त प्रगृत होतील तितक्या करण्याकडे त्यांचें लक्ष लागलें तथापि नुसत्या बौद्धधर्मावर अवलंबून न राहतां राष्ट्रीय उन्नतीचा पाया जितका ज्यास्त दृढ करतां येईल तितकें चांगलें, या समजुतीनें शिंटोचा धर्म, कनफ्यूशियसचा नीति आणि बुद्धाचें तत्वज्ञान यांचें संमिश्रण करण्याचा प्रयत्न चालले आहेत

पण हें उच्चप्रतीच्या व सुशिक्षित लोकांच्या विचाराच्या प्रवाहाविषयीं झालें. ग्रामीण व अशिक्षित लोकांमध्यें धर्मभोळ्या समजुती व बुद्धिवादाला सोडून असलेले आचारविचार पुष्कळच आहेत तिबेटी लोकांप्रमाणें जपानी लोकांत

धर्मचक्राचा प्रचार आहे मात्र त्यांत मंत्राचे कागद नसतात. नुसतेंच चक्र असतें,
किंवा आतली पेटी फिरती असून तींत धर्मशास्त्राचें पुस्तक ठेविलेलें असतें.
हीनयानाप्रमाणें बुद्धाच्या पदचिन्हाचें माहात्म्य आहे

महायान पंथाप्रमाणें जपानी बौद्धधर्म हा हिंदुधर्मांतल्या, शिंटोधर्मांतल्या,
व त्याचप्रमाणें चीनच्या मूळच्या टाओ-धर्मांतल्या देवतांनाही मानतो. ऐति-
हासिक बुद्ध, अवतारी बुद्ध आणि बोधिसत्व या तिघांचेंही ते सभिभ्रम करतात
अवतारी बुद्धांत तिबेटी लोकांप्रमाणें वैरोचन व अमिताभ यांची ते गणना
करतात. पुढें येणारा मैत्रेय बुद्ध निराळ्या स्वरूपांत ते मानतात. शिंटो धर्मांतून
जपानी बौद्धधर्मानें युद्धाची देवता ( हचिमन ) ही घेतली आहे हिंदुधर्मां
तल्या पौराणिक गरुड व अप्सरा यांच्या मूर्ति घेतल्या आहेत

जपानी भिक्षूंना विवाह करण्याची मुभा आहे जपानी भिक्षु बहुतेक सर्व
बाबतींत चिनी भिक्षूंप्रमाणें राहतात त्यांचा समाजांत मानही तितकाच आहे
जपानी बौद्धधर्मांत भिन्न भिन्न पंथ मात्र असंख्य आहेत

जपानी लोक बौद्ध तत्वज्ञानाला अगदीं पारखे आहेत ते त्याची मुळींच
पर्वा करीत नाहींत बाह्य आचारांना मात्र ते महत्व देतात या बाबतींत
चिनी बौद्धांच व त्यांचें अतिशय साम्य आहे.

ब्रह्मदेशाप्रमाणें जपानांतही बौद्धधर्माची सुधारणा करण्यासाठीं नव्या
सुशिक्षितांच्या संस्था निर्माण झाल्या आहेत व त्या ग्रंथ छापवून, चोपडीं वाटून,
व्याख्यानें देऊन आणि भिक्षारी पाठवून बौद्धधर्माला त्याचें प्राचीन वैभव व
सांप्रतच्या सुधारलेल्या जगांत प्रतिष्ठेची जागा मिळवून देण्याची महत्वाकांक्षा
धरून आस्थेनें यत्न करीत आहेत

भाग पहिला समाप्त.

---

व क्षणभंगुर सुखाच्या मार्गे लागून शाश्वत सुखाला विसरतो, व त्यामुळे मृगजळाच्या मागें लागलेल्या माणसाप्रमाणें आपली पदोपदीं निराशा व फसगत होऊन दुःखाचा वाटा मात्र उचलावा लागतो. या दुःखांतून सुटण्याचा मार्ग अज्ञानामुळें आपला आपणांस सांपडत नाहीं. ही जी भ्रांति पडते तिलाच संसार म्हणतात; आणि या संसारांतून उद्धरून जाण्याचा मार्ग दाखविणारे गुरु ते बुद्ध होत. तन्हा (तृष्णा) म्हणजे वासना ही सगळ्या दुःखांचें, जन्माचें, पुनर्जन्माचें व मरणाचें मूळ आहे. या लोकीं किंवा परलोकीं जीविताचा लोभ करणें आणि जीवित सुखमय व्हावें म्हणून मला हें पाहिजे, तें पाहिजे, किंवा अमकें नको, तमकें नको, असें समजून इष्ट गोष्टींच्या प्राप्त्यर्थ किंवा अनिष्ट गोष्टींच्या परिहारार्थ धडपडणें, यापासून दुःखाची उत्पत्ति असल्यामुळें अविद्येचा नाश करून आणि चार आर्यसत्यें व अष्टांगिक मार्ग यांचें ज्ञान करून घेऊन मनुष्याला निर्वाणप्राप्ति करून घेतां येते—दुःखमुक्त होऊन शाश्वतसुख अनुभवतां येतें—असें बौद्ध समजतात. हीं चार आर्यसत्यें म्हणजे (१) दुःखाचें रहस्य, (२) दुःखाचें कारण, (३) दुःखाचें निराकरण आणि (४) त्या निराकरणाचा मार्ग हीं होत.

भोगानें दुःखाचें निराकरण करतां येईल असा जो आर्य अष्टांगिक मार्ग तो जाणणें, हें चवथें आर्यसत्य.

**आर्य अष्टांगिक मार्ग**—वर जो मार्ग सांगितला त्याला आठ अंगें असल्यामुळें ' अष्टांगिक मार्ग ' अशी संज्ञा बौद्ध ग्रंथकारांनीं दिली आहे. तीं अंगें म्हणजे १ सम्यक् दृष्टि, २ सम्यक् संकल्प, ३ सम्यक् वाक्, ४ सम्यक् कर्मान्त, ५ सम्यक् आजीव, ६ सम्यक् व्यायाम, ७ सम्यक् स्मृति व ८ सम्यक् समाधि हीं होत.

हीं जीं चार सत्यें व अष्टांगिक मार्ग बुद्धानें जगापुढें मांडलीं आहेत तीं ' शास्त्रवाक्यं प्रमाणम् ' म्हणून खरीं माना, असा त्याचा आग्रह नाहीं. कोणतीही गोष्ट स्वतःला प्रत्यय आल्यावांचून केवळ अंधश्रद्धेनें खरी मानून चालण्यास सांगणें हें बौद्धधर्माचें ब्रीदच नाहीं, उलट तसें सांगणें म्हणजे अष्टांगिक मार्गाच्या हेतूविरुद्ध वागणें आहे. ' फारशा चिकित्सा करूं नका, ज्ञानवृक्षाचें फळ चाखूं नका, तें तुमच्या जिज्ञासेला जागृत करील आणि असें कां आणि तसें कां नाहीं, अशी भेदक दृष्टि उत्पन्न करून दुःखाला कारण होईल ' असें भगवान् बुद्धांनीं कोठेंही म्हटलें नाहीं. उलट जें बुद्धीशीं वैर करणारें, युक्तीशीं विसंगत आणि विचिकित्सक बुद्धि व शास्त्रीय शोध यांच्या पुढें न टिकणारें तें माझ्या उपदेशांत कधीं यावयाचें नाहीं अशी बुद्धाची प्रतिज्ञा असे. या जगांत दुःख आहे, ही गोष्ट प्रत्येकाच्या अनुभवांतली आहे. हातच्या कांकणाला आरशाची जशी जरूरी नाहीं, तशी तृष्णा आणि भय यांच्यापासून उत्पन्न झालेल्या व या जगांत जागोजागीं दिसणाऱ्या या हजारों प्रकारच्या विपत्तींना व दुःखांना निराळ्या पुराव्याची जरूरी नाहीं. या जगांत दुःख नाहीं म्हणणारांनीं दवाखान्यांतून, तुरुंगांतून, समरभूमीवरून किंवा दिवाणी आणि फौजदारी कोर्टांतून हिंडावें, रस्तोरस्तीं हिंडणाऱ्या या भिकाऱ्यांकडे पहावें, किंवा पोराबाळांचें लटांबर मागें असलेल्या आणि यांचा चरितार्थ कसा चालवावा या विवंचनेंत पडलेल्या एखाद्या कारकुनाच्या किंवा शिपायाच्या मनाची परीक्षा करावी. फार काय, पण स्वतःच्याच चरित्राकडे दृष्टि फेंकून सूक्ष्मदर्शीनें आत्मपरीक्षण करावें. म्हणजे जगांत दुःख आहे कीं नाहीं, याविषयीं खात्री

होईल, व त्याप्रमाणेंच हें सारें दुःख तृष्णेमुळें उत्पन्न झालें आहे, हेंही लवकरच ध्यानीं येईल. सुख म्हणजे प्रत्यक्ष काय आहे तें कांहींच कळत नाहीं. एखाद्या वस्तूविषयींची तृष्णा अथवा इच्छा होणें ही सुखाच्या पूर्वींची पायरी असते. त्या वस्तूची प्राप्ति झाली का इच्छा तृप्त होते, आणि तिच्याबरोबर सुखही लय पावतें. अमकी वस्तु आपल्याजवळ नाहीं असें वाटणें हें दुःख, व तें नाहींसें करणें यालाच आपण सुख म्हणतों. माणसाच्या दुसऱ्या सगळ्या तृष्णा तृप्त केल्या, तरी जरामरण चुकावें व अक्षय सुख भोगीत राहावें असें त्याला वाटत असतें. ही तृष्णा कशी नाहींशी करावयाची, हा मोठा प्रश्न आहे इतर धर्म सृष्टीची उत्पत्ति आणि तिचें अनादित्व यासारख्या प्रश्नांचा उलगडा करण्याची खटपट करतात; पण मनुष्याच्या किंबहुना प्राणिमात्राच्या हिताहिताचा संबंध ज्यांत आहे, अशा या बिकट प्रश्नाचें पृथक्करण करून त्याचें उत्तर शोधण्याच्या भानगडींत फारसे पडत नाहींत. बौद्धधर्मानें सृष्टीच्या उत्पत्तीसारखे विषय न घेतां हा दुःखविमोचनाचा प्रश्न मुख्यत्वें हातीं घेतला, हाच एक त्या धर्माचा विशेष म्हटला पाहिजे.

आर्य अष्टांगिक मार्गासंबंधानें थोडक्यांत संपूर्ण माहिती देणें अशक्य आहे. त्याची पूर्ण माहिती होण्याला बौद्ध संप्रदायांतच राहिलें पाहिजे. तथापि स्थूलमानानें या मार्गाचें दिग्दर्शन करतां येईल. विचार आणि मनें शुद्ध व निष्कलंक असावीं, नेहमीं दृष्टीपुढें उच्च ध्येय ठेवावें; सत्य, सरळ, व प्रिय भाषण करावें; प्रामाणिकपणाचें वर्तन राखावें, ज्यापासून कोणत्याही जीवाला अपाय होणार नाहीं, अशा तऱ्हेचा व्यवसाय करावा, भूतदया, सौम्यता, परोपकार वगैरे गुणांनीं युक्त अशीं कर्में आमरण नेटानें व दीर्घप्रयत्नानें करीत राहावें, मन व बुद्धि जागृत ठेवावी, शांतपणानें ध्यान, मनन आणि निदिध्यास करण्याचा संवय ठेवावी; याप्रमाणें केलें असतां काम, क्रोध, द्वेष, हिंसा, विचिकित्सा, वगैरे बंधनें सुटतात, आणि दुःख व शोक यांच्या पैलतीराला जाऊन निर्वाणरूप जो परम पुरुषार्थ तो मनुष्यास प्राप्त होतो जीविताच्या साध्याचें याहून रमणीय चित्र कवीला सुद्धां आपल्या अनिरुद्ध कल्पनेनें काढतां येणें अशक्य आहे.

हीं चार सत्यें बुद्धाच्या पूर्वी आर्यधर्मीयांना ठाऊक नव्हती असें नाहीं. बुद्धाच्या पूर्वीच्या आर्यवैद्यकाच्या व योगशास्त्राच्या ग्रंथांतून त्यांचा उल्लेख आहे. बुद्धानें केलें तें एवढेंच कीं, शारीरिक व्याधींसंबंधानें सांगितलेलीं हीं चार तत्त्वें त्यानें आध्यात्मिक व्याधींना लावून दाखविलीं. तथागतानें (बुद्धानें) काशी येथें पांच यतींना ही प्रथम सांगितलीं, आणि तीं सांगतांना त्यांचा स्पष्ट खुलासा केला. त्यानें त्यांना जें सांगितलें, तें थोडक्यांत सांगतां येईल, तें असें कीं, मनुष्य धार्मिक जीवनांत दोन टोंकांपैकीं कोणत्या तरी एका टोंकाकडे झुकत असतो. एक टोंक यथेच्छ सुखोपभोग घेणें, आणि दुसरें त्याच्या अगदीं उलट म्हणजे शरीराला व्यर्थ कष्ट देणें. यांच्या मधला मार्ग तो खरा मार्ग आहे. हा मार्ग म्हणजे अष्टांगमार्ग हा होय. या मार्गानें जाणारास निर्वाणाची प्राप्ति होते. दुःख, समुदय, निरोध आणि अष्टांग मार्ग या चार सत्यांचें आकलन करणें, हाच निर्वाणाचा मुख्य उपाय आहे. या जगांत जें क्षणिक आणि जड आहे, त्याच्याशीं स्वतःचें तादात्म्य करून घेण्यानें आणि क्षणिक व नश्वर अशा सुखाच्या मागें लागल्यानें निराशा, मोह, दुःख इ. गोष्टी उत्पन्न होतात. सुखाविषयींची स्पृहा स्वतः दुःखमय नाहीं, पण ती दुःखाला कारण होणारी आहे. म्हणून क्षणिक सुखाच्या मागें न लागतां ती नष्ट केली पाहिजे. ती नष्ट करणारा मार्ग म्हणजे अष्टांगमार्ग आहे. या मार्गांत चांगली श्रद्धा, चांगला निश्चय, चांगले शब्द, चांगलें कर्म, चांगले विचार, चांगलें चिंतन, चांगला यत्न, आणि चांगलें ध्यान या गोष्टींचा अंतर्भाव होतो. या अष्टांगमार्गाच्या शोधांतच बुद्धाच्या खऱ्या बुद्धिमत्तेचा प्रभाव दिसून येतो. चांगलें कर्म केलें म्हणजे झालें, त्यांत सर्व कांहीं आलें, असें सामान्य माणसास

---

१ योगसूत्रव्यासभाष्यांत म्हटलें आहे–'यथा चिकित्साशास्त्रं चतुर्व्यूहम्। रोगो रोगहेतुरारोग्यं भैषज्यमिति। एवमिदमपि शास्त्रं चतुर्व्यूहमेव। तद्यथा संसारः संसारहेतुर्मोक्षो मोक्षोपाय इति। तत्र दुःखबहुलः संसारो हेयः। प्रधानपुरुषयोः संयोगो हेयहेतुः। संयोगस्यात्यन्तिकी निवृत्तिर्हानम्। हानोपायः सम्यग्दर्शनम्।

वाटलें पण बुद्धाला तसें वाटलें नाहीं. चांगली श्रद्धा, चांगला निश्चय, चांगलें चिंतन इ. गोष्टींचें खरें महत्त्व जें सामान्य माणसाच्या लक्षांत येण्यासारखें नाहीं, तें बुद्धानें ओळखलें. मनुष्याची वागणूक आणि त्याची श्रद्धा व विचार यांचा फारकत झाल्यावर त्या वागणुकीची किंमत कांहीं राहत नाहीं. योग्य वर्तनाचा खरा उगम म्हणजे माणसाचें मन हें आहे. तो झरा मुळाशीं स्वच्छ असला पाहिजे, तरच शुद्ध वर्तनाचा प्रवाह दूषित झाल्यावांचून सतत वाहत राहील. तो मुळाशीच दूषित झाल्यावर बाहेरून जरी प्रवाहाचें पाणी निर्दोष दिसलें, तरी त्याचे अंतर्गत दोष केव्हांना केव्हां तरी आपला हानिकारक परिणाम केल्याशिवाय राहावयाचे नाहींत. म्हणून नुसते आचार शुद्ध ठेवण्यावर सारा कटाक्ष न ठेवतां बुद्धानें त्या आचारांचा उगम शुद्ध ठेवण्याविषयीं उपदेश केला आहे.

बुद्धानें चार आर्यसत्यांत प्रथमनिर्देश दुःखाचा केला आहे. या जगांत दुःख आहे किंबहुना दुःख हें सर्वव्यापी आहे—याविषयीं कोणी शंका घेईल असें वाटत नाहीं. जगांतल्या दुःखाच्या अस्तित्वाकडे दुर्लक्ष करून चालावयाचें नाहीं. तसें करणें आणि जग हें केवळ सुखमय आहे असें प्रतिपादणें हें, दुर्भिक्षाच्या काळांत अन्न अन्न करणाऱ्या प्रजेला धान्य नाहीं तर तूपसाखर खाऊन दिवस काढण्यास सांगणाऱ्या बादशहाप्रमाणें मूर्खपणाचें आहे. जगांत दुःख आहे यांत शंका नाहीं. दुःखानें सारें जग व्यापिलें आहे. पण या दुःखाचें निदान काय आहे, तें जगांत कोठून आलें, याची मीमांसा करणें हें शहाण्या माणसाचें मुख्य कर्तव्य आहे. दुःखापासून मुक्त होण्याचा मार्ग शोधून काढला पाहिजे. नुसतें दुःख आहे म्हणून निराश होऊन बसण्यांत पुरुषार्थ नाहीं. दुःखनिवृत्तीचा उपाय शोधून काढणें हाच धर्माचा मुख्य विषय आहे. हें जग कसें निर्माण झालें, आणि पुढें त्याचें काय होणार, देवदूत कोठें राहतात, सृष्टि ही क्षणमात्रांत निर्माण झाली की ती निर्माण करण्यास देवाला सहा दिवस लागले, वगैरे गोष्टींचा काथ्याकूट करण्यांत अर्थ नाहीं. अशा गोष्टींना बुद्धानें 'अव्याकृतानि' (म्हणजे रहस्यें) असें नांव दिलें आहे. असल्या अव्यक्त गोष्टींची चर्चा, दुधाचा आकार कसा असतो तें पाहण्यासाठीं धावपळणा या आंधळ्यांच्या

गोष्टीसारखा निष्फळ आहे. बुद्धानें अशी चर्चा बुद्धिपुरःसर टाळली आहे, आणि जगांत यथेच्छ संचार करणाऱ्या सर्वव्यापी दुःखाच्या निदानाचा पाठ साचा प्रश्न हातीं घेऊन त्याची बारकाईनें शहानिशा केली आहे दुःखापासून सर्वतोपरी मुक्त अशा मार्गाचा शोध मनुष्यजाति अजपर्यंत करीत आला आहे आणि आपल्या कल्पना आणि बुद्धि यांच्या विलासानें प्रार्थना, मंत्रतंत्र, यज्ञयाग इ दुःखापासून मुक्ति मिळविण्याचीं साधनें मनुष्यप्राण्यानें कल्पिलीं आहेत या साधनांची निष्फलता बुद्धाला स्पष्टपणें दिसून आली आणि त्यानें दुःख हें ईश्वरी क्षोभामुळें उत्पन्न झालेलें नाहीं, तर मनुष्याच्या अविद्येचा हा परिणाम आहे. मृत्यु पापमूलक नाहीं, मृत्यु आणि जीवन हीं अविभाज्य आहेत, मनुष्याचें जीवन ही एक सत्कीर्ति आहे, ज्याच्या त्याच्या कर्माप्रमाणें सुखाचा किंवा दुःखाचा वाटा त्याला मिळत असतो, आपलें जीवित दुःखापासून मुक्त करण्याची किल्ली त्याच्या हातांत आहे, निराश होण्याचें कारण नाहीं, इ उपदेश करून मनुष्याच्या अंतःकरणांत नवी उमेद, नवी आशा व नवीन भवितव्य याचा संचार करून दिला आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

**प्रतीत्यसमुत्पाद**—या भवलोकींच्या जीवांच्या दुःखांचें बुद्धानें केलेलें निदान प्रतीत्यसमुत्पाद ( म्हणजे कार्यकारणसंबंध या ) नांवानें बौद्धग्रंथांतून प्रसिद्ध आहे या निदानपरंपरेंत अविद्या, संस्कार, विज्ञान, नामरूप, षडायतन, स्पर्श, वेदना, तृष्णा, उपादान, भव, जाति आणि जरामरण अशा बारा निदानांचा अंतर्भाव होतो विषयाचा भावार्थ चांगला समजण्यासाठीं या बारा निदानांचें स्पष्टीकरण प्रथम केलें पाहिजे

१ अविद्या—विद्या म्हणजे ज्ञान, अर्थात् अविद्या म्हणजे ज्ञानाचा अभाव किंवा अज्ञान. स्थूलमानानें हा अर्थ बरोबर आहे पण तत्त्वतः अज्ञान आणि भ्रांतज्ञान यांच्यांतला सूक्ष्म भेद पाहूं शकतात बौद्ध पंडित म्हणतात कां, जगासंबंधाचें आमचें ज्ञान हें सत्यज्ञान नाहीं, तो एक भ्रम आहे—भ्रांतज्ञान आहे सांप्रतच्या काळचे अज्ञेयवादीही असेंच म्हणतात जगाचें यथातथ्य स्वरूप समजण्याचा प्रयत्न व्यर्थ आहे असेंच त्यांचें म्हणणें आहे वेदांत्यांचा मायावाद हाही भ्रांतवादच म्हटला पाहिजे

२ संस्कार—या शब्दाचा खरा अर्थ कोणता हें निश्चित करण्याचें काम फार कठीण आहे. बौद्धदर्शनांत पाच स्कंध सांगितले आहेत, त्यांतल्या तिसऱ्या स्कंधाचें नांव संस्कार हें आहे. या पंचस्कंधाचें विवेचन पुढें येणारच आहे. पण स्कंधांतला संस्कार आणि निदानांपैकीं एक असलेला संस्कार यांच्यांत काय भेद आहे तें स्पष्टपणें कोठें सांगितलेलें माझ्या पाहण्यांत नाहीं. तथापि उदाहरणांनीं हा भेद दाखवितां येईल. बौद्ध आचार्यांनीं संस्काराचे ५२ प्रकार सांगितले आहेत. त्यांतला स्पर्श हा एक प्रकार आहे. स्पर्श म्हणजे बाह्य वस्तूशीं घडणारा योग. दुसरा एक प्रकार आहे. त्याचें नांव वेदना—म्हणजे स्पर्शापासून येणारा अनुभव. स्मृति, वितर्क, विचार, प्रीति, मोह, लज्जा, करुणा इ. मानसिक व्यापार हेही अनेक निरनिराळ्या प्रकारचे संस्कार आहेत. आतां समजा कीं, आपण चाललों असतां एकाएकीं एक सर्प आपल्या पुढें आला. त्याच्या चकचकीत स्वरूपाचा आपल्या दृष्टीचा योग (स्पर्श) घडल्याबरोबर आपल्या मनावर घडणारा परिणाम ही वेदना; त्याचा फूत्‌फूत्‌ शब्द श्रुतिगोचर झाल्याबरोबर होणारा परिणाम तीही वेदनाच. या दोन्ही वेदनांमुळें पूर्वस्मृति होऊन हा साप आहे हें ज्ञान होतांच, आतां काय करावें यांविषयीं मनांत येतो तो वितर्क किंवा विचार, नंतर पलायन करण्याची बुद्धि तो मोह, याप्रमाणें क्रमाक्रमानें मनाचे जे व्यापार चालतात, त्या सगळ्यांचा समावेश बौद्धदर्शनकार 'संस्कार' या एका शब्दांत करतात. याप्रमाणें रूप, रस, मय, इ. सर्व संस्कार मिळून आपलें अंत शरीर झालेलें आहे. आपल्या अंतःशरीराचे संस्कार हे निरनिराळे अवयव आहेत. पण हे सगळे जुळविले म्हणजे अंत शरीर संपूर्ण होतें काय? तर नाहीं. त्याला आणखी एका गोष्टीची आवश्यकता आहे. ही गोष्ट म्हणजे विज्ञान ही होय.

३ विज्ञान—याला बरोबर इंग्रजी शब्द Consciousness हा देतां येईल. रूप रस, गंध, स्मृति, हर्ष, रुजा प्रभृति संस्कारांना एकत्र करून त्यांची योग्य जागीं स्थापना करणें, विस्कळितपणा न येऊं देतां त्यांच्यांत संबंध राखणें, व त्यांना योग्य कार्यांना लावणें हें काम विज्ञानाचें आहे. सापाचें स्वरूप दृष्टीनें पाहणें व त्याचा शब्द कानांनीं ऐकणें यांच्यांत जर संबंध नसेल,

तर हा सर्प आहे हें ज्ञान होणार नाहीं. हा संबंध जोडून देणारी खोलजी विज्ञान ही आहे.

४ नामरूप—यांपैकीं 'नाम' म्हणजे अंतर्जगत् किंवा मनोजगत् आणि 'रूप' म्हणजे बाह्यजगत् किंवा जडजगत्. बौद्धांच्या मतें या दोन गोष्टींमध्यें सगळ्या जगाचा अंतर्भाव होतो. हें नामरूप पांच स्कंधांचें झालें आहे. पैकीं एकटें 'नाम' हें वेदना, संज्ञा, संस्कार व विज्ञान या चार स्कंधांच्या संयोगानें व 'रूप' हें पंचमहाभूतांची समष्टि असा जो पांचवा स्कंध त्याचें झालें आहे येथें वेदना=अनुभूति ( Seasation ), संज्ञा=प्रतीति ( Perception ), संस्कार=वेदना व संज्ञा यांव्यतिरिक्त इतर गोष्टी मिळून होणारी चित्तवृत्ति, व रूप=प्रतीति ( Phenomenon ) असा अर्थ घ्यावयाचा.

५ षडायतन—म्हणजे षडिंद्रियें. प्रचलित भाषेंत इंद्रिय म्हणजे शरीराचा एक अवयव असा अर्थ घेतात. पण दर्शनशास्त्रांत रूपरसादि ज्ञानसंग्रहाच्या शक्तीला हें नांव आहे, हें येथें ध्यानांत ठेविलें पाहिजे.

६ स्पर्श-म्हणजे सहा इंद्रियांशीं बाह्य जगताचा घडणारा संबंध

७ वेदना—याचा अर्थ वर सांगितलाच आहे। वेदना=बाह्यजगताची अनुभूति.

८ तृष्णा—म्हणजे बाह्यजगाशीं अंतर्जगताचा संबंध कायम ठेवण्याचा इच्छा. इंग्रजींत will, desire, appetite वगैरे शब्दांनीं हा अर्थ व्यक्त करतात.

९ उपादान-म्हणजे अनुराग अथवा आसक्ति.

१० भव—अस्तित्व ( Existence )

११ जाति—जन्म, उत्पत्ति.

१२ जरामरण—वृद्धपण व मृत्यु.

बारा निदानांच्या अर्थाचा हा खुलासा झाला. या अर्थासंबंधानें कोणाचा मतभेद नाहीं. या निदानशृंखलेच्या एकंदर अर्थासंबंधानें भिन्न लेखकांचीं भिन्न मतें आहेत. तरी ही शृंखला म्हणजे अभिव्यक्ति ( evolation ) आहे, याविषयीं सर्वांचें एकमत आहे. अभिव्यक्ति खरी, पण कशाची ! हा प्रश्न येथें उपस्थित होतो. याचें उत्तर ही जरामरणाची अभिव्यक्ति आहे. हें जरामरण

कोठून आलें? खिस्ती धर्मग्रंथांत 'जरामरणाची उत्पत्ति' (origin of evil) या मोठ्या गहन प्रश्नाची मीमांसा केली आहे. पण तिच्यापेक्षां भगवान् बुद्धानें केलेली मीमांसा निःसंशय अधिक सुसंगत आणि योग्यतेची ठरते. जरामरणाचें मूळ अविद्या, अविद्येपासून संस्कारांची उत्पत्ति, संस्कारांपासून विज्ञान, त्यापासून नामरूप, व त्यापासून षडायतन; याप्रमाणें क्रमाक्रमानें जरा-मरणापर्यंत बुद्धानें नीट साखळी जुळवून दिली आहे.

भवचक्र—बुद्धानें निर्णीत केलेल्या या बारा निदानांचें चित्र भवचक्र या नांवानें प्रसिद्ध आहे. अजंठा येथील लेण्यांत भवचक्राचें चित्र आहे. मि॰ वॅडेल साहेबानें तिबेटांतूनही असेंच एक भवचक्राचें चित्र आणिलें आहे. तें या चित्राशीं जुळतें. भवचक्र म्हणजे संसाररूपी एक चक्र, ...राग, द्वेष व मोह कपोत, सर्प व शूकर यांच्या मूर्ति आहेत. ...ष्यजीवनाचा साम इतिहास दिले त. या चाकाच्या घांसेवर मनुष्य एका आंधळ्या उंटाला चालवि-णारा वर्णिलेला आहे. ...ही आंधळा उंट म्हणजे अविद्येनें अंध झालेला मनुष्य, ...त्याला चालविणारा म्हणजे कर्म. पूर्वजन्मींच्या कर्मानें या जन्मीं मनुष्य आंधळ्या उंटाप्रमाणें अविद्यारूपी निद्रेंत सांपडून कसा भ्रमण करीत असतो, हें या चित्रांत दाखविलें आहे. दुसऱ्या घरांत कर्मरूपी कुंभार संस्काररूपी चिख-लानें मनुष्याच्या अंत शरीररूपी घटाची रचना करीत आहे, असें दाखविलें आहे. तिसऱ्या घरांत वानराचें एक चित्र आहे. हें चित्र मनुष्याच्या विज्ञानाच्या अपू-र्णतेचें व अपकर्षाचें निदर्शक आहे. चौथ्या घरांत एक वैद्य रोग्याची नाडी पाहत आहे, असें चित्र आहे. मनुष्यत्व बाह्य जगताशीं स्पर्शलाभ घडावा म्हणून व्याकुळ झालें आहे, हें या चित्राचें उद्दिष्ट आहे. पांचव्या घरांत मनुष्याचे डोळे बाहेर उत्सुकतेनें डोकावून पाहत आहेत, असें चित्र आहे. म्हणजे षडायतन-रूप इंद्रियसमर्थांतून मनुष्य बाह्यजगताकडे जाण्यास उत्सुक आहे. सहाव्या घरांत आलिंगनबद्ध दंपतीच्या चित्रानें असें सूचित केलें आहे कीं, अंतर्जगत् व बाह्यजगत् यांचा पतिपत्नीसारखा अभेद्य संबंध आहे. सातव्यांत एक बाण बाहेरून डोळ्यांत प्रवेश करून वेदना उत्पन्न करीत आहे, असें दाखविलें आहे.

याचा अर्थ स्पष्ट आहे. आठव्यांत सुरापानासक्त माणसाच्या चित्रानें तृष्णेची व्यक्तता केली आहे. नवव्यांत वृक्षावरचें फळ काढून येऊं पाहणाऱ्या माणसाच्या चित्रानें मनुष्याची संसारासक्ति सूचित केली आहे दहाव्यांत नववधू-चित्रद्वारें मनुष्याचें गृहस्थपणाचें जीवन वर्णिलें आहे. अकराव्यांत जननी व तिचें तान्हें मूल अशीं दोन चित्रें आहेत. यांतलें मूल म्हणजे अर्थात् जाति. पुत्रोत्पत्तीनंतर मनुष्याला आपल्या जीविताचा उद्देश कसा सफळ झालासें वाटतें व तो जरामरणाची मार्गप्रतीक्षा कशी करीत बसतो, तें या चित्रावरून दिसतें. बाराव्यांत एका हिंदोळ्यावर एक शव निजलेलें दाखविलें आहे. याप्रमाणें या बारा चक्रांत मनुष्यजीवनाच्या बारा दशा चित्रपटाच्या रूपानें दाखविल्या आहेत.

किरयेकांच्या मतें या चित्रांत सूचित केलेली अभिव्यक्ति ही शारीरिक किंवा मानसिक परिणामांची नाहीं, किंवा प्रापंचिक माणसाच्या जीवनांतल्या कववार पायऱ्यांचीही पण नाहीं; ही अभिव्यक्ति पारमार्थिक आहे. ही पारमार्थिक अभिव्यक्ति म्हणजे काय, तें प्रथम नीट कळलें पाहिजे.

स्थूल मानानें जगत् दोन प्रकारचें–१ अंतर्जगत् (mind) व २ बाह्यजगत् (matter) मानण्यांत येतें. या दोन्ही प्रकारच्या जगांत भिन्नता असून त्यांचा परस्परांशीं निश्र व्यवहार आहे. या जगाचें रूप, संबंध, व्यवहाराचें स्वरूप इ० गोष्टींसंबंधानें भौतिक शास्त्रें व तत्त्वज्ञान यांची दृष्टि भिन्न भिन्न आहे. तत्वज्ञान ज्या दृष्टीनें तिकडे पाहतें ती दृष्टि भौतिकशास्त्रवाल्यांना नाहीं. म्हणूनच तात्त्विक अभिव्यक्ति आणि भौतिक अभिव्यक्ति यांच्या अर्थांत अंतर पडलेलें आहे

भौतिक शास्त्र समजतें कीं, बाह्यजगाला आमच्याहून स्वतंत्र अस्तित्व आहे. आम्ही ज्ञानवान् जीव जेव्हां नव्हतों, तेव्हांही हें बाह्य जगत् होतें, सध्या आहे, व आम्ही नसलों तरी हें जगत् राहणारच आमचें जीवन हें सर्वथा बाह्य जगतावर अवलंबून आहे. तें आमच्यावर अवलंबून नाहीं हें बाह्यजगत् म्हणजे परिवर्तनाची एक परंपरा आहे या परंपरेंत जें अव्यक्त, अव्याकृत, अस्पष्ट व निरवयव होतें, तें व्यक्त, व्याकृत, स्पष्ट आणि सावयव दिसूं लागलें याचें नांव

भौतिक अभिव्यक्ति पण तात्विक अभिव्यक्ति यांहून अगदीं निराळी आहे. कित्येक तत्वज्ञानी म्हणतात कीं, रूपरसगंधादि ज्ञानाचे विषयांपलीकडे बाह्यजगत् असें कांहीं नाहीं ह्याचें अस्तित्व असल्याशिवाय ज्ञानाचें अस्तित्व शक्य नाहीं, आणि जें ज्ञानाला अगोचर आहे त्याला अस्तित्वच नाहीं, असें म्हटलें पाहिजे दुसरे कित्येक तत्वज्ञानी म्हणतात कीं, ज्ञानाच्या शिवाय जें कांहीं बाहेर आहे, तें रूपरसगंधादि नव्हे. रूपरसगंधादिकांच्या रूपानें तें प्रकट होतें इतकेंच. पण तें काय आहे तें सांगता येत नाहीं तें अनिर्वाच्य आहे. सांख्य या अनिर्वाच्य वस्तूला प्रकृति असें नांव देतात; स्पेन्सरासारखे तत्वज्ञानी त्याला अज्ञेयतत्व म्हणतात. बौद्ध या अज्ञेय किंवा अनिर्वाच्य तत्वाचें अस्तित्व नाकबूल करतात ते म्हणतात कीं, रूपरसगंधादिकांच्या पलीकडे कांहीं नाहीं. रूपरसादिकांच्या समष्टीलाच ते बाह्यजगत् म्हणतात अनिर्वाच्य असें कांहीं तत्व आहे असें समजणें, ही त्यांच्या दृष्टीनें अविद्या. जसें बाह्यजगतासबधानें तसेंच अतर्जगतासबधानेंही स्मृति, तर्क, शोक, हर्ष इत्यादि ज्ञानाच्या विषयापलीकडे कांहीं आहे असें समजणें, ही बौद्धांच्या दृष्टीनें भ्रांति आहे. अर्थात् त्यांच्या दृष्टीनें बाह्यजगत् व अतर्जगत् या दोघांनाही व्यावहारिक अस्तित्व असलें तरी पारमार्थिक अस्तित्व नाही ज्याप्रमाणें मृगजल किंवा गंधर्वनगरी ही केवळ स्वप्रवृत्ति–आधारहीन ज्ञानसमष्टि–त्याप्रमाणेंच या दोन्ही जगांचें आहे त्यांच्या मतें आत्म्याची कल्पना मिथ्या आहे. जगाचें स्वरूप जें दिसत आहे तें बौद्धांच्या मतें मिथ्या आहे. जग म्हणजे नुसते संस्कार आहेत विज्ञानामुळें ते व्यवस्थित रीतीनें मांडले गेले आहेत, आणि त्यांना नाम, रूप अशी संज्ञा मिळाली आहे अतर्जगत् व बाह्यजगत् यांच्यांतला व्यवहार षडायतन किंवा इंद्रियसमूह याच्या द्वारें चालतो इंद्रिय म्हणजे रूपप्रादिकांची प्राप्ति करून देणारी शक्ति. ही शक्ति आहे म्हणूनच बाह्यजगत् व अंतर्जगत् यांच्यांत परस्परसंबध आहे असें वाटतें. पण खरोखर दोन्ही जगें अन्योन्यसबद्ध आहेत काय? तर नाहीं. विज्ञान त्यांना जोडून देणारें आहे. या सबधाच्या निरनिराळ्या पायऱ्या दाखवून कार्यकारणभाव दाखविणारी जी शृंखला, तिचेंच नांव प्रतीत्यसमुत्पाद बाह्य

जगताचें ज्ञान म्हणजे काय? तर बाह्यजगत् व अंतर्जगत् यांच्यातला स्पर्श, त्याचें फळ वेदना (रूपादिकांचा आविर्भाव) त्याचा परिणाम तृष्णा (बाह्यजगत् व अंतर्जगत् यांच्यातला व्यवहार कायम राखण्याची इच्छा), तिचा परिणाम उपादान किंवा आसक्ति (अहंप्रत्ययाचा आविर्भाव होण्याची हाच जागा), त्याचेंच नांव भव किंवा जाति किंवा मनुष्यजन्म, व पुढें जरामरण अथवा दुःख. ही अभिव्यक्ति स्पष्ट करून देणारें जें मत त्याला प्रतीत्यसमुत्पाद असें नांव आहे. भौतिकशास्त्रांतली अभिव्यक्तीची मीमांसा याहून भिन्न आहे, हें सांगावयास नकोच.

या अभिव्यक्तीचा परमार्थाशीं दुःखविमोचनाशीं -कसा संबंध येतो, तें भगवान् गौतमबुद्धानें उत्तम प्रकारें दाखविलें आहे. नाम व रूप मिळून हें जगत् होतें. हें जगत् अंतर्जगत् व बाह्यजगत् अशा दोन रूपांत विभक्त होतें. त्यांच्यांत परस्परसंबंध घडतो त्याचें फळ तें दुःख. या दुःखाच्या निवारणाचा उपाय म्हणजे चार आर्य सत्यें. म्हणजे दुःख ही व्याधि, प्रतीत्यसमुत्पाद हें व्याधीचें निदानतत्त्व, अष्टांगिक मार्ग हा व्याधिनिवारणाचा उपाय (औषध), आणि या औषधाची योजना करणारा वैद्यराज गौतमबुद्ध. नाम व रूप यांना पारमार्थिक अस्तित्व नाहीं. त्यांच्या आंत अनिर्वाच्य असें कांहीं नाहीं. तीं क्षणिक आहेत हें प्रतीत्यसमुत्पादाचें पाडस्यांत तात्पर्य आहे. नामरूप मिथ्या झालें म्हणजे दुःखही मिथ्या झालें पाहिजे, आणि असें ज्ञान झालें म्हणजे दुःखाचा निरास झालाच. तेव्हां हें ज्ञान प्राप्त करून घेणें (सम्यक् संबोधि) हाच दुःखनिवारणाचा उपाय आहे. हें ज्ञान अष्टांगमार्गानें होतें व त्यानेंच निर्वाणाचा लाभ होतो. याच उपायानें भगवान् बुद्धानें निर्वाण प्राप्त करून घेतला व इतर सर्वांनीही तो घ्यावा, म्हणून जातिभेद न ठेवतां त्यानें त्याचा सर्वांना उपदेश केला आहे.

हा सर्व संसार दुःखमय आहे, असें बुद्ध सांगतात. पण हा दुःखमय कां आहे? तर सगळें कांहीं क्षणिक आहे म्हणून. जें क्षणोक्षणीं बदलणारें किंवा नाश पावणारें असतें तें वियोगामुळें दुःखकारक होतें, आणि सगळें क्षणिक तरी कां आहे? तर त्याची उत्पत्ति कांहीं ना कांहीं कारणापासून झालेली असते,

आणि त्या कारणाचा नाश झाला म्हणजे तें कार्य नष्ट होतें. सगळेंच क्षणिक आहे, तर या दुःखाचा नाश करण्याचा उपाय तरी कोणता ? हा उपाय म्हणजे अविद्येचा नाश-सत्यज्ञानाची प्राप्ति, आणि हें सत्यज्ञान अष्टांगिक मार्गानें गेलें असतां मिळतें

हें सत्यज्ञान तरी काय आहे ? ज्याला ' मी ' असें आपण म्हणतों त्याची उत्पत्तिही इतर गोष्टींप्रमाणें कांहीं तरी कारणापासून झाली असून तो ' मी ' क्षणिक आहे यांत शाश्वत असें कांहीं ( आत्मा ) नाहीं. हा ' मी ' कारणापासून उत्पन्न झालेला व क्षणिक असल्यामुळें अर्थातच तो वस्तुत माझा नाहीं, अशी भावना उत्पन्न होते, आणि शाश्वत असें कांहीं तरी असावें म्हणून आत्म्याचें तत्त्व आपल्या मनाच्या समाधानार्थ पुढें करण्यांत येतें बुद्ध म्हणतात—' शिष्यहो, या जेठवनांतून एखाद्यानें गवत किंवा झाडपाला नेला, आणि समजा तो जाळून टाकला, तर त्यांत आपला ' मी ' पणा त्या माणसानें नेला, असें तुम्हांला वाटेल काय ? नाहीं कारण नेलेल्या वस्तूंपैकीं तुमचें कांहीं एक नाहीं तर मग जें तुमचें नाहीं तें देऊन टाकतांना वाईट वाटण्याचें कारण नाहीं जें तुम्ही अर्पण कराल तें तुमच्या कल्याणालाच कारण होईल. त्यांतच तुमचें सुख आहे मीपणा टाकतां येईल ज्या कारणापासून त्याची उत्पत्ति झाली, त्या कारणाबरोबर त्याचाही नाश होईल.

जगांत कोणत्याही गोष्टीला वा ह्यांना कांहीं कारण आहेच त्या कारणाच्या मागें पुन दुसरें कारण, व त्याच्या मागें तिसरें कारण, याप्रमाणें कारणपरंपरा लागलेली आहे या परंपरेला अंत नाहीं. याचा अर्थ इतकाच की, संसार अनादि आणि शाश्वत आहे ही संसाराच्या अनादित्वाची समजूत आणि जन्म व मृत्यु या तीन गोष्टींच्या संयोगापासून जन्मांतरवाद उत्पन्न झाला. एका जन्माचे मागून दुसरा जन्म, त्याचे मागून तिसरा जन्म, याप्रमाणें जन्माची परंपरा लागलेली आहे, आणि या मालिकेतले मणि चिरकालिन होऊं नयेत म्हणून जणू काय ते आत्म्याच्या सूत्रांत ओंवलेले आहेत पण बुद्ध म्हणतात कीं, अविनाशी असें कांहीं नाहीं आत्मा नाहीं तर मग हे मणि परस्परांशीं कशा रीतीनें जोडले गेले आहेत ? एका जन्माचा दुसऱ्या जन्माशीं

काहीं संबंध आहे की नाही? आणि असल्यास तो संबंध कशामुळें राहिला आहे? बुद्ध या प्रश्नाचें उत्तर असें देतात कीं, एका जन्माचा अन्य जन्माशीं संबंध आहे आणि तो कर्मांच्या नियमामुळें आहे. हें कर्म म्हणजे काय, तें पुढील विवेचनावरून कळून येईल.

वर सांगितलेंच आहे कीं, या संसारांत सगळें क्षणिकच आहे; शाश्वत असें कांहीं नाहीं. ज्याला आपण 'मी' म्हणतों तोही क्षणिक आहे. त्याच्या पाठीमागें रूप, वेदना, संज्ञा, संस्कार आणि विज्ञान असे पांच स्कंध आहेत. त्यांच्या समुदायाला नामरूप अशी संज्ञा आहे. या पांच स्कंधांच्या एकीकरणापासून कर्म उत्पन्न होतें. कर्मसंचय असतो तोंपर्यंत हे पांच स्कंध एकत्र असतात, म्हणजे जीवित असतें. कर्मसंचय संपल्याबरोबर पांचही स्कंध वेगवेगळे होतात. मृत्यूमुळें कशाचाही नाश होत नाहीं. पंचस्कंध विस्कळित होणें किंवा एकत्रित होणें, यावर एकदरीनें पुनर्जन्म अवलंबून आहे. पंचस्कंध वेगवेगळे झाले तरी कर्म राहतेंच, तें नाश पावत नाहीं. ज्याप्रमाणें एखाद्यानें पत्र लिहून ठेविलें, आणि तो मरण पावला, येथें लिहिण्याची क्रिया संपली, तो लिहिणाराही गेला, तरी लिहिलेलें पत्र आहेच त्याप्रमाणें पंचस्कंध विस्कळित होण्यानें कर्म नाहींसें होतें, असें नाहीं.

कर्म—ही एक प्रकारची शक्ति आहे हिच्या योगानें एका क्रियेपासून दुसरी प्रतिक्रिया घडते—या जन्मींच्या कृतीपासून प्रतिक्रियेच्या रूपानें अन्य जन्माची उत्पत्ति होते. या जन्मांतली तृष्णा ही एक अन्तर्हित शक्ति आहे. ती कर्मांच्या रूपानें हा जन्म आणि पुढला जन्म यांच्या मधला पूलच नव्हे तर पुढील जन्म सुद्धां निर्माण करते. या तृष्णेमुळें मनुष्याला संसारांत जगावेंसें वाटतें. ही जगण्याची इच्छा त्याच्या हातून कर्म घडविते, त्या कर्मांमुळे प्रतिक्रिया उत्पन्न होऊन पुनर्जन्म प्राप्त होतो. या जन्मीं केलेल्या कृत्याची प्रतिक्रिया पुढल्या जन्मीं घडावयाची असल्यामुळें या जन्मीं जशी बरीवाईट क्रिया घडेल तसे बरेवाईट परिणाम—या कृतीबद्दल बक्षीस किंवा दंड—पुढील जन्मीं मिळेल, हे यावरून उघड झालें. कृति आहे तर तिची प्रतिकृति घडणारच पदार्थ आणि छाया यांच्यांत जसा नियमबंध आहे, त्याप्रमाणेंच या जन्मांतली कृति आणि अन्य जन्मांतली

प्रतिकृति पाण्यात आहे. पाण्यांत दगड फेंकला असतां ज्याप्रमाणें पाण्यावर तरंग उठावयाचेच, त्याप्रमाणें या जन्मीं केलेल्या कृत्यांच्या बऱ्यावाईट स्वरूपानुरूप पुढले जन्मीं बरें वाईट फळ मिळावयाचेंच.

यावर कोणी असें म्हणेल कीं, हें ठीक आहे. या जन्मींच्या बऱ्यावाईट कृत्यांचें फळ पुढील जन्मीं मिळावयाचें हें ठरलेलें आहे, तें चुकावयाचें नाहीं, येथपर्यंत व्यवस्था नीट जमली, पण प्रश्न असा आहे कीं, जर 'मी' क्षणिक आहे व या जन्मापुरताच आहे, तर पुढच्या जन्मीं मिळणारीं बरीं वाईट फळें कोण भोगणार? बुद्ध या प्रश्नाचें उत्तर असें देतात कीं, दुःखाचें ज्ञान होतें तेव्हां पुनर्जन्माचें भय वाटतें, आणि हें दुःखाचें ज्ञान केव्हां होतें? तर या संसारांत सगळें क्षणिक आहे, प्रिय वस्तूंशीं केव्हां ना केव्हां आपला वियोग होणार आहे, असें कळतें तेव्हां क्षणिकत्वाचा बोध मनाला केव्हा होतो? तर कारण व कार्य यांच्या मधल्या नित्यसंबंधाचा आपण विचार करतों तेव्हां, आणि हा नित्यसंबंध म्हणजेच कार्यबंध, म्हणजे ज्याला कर्माचा नियम समजला आहे, त्याला अर्थातच हेंही कळतें कीं, पुढचा जन्म या जन्मावर अवलंबून आहे, दोहोंचा नित्य व निकट संबंध आहे, आणि त्यानें या जन्माशीं आपलें अभिन्नत्व करून घेतल्यामुळें साहजिकच पुढच्या जन्मांतल्या दुःखाविषयीं त्याचें मन चिंतायुक्त होऊन त्याला दुःख होतें. तसेंच या जन्मींच्या चांगल्या कृत्यांचें फळ पुढले जन्मीं मिळावयाचें आहे, या ज्ञानानें त्याला सुख होऊन सत्कृत्यें करण्याविषयीं हुरूप येतो.

दुर्गति प्राप्त होते असें हिंदुधर्मही सांगतो या जगांत कोणी राजवंशांत जन्मतो, कोणी दरिद्र्याच्या पोटीं येतो, कोणी मऊ रुजाम्यावर लोळतो तर कोणाला पोटासाठीं काबाडकष्ट करावे लागतात, कोणी सुखांत जन्मभर लोळतो तर कोणाला अखंड दुःख सहन करावें लागतें अशी विषमता असण्याचें कारण काय ? दुःख, शोक, पाप, अन्याय, ताप या सर्वांचें कारण कर्मफळ. ज्या दुःखाचें मूळ या जन्मांत शोधतां येत नाहीं, तें अर्थात् पूर्व जन्मींच्या अज्ञात कृत्याचें फळ असलें पाहिजे, असें मनाला सहजच वाटतें. तथापि बौद्धधर्मांत कर्माला जसें प्राधान्य देण्यांत येतें तसें अन्यत्र क्वचित्‌च असेल. बौद्धधर्मानें ईश्वराचें स्थान कर्माला दिलेलें आहे इतर सगळ्या गोष्टी क्षणभंगुर आहेत, त्यांना मृत्यु आहे, पण कर्मबलावर मात्र मृत्यूचा अधिकार चालत नाहीं. कर्म हें तेवढें सच, बाकीचें सर्व अनित्य होय बाळपणीं केलेल्या कर्माचें फळ तरुणपणीं मिळतें, तरुणपणचें वृद्धपणीं मिळतें, तसें या जन्माचें अन्यजन्मीं मिळतें जसें मागच्या जन्मांतील कर्माचें फळ या जन्मीं मनुष्य भोगतो, त्याप्रमाणें या जन्मीं पुण्यकर्म केल्यास पुढले जन्मीं चांगलें व पापकर्म केल्यास वाईट फळ मिळाल्यावांचून राहावयाचें नाहीं मनुष्यानें केलेलें कोणतेंच कर्म अथवा मनांत आणलेला विचार फुकट जात नाहीं. त्याचें फळ केव्हांना केव्हां मिळतेंच स्वर्ग, मृत्यु, पाताळ कोणत्याही लोकांत मनुष्य असो, समुद्रांत बुडी मारून राहो, किंवा गिरिकंदरांत लपून बसो, कर्मफळ त्याचा पाठलाग करीत जातें कर्माप्रमाणें सुखदुःख भोगल्यावांचून त्याची सुटका नाहीं

परलोकासंबंधानें बौद्धधर्माचें मत काय आहे, तें नीटसें कळत नाहीं. जीवाची अखेर गति कोणती, व स्वतः बुद्ध मृत्यूनंतर एखाद्या जन्माला जाणार आहे किंवा नाहीं याविषयीं त्याच्या शिष्यांनीं त्याला अनेक वेळां प्रश्न केले, परंतु बुद्धानें त्या प्रश्नाला उत्तर दिलें नाहीं मालुंक्यपुत्र नांवाच्या शिष्यानें हा प्रश्न केला असतां बुद्ध म्हणाले, "हे मालुंक्यपुत्रा, जग केव्हां निर्माण झालें कीं तें अनादि आहे, देह आणि आत्मा हे एकच आहेत कीं भिन्न भिन्न आहेत, आणि बुद्ध मरणोत्तर कोणता जन्म घेणार आहे, या प्रश्नाचें उत्तर देईन, असें मीं पूर्वीं कधीं वचन दिलें आहे काय ?"

मालुंक्यः—नाहीं महाराज. तसें कांहीं वचन दिलेलें नाहीं

बुद्धः—हें तत्वज्ञान शिकण्याच्या उद्देशानें तूं मला गुरु केलें आहेस काय?

मालुंक्यः—नाहीं, तसेंही नाहीं.

बुद्धः—समज, एक मनुष्य विषारी बाण लागून जखमी होऊन पडला आहे त्याला बरें करण्यासाठीं शस्त्रवैद्य आला आहे आतां तो जखमी मनुष्य जर त्या वैद्याला असें म्हणूं लागला कीं, मला कोणीं बाण मारला? तो मारणारा ब्राह्मण होता, कीं क्षत्रिय होता, कीं शूद्र होता? त्याचें नांव काय? तो राहणारा कुठला? व तो बाण कशा प्रकारचा होता? तें मला सांग, तर तो शस्त्रवैद्य काय म्हणेल? या प्रश्नांचे उत्तर देण्यांत वेळ दवडण्यांत अर्थ कोणता? त्या उत्तरें देण्याच्या काळांत जखमी झालेल्या माणसाचें प्राणोत्क्रमणसुद्धां व्हावयाचें! तसें, हे मालुक्यपुत्रा, तुला जो रोग झाला आहे, त्याचें औषध मी देतों तेवढें घे जें मी सांगतों तें ऐक. जें मी सांगत नाहीं तें विचारण्यांत वेळ दवडूं नकोस.

बौद्धधर्माचे टीकाकार या मौनाबद्दल जेव्हां बुद्धाला दोष देतात, तेव्हां मौन धरण्याचें कारण पुढील संवादांत सांगितलें आहे तें त्यांनीं लक्षांत ठेवावें हा संवाद ग्रीक राजा मिलिंद (Menandor) व बौद्ध सन्यासी नागसेन यांच्यामध्यें झाला आहे. मालुक्यपुत्राच्या प्रश्नास बुद्धानें उत्तर न देतां मौन स्वीकारलें,याचें कारण एक तर बुद्ध निरुत्तर झाला हें असेल,किंवा कांहीं गुह्य गोष्टी सांगाव्या लागल्या असत्या त्या सांगण्याची बुद्धाला इच्छा नसेल. मिलिंद यानें अशी शंका घेतल्यावरून नागसेन त्याला म्हणाला, "राजा, बुद्धदेवानें मालुक्यप्रश्नाचें उत्तर दिलें नाहीं, ही गोष्ट खरी, परंतु त्याचें कारण त्याला उत्तर सुचेना असें नाहीं. कांहीं प्रश्न असे असतात कीं, त्यांचें उत्तर देऊं लागलें असतां दुसरे अनेक प्रश्न त्यांतून उद्भवतात. कांहीं प्रश्नांचे उत्तर देतांच येत नाहीं जग हें नित्य आहे कीं अनित्य आहे, देह आणि आत्मा हे भिन्न आहेत की अभिन्न आहेत, हे प्रश्न अशापैकींच आहेत." मनुष्याच्या बुद्धीला अगम्य अशा ज्या वस्तु आहेत, त्यांच्यासंबंधानें निरर्थक चर्चा करणें किंवा ठाम मत देणें हें बुद्धाला आवडलें नाहीं.

जीवात्मा मर्त्य आहे कीं अमर आहे, आणि मरणोत्तर त्याची गति काय होणार, या रहस्याचा भेद करणें मनुष्याला असाध्य आहे, यांत शंका नाहीं. शिवाय मनुष्याच्या मनांत जीविताशा व सुखाशा इतकी प्रबळ असते कीं, या क्षणभंगुर संसारांत त्यांना मर्यादित केल्यानें त्याच्या मनाचें समाधान होत नाहीं. ह्मणूनच पारलौकिक उन्नतीविषयींची आशा बहुतेक सर्व धर्मग्रंथांतून कायम ठेवलेली आढळते. कुराणांत स्वर्गाचें व असंख्य पऱ्यांचें अत्यंत मनोरम वर्णन आहे. बायबलांतही स्वर्गोद्यान व येशू ख्रिस्ताचें सशरीर स्वर्गारोहण यावर विश्वास ठेवणारास मुक्तिकामाची आशा लावून ठेवलेली आहे बौद्धधर्मांत मात्र अशा सन्देहें यथार्थ चोट लावून ठेवलेलें नाहीं. स्वतः बुद्धाला तरी अक्षय्यकालचें जीवन प्राप्त झालें कीं नाहीं तें कोण सांगूं शकेल? कोसलराज व क्षेमा नांवाची एक भिक्षुणी यांच्यामधील संवादांत क्षेमेनें स्पष्टपणें सांगितलें आहे कीं, "*ही गोष्ट स्वतः बुद्धानें उघड करून दाखविली नाहीं, ती आह्मांला कशी स्पष्ट करतां येईल? बुद्ध अमर आहे असें ह्मणणें, किंवा तो मरणशील* आहे असें ह्मणणें, हे दोन्ही भ्रम आहेत. मानवबुद्धीला ज्या गोष्टी अगोचर आहेत त्यांच्या संबंधांत मौन स्वीकारण्यावांचून अन्य गति नाहीं"

**पुनर्जन्म**—बौद्धधर्म असें मानतो कीं, प्राण्याच्या शुभाशुभ कर्माप्रमाणें त्याला अन्यजन्मीं निरनिराळी योनि प्राप्त होते. ही योनि ह्मणजे पशु-पक्षी-कीटकादि क्षुद्र जंतूंचेच जन्म होत, असें नाहीं; तर कर्मानुसार जड वस्तूंचासुद्धां जन्म येतो. जातककथाबरून असें दिसतें कीं, बुद्धाला ८३ वेळ संन्याशाचा, ५८ वेळ राजाचा, २४ वेळ ब्राह्मणाचा व याशिवाय वानर, हत्ती, सिंह, वराह, चोर, मत्स्य व वृक्ष यांचा सुद्धा जन्म प्राप्त झाला होता. बुद्धाच्या या पूर्व जन्मांविषयींच्या कथा मागें प्रकरण ५ यांत दिल्या आहेत त्या पहाव्या.

**परलोक व मुक्ति**—याविषयीं बौद्धधर्माचें मत काय आहे, हें पाहण्यापूर्वी आत्म्याविषयीं बौद्धधर्म काय म्हणतो ते सांगणें अवश्य आहे. कारण *आत्म्याची पारलौकिक गति व मुक्ति या गोष्टी त्याच्याच स्वरूपाच्या लक्षणांवर बहुतांशीं अवलंबून आहेत. आत्मा आणि देह हे एकच, आत्मा हा फक्त बोधयाची प्रक्रिया, असें म्हटलें म्हणजे देहाच्या नाशाबरोबर आत्म्याचाही नाश ठरले.* ।

काच, परंतु या आत्मतत्वाप्रश्नाने बौद्धधर्म व इतर धर्म यांच्यांत जमीन-अस्मानाचें अंतर आहे. उदाहरणार्थ –उपनिषदांत ज्याला आत्मा म्हटलें आहे, तो शरीराहून भिन्न आणि स्वतंत्र आहे आत्मा म्हणजे मी आणि मी शरीर नव्हे, डोळे नव्हेत, कान नव्हेत, मनोवृत्तिही पण नाहीत, नाक, कान व मनोवृत्ति या मी नव्हेत तर माझ्या आहेत. छांदोग्योपनिषदांत एक सुंदर उपदेश आहे तो असा —

"हा देह नश्वर—मृत्यूच्या आधान–आहे आत्मा अजर, अमर व शरीरी असून हा देह त्याचें वसतिस्थान आहे ज्याप्रमाणें घोडे रथाला जोडलेले असतात, त्याप्रमाणें आत्मा देहाला जोडला आहे जेव्हां प्रकाश डोळयाच्या बुबुळांत प्रवेश करतो, तव्हां आत्मा पहातो डोळा हें फक्त दर्शनेंद्रिय आहे, पाहणारा आत्मा आहे त्याचप्रमाणें नाक हें वास घेण्याचें साधन, परंतु वास घेणारा आत्मा आहे रसना हें इंद्रिय, पण वाक्य उच्चारणारा आत्माच जो मनाच्या द्वारें मनन करतो तो आत्माच मन हें दिव्य चक्षूप्रमाणें आहे. आत्मा जोंपर्यंत शरीरांत असतो, तोंपर्यंत मोहपाशांत बद्ध राहून व विषयवासनांना वश होऊन तो सुखदु खांत संचार करीत असतो परंतु देहबंधनांतून मुक्त झाल्यावर सुखदु ख त्याला स्पर्श करू शकत नाहीं "

ज्याप्रमाणे अशरीरी वायु मेघ, आकाश व विद्युत् यापासून उत्पन्न होऊन व परम ज्योतिप्रत जाऊन निरनिराळीं रूपें धारण करतो, त्याप्रमाणें आत्माही या शरीरापासून निराळा झाल्यावर जेव्हां त्याच परम ज्योतीप्रत पोंचून निजरूपांत प्रकाशित होतो, तेव्हां तो उत्तम पुरुष होतो मग त्याला सुखदु ख स्पर्श करू शकत नाहींत दिव्यज्ञानाच्या योगानें परमात्म्याशीं योग पावून विषयबंधनापासून तो मुक्त होतो, आणि परम शांति पावतो

हें उपनिषदांचें मत झालें बौद्धांचें या विषयीं काय म्हणणं आहे, तें पुढील विवेचनावरून दिसून येइल

१ अनित्यता, अनात्मता आणि निर्वाण—या तीन तत्वांच्या पायावर बौद्धधर्माच्या प्रचंड इमारतीची रचना झालेली आहे म्हणून या तीन तत्वां

चा वास्तविक अर्थ काय आहे, तो प्रथम समजून घेतला पाहिजे. *अनित्यता म्हणजे क्षणस्थायित्व* बौद्धधर्म असें सांगतो कीं, या जगांत नित्य असें कांहीं नाहीं, सर्व कांही क्षणभंगुर आहे. वस्तुमात्राच्या अणुपरमाणूत क्षणोक्षणीं फेर-बदल चाललेला आहे ( विश्व क्षणभंगुरम् ). *नित्यता जर असली तर ती कदा चित् विचारसृष्टीत असेल, प्रत्यक्ष भौतिक सृष्टीत नाहीं. या भौतिक सृष्टीतलें* सगळें बहुजात रंग, ध्वनि, आकाश, कल्पना, इच्छा, इत्यादिकांचें बनलेलें आहे, आणि ही सर्व नेहमीं बदलणारी आहेत ( सर्वं क्षणिकम् ). असें असतां आपण तीं नित्य समजून त्यांचा भरंवसा धरतो म्हणून दु:ख पावतों.

*अनित्य असलें म्हणजे तें मिथ्या असलेंच पाहिजे असें मात्र नाहीं. अनि* त्यत्व व मिथ्यात्व या दोन गोष्टी भिन्न आहेत अनित्यास नित्य समजून फसणें ही गोष्ट निराळी व ज्याला खरोखर भौतिक सृष्टीत अस्तित्वच नाहीं तें आहे अशी मनाची समजूत करून स्वत:ची फसवणूक करून घेणें हें *निराळें. म्हणून वेदांत्यांची माया व बौद्धांची अनित्यता एक आहेत, असें म्हणणें* हा एक भ्रम आहे, असें म्हणता येईल

*अनात्मता*—अनित्यतेपासून ओघानेंच अनात्मता प्राप्त होते. या चरा-चर विश्वांत अनिर्बंध, केवल, अगम्य, असें कांहीं नाहीं हें सारें विश्व क्षणों-क्षणीं पालटणाऱ्या संवेदना, कल्पना, इच्छा, इत्यादिकांच्या संगमापासून झालेलें *आहे या क्षणिक संगमाचें चित्र आपल्या मन:पटलावर उठून त्यामुळें आप*-णांस वस्तूचें अस्तित्व भासमान होतें. या चित्रांपैकीं कांहीं इतरांपेक्षां जास्त वेळ टिकणारीं असतात, म्हणून आपण भ्रमानें त्यांना नित्य समजतों इतकेंच काय तें. या अधिकस्थायी चित्रांचा एका विशिष्ट वस्तूशीं संबंध जोडून त्याला आपण 'मी' म्हणतों पण हा 'मी' सुद्धां क्षणिकच आहे. तो *क्षणिक अशा स्कंधांचा झालेला आहे. मात्र त्यांत होणारे फेरबदल मंदगति* असल्यामुळें आपण त्याला नित्य मानतों रूप, वेदना, विज्ञान, संज्ञा व संस्कार यांच्या विशिष्ट प्रकारच्या संगमामुळें आपणांस विशिष्ट प्रकारचे उष्ण, शीत, वगैरे धर्मांचे अनुभव येतात. पण तो नेहमीं किंवा वारंवार घडणारा संगम घडेनासा झाला ( स्कंध विस्कळित झाले ) म्हणजे मनुष्य मेला, असें आपण

म्हणतो. म्हणजे आत्मा हा गूढ किंवा नित्य नाहीं. आपल्या स्वतांत क्षणोक्षणीं फेरबदल होत आहे, याचा अनुभव प्रत्येकाला आहे. ही अनित्यता लक्षांत घेऊनच प्रत्येकजण स्वतःच्या सुधारणेला प्रवृत्त होत असतो. आपल्यांत नित्य असें कांहीं नाहीं या गोष्टीकडे दुर्लक्ष झाल्यामुळेंच भिन्न भिन्न प्रकारचीं मतें व मतांतरें स्थापित झालीं आहेत. जीवात्मा आणि परमात्मा असे भेद कल्पणें ही अर्थातच एक मोठी भ्रांति आहे अनित्याला नित्य समजण्याच्या भ्रांतीमुळेंच अनेक प्रकारचीं दुःखें जीवाला सोसावीं लागत आहेत. 'आत्मानमपरित्यज्य दुःखं त्यक्तुं न शक्यते' (बोधिचर्यावतार)

बुद्धाचें आत्म्याविषयींचें हें विवेचन अतिशय वादविवादाला कारण झालें आहे अनेक प्राच्य व पाश्चात्य ग्रंथकारांना या मताचें नीट आकलन न करतां आल्यामुळें त्यांनीं बौद्धधर्माला नास्तिक किंवा जडवादी म्हटलें आहे आमच्या इकडेही बौद्धदर्शनाची नास्तिकदर्शनांत गणना करण्यांत आली आहे बुद्धाला नास्तिक किंवा जडवादी समजणारांची चूक येथें होत आहे कीं, आत्म्याला अस्तित्वच नाहीं, असें मत ते बुद्धाच्या अंगीं चिकटवू पाहत आहेत वस्तुत तसा कांहीं एक प्रकार नाहीं बुद्धाचा कटाक्ष आत्म्याच्या अस्तित्वावर कधीं नव्हता. जीवात्म्याचें नित्यत्व आणि सत्त्व ( Reality ) यांच्यासंबधानें होता. बुद्धमताला जडवादी मानणारे आपल्या मताच्या समर्थनार्थ सारिपुत्र आणि यमक यांच्यामध्यें झालेला संवाद पुढें करीत असतात. यमक नांवाचा एक भिक्षु असें समजत होता कीं, भिक्षूच्या शरीराचा नाश झाल्यावर मागें कांहीं राहत नाहीं, त्याचा संपूर्ण नाश होतो हा त्याचा भ्रम सारिपुत्र नांवाच्या दुसऱ्या एका भिक्षूनें मोठ्या युक्तीनें वाद करून दूर केला आहे या वादाच्या शेवटीं असें एक वाक्य आहे कीं, तथागताचा या संसाराशीं संबंध तुटतो, पण त्याचें शरीर मागें राहतें शरीर मागें राहिलें आहे तोंपर्यंत देवें आणि माणसें त्याला

१ बौद्धधर्माप्रमाणें देव आणि माणसें यांच्यांत विशेषसा फरक नाहीं धार्मिकतेंत देव सामान्य माणसांपेक्षां उच्च प्रतीचे असतात, येवढेंच निर्वाणप्राप्ति झालेल्या योग्यता देवापेक्षांही मोठी, व अशा माणसाचा देवांना हेवा वाटतो. देव या शब्दांत 'ईश्वरत्व' हा अर्थ गर्भित नाहीं, हें येथें ध्यानांत ठेविलें पाहिजे

पाहू शकतात, पण शरीर नष्ट झाल्यावर तो त्यांना दिसू शकत नाहीं या वाक्यावरून मि. ऱ्हिसडेव्हिड्ससारख्या पाश्चात्य पंडितांनीं असें अनुमान काढलें आहे कीं, मृत्यूपश्चात् आत्म्याचें अस्तित्व नाहीं, असें बुद्धाचें स्पष्ट मत होतें. वस्तुतः त्या वाक्याचा गर्भितार्थ असा आहे कीं, शरीर नष्ट झाल्यावर आत्मा देवांना किंवा माणसांना दिसू शकत नाहीं, इतकेंच, त्याला अस्तित्व नसतें, असा जो त्यापासून पाश्चात्य पंडित अर्थ काढतात, तसा अर्थ वस्तुत त्या वाक्यांत अभिप्रेत नाहीं. तो दिसू शकत नाहीं, म्हणजे तो नसतोच असें नाहीं; तर मनुष्याच्या विचाराच्या व ज्ञानाच्या मर्यादेपलीकडे तो गेलेला असतो. हा अर्थ घेतला म्हणजे उपनिषत्कारांचें मत आणि बुद्धाचें मत हीं अगदी एक आहेत, असें कोणालाही दिसून येईल. बुद्ध आत्म्याचें अस्तित्व नाकबूल करीत नाहीं, तर व्यक्तिगत आत्म्याचें भिन्न अस्तित्व नाकबूल करतो. मनुष्यें आपल्या व्यक्तित्वाला चिकटून राहतील, आणि आपल्या स्वत च्या इच्छा, आणि त्या पूर्ण करण्याचे मार्ग यांचें चिंतन करीत असतील, तोंपर्यंत त्यांना निर्वाण-प्राप्तीची—अथवा वेदांतमताप्रमाणें जीवात्मा आणि परमात्मा यांचें संमेलन होण्याची—आशा नाहीं; आणि हें घडत आहे, तोंपर्यंत त्याला दु ख भोगीत राहिलें पाहिजे, हें बुद्धाचें मत होतें. हें मत जर नास्तिकपणाचें किंवा जडवादी म्हणावयाचें असेल तर उपनिषत्कार अथवा ब्राह्मणधर्माचे प्रवर्तकही त्या अपवादापासून मुक्त नाहींत, असें म्हणावें लागेल. आत्म्याच्या अस्तित्वासंबंधानें बुद्धाचे हे वर सांगितलेले विचार किती उच्च प्रतीचे होते, याची खरी कल्पना जडवादांत जन्मापासून वाढलेल्या पाश्चात्य पंडितांना होणें शक्य नाहीं. पण प्राच्य ग्रंथकारांनींही बुद्धाच्या वचनाचा खोल अर्थ लक्षांत न घेतां त्याला जडवाद्यांत ढकलावें हें आश्चर्य आहे. पण ही चूक पूर्वीपासून होत आली आहे. याचें कारण बुद्धानें ब्राह्मणधर्मांतल्या कित्येक अविचारमूलक आचारांवर जो कटाक्ष ठेविला, त्यामुळें त्याच्याबद्दल ब्राह्मणग्रंथकारांचें मन दूषित झालेल्या चष्म्यांतून त्याच्या मताचें अवलोकन करीत राहिल्यामुळें त्यांना बुद्धमताचें यथार्थ ग्रहण करतां आलें नाहीं. याशिवाय बुद्धमताचा जो जाणून बुजून विपर्यास केलेला दिसतो, त्याची उपपत्ति योग्य रीतीनें लागत नाहीं

ईश्वर—बुद्धमत हें नास्तिक आहे, त्याला ईश्वराचें अस्तित्व कबूल नाहीं, असाही एक आरोप केलेला वारंवार ऐकण्यांत येतो. याला दोन गोष्टी कारण आहेत. एक ही कीं, बुद्धानें ईश्वराबद्दल आपल्या भाषणांतून कोठें काहीं सांगितलें नाहीं; आणि दुसरी गोष्ट जेथें कथाप्रसंगानें ईश्वराचा उल्लेख त्यानें केला आहे, तेथें त्याचें ईश्वराविषयींचें मत तत्कालीन प्रचलित मताहून व सध्याच्या पाश्चात्यमताहून इतकें भिन्न आहे कीं, त्याचें यथार्थ आकलन पाश्चात्यांना करतां येणें अशक्य आहे. बुद्धानें ईश्वरविषयक मत त्यानें शब्दानें कोठें व्यक्त केलेलें नाहीं, ही गोष्ट कबूल केली पाहिजे. पण त्यानें मनुष्याच्या जीवनाचा जो कार्योद्देश सांगितला आहे व त्या कार्याचा नकाशा आखून ठेविला आहे, त्याचा सूक्ष्म विचार करणारांना बुद्ध ईश्वराला धाब्यावर बसविणारा होता, असें कदापि वाटणार नाहीं. उलट त्याची देवाविषयींची कल्पना असामान्य उच्चप्रतीची होती. माणसाच्या प्रत्येक बारीक सारीक कृत्यांत ढवळाढवळ करणारा, त्या कृत्यावर अत्यंत सूक्ष्म नजर ठेवणारा पाहरेकरी तो ईश्वर, ही त्याची ईश्वराविषयींची कल्पना नव्हती. डिटेक्टिव्ह पोलिसाचें काम करण्यास त्यानें ईश्वराला लाविलें नाहीं तर मनुष्यप्राण्याला काहीं विशेष नियमानें बद्ध करून त्यांचा जीवनमार्ग सुलकर करणारा व सर्वांचा त्राता तो परमेश्वर, अशी बुद्धाची समजूत दिसते. ज्याला त्याला त्याच्या कर्मांचें बरेंवाईट फळ मिळेल, असा एक सर्वव्यापी नियम घालून देणारा व तो नियम अबाधितपणें चालविणारा तो ईश्वर ही बुद्धाची ईश्वराविषयीं कल्पना आहे. ईश्वरानें घालून दिलेल्या नियमांप्रमाणें चालणें हें माणसाचें कर्तव्य आहे. त्याच्यापलीकडे जाऊन ईश्वराचें स्वरूप कसें आहे, त्याला दोन हात आहेत कीं चार आहेत, त्याच्या डोक्यावर मुकुट आहे कीं नाहीं, आणि असला तर तो रत्नांचा आहे कीं सुवर्णाचा आहे, त्याचें सिंहासन स्वर्गलोकीं आहे कीं माणसाच्या हृदयांत तो अधिष्ठित आहे, त्याची मुद्रा उग्र आहे कीं सौम्य आहे, वगैरे गोष्टीविषयींची चिकित्सा अनाठायीं आहे, असें बुद्धाला वाटत होतें. त्यानें घालून दिलेल्या नियमांप्रमाणें वागणें येवढें मनुष्याचें कर्तव्य आहे. तें न करतां त्याच्या स्वरूपाची वटवट मनुष्यानें करूं नये, असें त्याला वाटे, म्हणून त्यानें आपल्या

उपदेशांत ईश्वराच्या स्वरूपाची मीमांसा करण्यांत आपल्या श्रमाचा व काळाचा अपव्यय कधीं केला नाहीं. उलट ईश्वराच्या स्वरूपाविषयीं कोणी पृच्छा केल्यास त्या पृच्छकाचें समाधान न करतां तो त्याला ईश्वरानें घालून दिलेल्या नियमाचें प्रतिपालन करण्याकडे आपल्या चित्तवृत्तीची एकाग्रता करण्यास सांगत असे. मात्र जर अनीश्वरवाद किंवा नास्तिकता म्हणावयाची असेल तर खुशाल म्हणावें दुसरी गोष्ट अशी कीं, व्यक्तिगत आत्म्याचें अस्तित्व कबूल न करणाऱ्या बुद्धानें स्वत: परम श्रेष्ठ सत्यस्वरूपाला एका बिंदूत-ईश्वराचे स्वरूपांत-आणून सोडलें असतें, तर तेंही विलक्षणच झालें असतें; तसें केलें असतें तर त्याच्या मताला त्यानें स्वत: च संकुचित करून सोडलें असतें. पण बुद्धानें निरीश्वरवादित्वाचा आरोप पतकरला, पण आपल्या मताला संकुचितपणा येऊं दिला नाहीं. त्यानें ईश्वराविषयीं जें मौन धारण केलें, त्याचें खरें कारण या गोष्टींत आहे, असें मला वाटतें

तथापि बुद्धाला लोक निरीश्वरवादी समजतात, त्याला अगदींच कारण नाहीं, असें मात्र मी म्हणत नाहीं ईश्वर आहे कीं नाहीं, याविषयीं जरी त्यानें मौन धारण केलें होतें, तरी ईश्वरानें ही सृष्टि निर्माण केली आहे काय? तो या सृष्टीचा आदिकारण आहे काय? या प्रश्नाचें मात्र उत्तर त्यानें स्पष्टपणें अनाथपिंडक यास दिलें आहे तेथें भगवान् बुद्ध म्हणतात ईश्वर मंगलमय व सच्चिदानंद आहे त्याअर्थीं त्यानें ही सृष्टि निर्मिली असती तर तीही त्याच्या सारखी मंगलमय, दु:खविरहित, रागद्वेषापासून मुक्त अशी असावयास पाहिजे होती. खरें, तोच सर्व माणसांच्या वासना व कर्में यांची स्फूर्ति देणारा असता तर त्यांच्या बरेवाईटपणाबद्दल मनुष्यावर जबाबदारी टाकणें, व एखाद्याच्या सद्गुणाबद्दल स्तुति व निंद्य वर्तनाबद्दल त्याचा धिक्कार करणें यांना मग कांहीं अर्थ उरला नसता खरें, अशी ही विचित्र सृष्टि निर्माण करण्यांत त्याचा कांहा हेतु पाहिजे, व कांहीं हेतु असला तर तो ईश्वरही माणसाप्रमाणें इच्छाधीन आहे असें म्हणावें लागेल अशा प्रकारचा ईश्वराच्या सृष्टिकर्तृत्वासंबधानें बुद्धानें वाद घातला आहे, आणि त्यावरून बुद्ध निरीश्वरवादी होता, असा लोकांचा ग्रह झालेला आहे पण बुद्धाचा हेतु यांत ईश्वराचें अस्तित्व नाकबूल

करण्याचा नसून मनुष्य आपल्या सुखदु:खाचें कर्तृत्व ईश्वराकडे देऊन स्वत वरची जबाबदारी टाकायला पाहतो, तसें करणें गैर आहे, मनुष्याला Free will आहे, आणि त्यामुळेंच त्याच्या ब यावाईट कर्मांबद्दल मनुष्य स्वत जबाबदार आहे, एवढेंच दाखविण्याचा बुद्धाचा हेतु होता, असें मला वाटतें परमेश्वरानें ही सृष्टि मंगलमयच निर्माण केली आहे, पण ती तशी आपणांस दिसत नाहीं, याचें कारण आपलीं कर्में होत, असें शिष्याच्या मनावर ठसविण्यासाठीं बुद्धानें ईश्वर हा सृष्टीपासून अलिप्त आहे, हें ठळकपणानें येथें सांगितलें आहे त्याला इंग्रजींत personal god म्हणतात, अशा मूर्तिमान् ईश्वर बुद्ध मानीत नसे पण उपनिषदांनीं ब्रह्म या शब्दांनीं ज्याच वर्णन केलें आहे तसा परमेश्वर बुद्धाला मान्य होता असें दिसतें बुद्धाच्या धर्मांत सुद्धां ब्रह्माचीच कल्पना आहे, असें नाहीं; तर निर्वाण प्राप्त झालेलें तत्त्व ब्रह्माचे ठायीं लीन होतें-ब्रह्मत्वाला पावतें-ही उपनिषदांतली कल्पना त्याच्या उपदेशांत स्पष्ट आहे. 'इतिवुत्तक' नामक पाली ग्रंथांत म्हटलें आहे कीं, एकदा भगवान् तथागत बुद्ध यानें पुढील गाथा म्हटली—

> 'यस्स रागो च दोसो च अविज्जा च विराजिता
> त भावितत्तञ्ञतरम् ब्रह्मभूत तथागतम्
> बुद्धं वेरभयातीत आहु सब्बपहायिनन्ति।'

म्हणजे ज्याचा राग, द्वेष व अविद्या ही तिरोहित झाली आहेत, त्याला धर्मांचे ठायीं सुप्रतिष्ठित, ब्रह्मभूत, तथागत, वैरभयातीत व सर्वत्यागी बुद्ध म्हटलें पाहिजे यांतील 'ब्रह्मभूत' शब्दाचा अर्थ ब्रह्मत्व प्राप्त झालेला, ब्रह्मस्वरूपांत मिळून गेलेला, असाच आहे

'सुत्तनिपात' नांवाच्या ग्रंथांत अशी कथा आहे कीं, सेल नांवाचा एक ब्राह्मण गौतमबुद्धाकडे गेला असतां बुद्ध त्याला म्हणाला-'मी चक्रप्रवर्तन ( धर्मचक्रप्रवर्तन ) केलें आहे जें म्हणून अभिज्ञेय आहे तें मी जाणिलें आहे. जें साधन करावयाचें तें सिद्ध केलें आहे. ज्याचा त्याग करावयाचा तें सोडलें आहे हे ब्राह्मणा! मी बुद्ध झालों आहे-ब्रह्मभूत झालों आहें. माराच्या सेनेचा पराभव

करून आणि त्यांना जिंकून निर्भय चित्तानें आनंद अनुभवीत आहे या ठिकाणी 'ब्रह्मभूत' हा शब्दच नुसता योजिला आहे असें नाहीं, तर ब्रह्मस्वप्राप्तीचीं लक्षणें ही स्पष्ट घोषितली आहेत. अर्थात् 'ब्रह्मभूत' हा शब्द 'ब्रह्मत्वप्राप्ति' या अर्थानें योजिला आहे, याविषयीं शंका घेण्याचें कारणच उरत नाहीं

'दीघनिकाय' मधील बुद्धानें एके ठिकाणीं म्हटलें आहे कीं, मनुष्यें चार प्रकारचीं असतात काहीं माणसें स्वत चा निग्रह करणारीं (अत्तंतप), दुसरी कित्येक दुस ऱ्याचा निग्रह करणारीं (परंतप) तिसरीं कित्येक दोन्ही (म्हणजे अत्तंतपता व परंतपता हे) गुण अंगीं असलेलीं, व चौथीं म्हणजे हे दोन्ही गुण नसलेलीं जीं अत्तंतप नाहींत व परंतपही नाहींत, तीं वासनाविरहित, निर्वाणाप्रत पोचलेलीं, प्रशांतचित्त, सुखी व 'ब्रह्मभूतात्म' होऊन या जगांत संचार करतात.

'मज्झिमनिकाय' मधीलही वरच्यासारख्या चार प्रकारच्या लोकांचा उल्लेख असून तेथेंही 'ब्रह्मभूत' शब्द वर दिलेल्या अर्थानेंच वापरलेला आहे

या सर्व उल्लेखांवरून बुद्धाची ब्रह्माविषयींची कल्पना कशा प्रकारची होती, तिचा स्पष्ट खुलासा होतो, आणि यावरून बुद्ध हा नास्तिक नसून ब्रह्मवादी होता, याविषयीं शंका उरत नाहीं

अनुलही ब्रह्माच्या स्वरूपाविषयीं बुद्धाचें मत काय होतें याविषयीं कोणाला शंका असेल तर ती 'इतिवुत्तक' नामक प्राचीन आणि बुद्धधर्माविषयीं प्रमाणभूत मानलेल्या ग्रंथांतल्या बुद्धाच्या वचनावरून दूर होईल 'भगवान् बुद्धानें-अर्हंतानें-असें म्हटलें आहे कीं, अजात, अभूत, अकृत, असंयोगिक असें काहीं आहे (अत्थि भिक्खवे अजातम्, अभूतम्, अकतम्, असंखतम्) तें, नसतें तर जात, भूत, कृत व यौगिक अशा वस्तूच्या मुक्तीची कल्पनाच करतां आली

---

१ 'ब्रह्मभूतो अतितुलो मारसेनप्पमद्दनो ॥ स ब्बामित्ते वसीकत्वा मोदामि अकुतोभयो' ॥ सेलसुत्त ॥ १४।५६१

२ सो अनत्तन्तपो अपरंतपो दिट्ठ व धम्मे निच्छातो निब्बुतो सीतिभूतो सुखपटिसंवेदी ब्रह्मभूतेन अत्तना विहरति ॥ (संगीतिसुत्त १।४७)

नसती. जें जात, भूत, समुत्पन्न, कृत, यौगिक, ध्रुव, जरामरणसंयुक्त, रोगनिलय, भंगप्रवण, वा आहारनेतृप्रभव, तें अभिनंदनाचा विषय नाहीं.

'तस्स निस्सरणं सन्तं अतक्कावचरं धुवम् ।
अजातं असमुप्पन्नं असोकं, विरजं पदम्' । इत्यादि

म्हणजे जें अजात, अभूत, अकृत, 'असंस्कृत', शान्त, ध्रुव, अशोक व विरज असें पद तेंच माणसाचें प्राप्तव्य असें बुद्धाचें मत होतें. अशा पदाला उपनिषत्कारांनीं 'ब्रह्म' असें नांव दिलें आहे. अर्थात् बुद्ध आणि उपनिषत्कार यांची ब्रह्माच्या स्वरूपाविषयींची कल्पना अगदीं एक आहे. मग बुद्धाला नास्तिक व शून्यवादी म्हणणारे जे आहेत, ते केवळ हट्टानें व दुराग्रहानें बुद्धाला नांवें ठेवणारे आहेत, असें म्हणण्यास कोणता प्रत्यवाय आहे ?

बुद्धावर शून्यवादित्वाचा व नास्तिकत्वाचा जो वृथा आरोप आहे, त्या संबंधानें मागें एका प्रकरणांत (पृ० ३१ पासून ४५) बरेंच विवेचन करण्यांत आलें असल्यामुळें येथें आतां अधिक विस्तार करीत नाहीं. सुज्ञ वाचक परमतावलंबी न होतां स्वतः नीट डोळे उघडून बौद्ध ग्रंथ पाहतील व विचार करतील, तर त्यांचा भ्रम खात्रीनें दूर होईल असें मला वाटतें.

येथें असा प्रश्न उद्भवतो कीं बुद्ध जर शून्यवादी किंवा नास्तिक नव्हता, जर त्याची ब्रह्माविषयींची आणि निर्वाणाविषयींची कल्पना ब्राह्मणधर्मीयांना अत्यंत पूज्य अशा उपनिषदादि ग्रंथांतल्या प्रमाणें तंतोतंत होती, तर बौद्धधर्मावर लोकांचा येवढा कटाक्ष कां ? बौद्धांना त्यांनीं जी निंदाव्यंजक विशेषणे लाविलीं आहेत, उदा० 'यथा हि बुद्ध स तथा हि चौरः' असें रामायणांत म्हटलें आहे, त्याचें प्रयोजन काय होतें ? माझ्या मतें ब्राह्मणधर्मी लेखकांच्या रोषाला दोन तीन कारणें देतां येतील. पहिलें कारण ब्राह्मण धर्मांत त्या कालीं प्रचलित असलेला जातिभेद बुद्धानें नाहीसा केला, आणि त्याबरोबरच ब्राह्मणांचें समाजांतलें वर्चस्व नाहींसें केलें, यामुळें ब्राह्मणवर्गाला त्याच्या विषयीं वैमनस्य वाटून ते त्याच्यावर दांत-ओठ चावूं लागले. ब्राह्मणवर्गाच्या नेतृत्वाखालीं व त्यांनी दर्शविलेल्या मार्गानें धर्माचरण केलें आणि ब्राह्मणांना दानें वगैरे दिलीं, तरच मोक्षप्राप्ति व्हावयाची, ही त्या काळची समजूत नाहींशी करून तिच्या जागीं

ज्याचा मोक्ष त्याच्या हातांत आहे, त्यासाठीं कोणाची मध्यस्थी लागत नाहीं, यज्ञकर्मांचें आचरण केलें म्हणजे झालें, अशा प्रकारची समजूत बुद्धानें स्थापित केली, तेव्हां ब्राह्मणधर्मी अर्थातच त्याच्यावर क्षुब्ध झाले त्यांत पुन बुद्धानें श्रुतिप्रामाण्य झुगारून दिलें व यज्ञयागांतल्या पशुहिंसेचा तीव्र निषेध केला, वगैरे गोष्टींची भर पडल्यावर मग तर त्यांचा क्रोधाग्नि अतिशयच भडकला, आणि त्याच्या ठायीं विकारवशता येऊन तिनें विचाराला दूर घालवून दिलें ! जगांतल्या धर्मांच्या इतिहासांत अशा प्रकारचे दुसरे कित्येक प्रसंग पाहण्यास मिळतात ते जितके मजेचे तितकेच मननीयही आहेत उदाहरणार्थ—ख्रिस्ती धर्माच्या इतिहासाकडे पहा, म्हणजे दिसून येईल कीं, जेव्हां डार्विन साहेबांनीं अभिव्यक्ति (उत्क्रांति) वाद ( Evolution theory ) उपस्थित करून ख्रिस्ती धर्मपुस्तकांतल्या कांहीं भागाच्या ईश्वरप्रणीतत्वासंबधानें विचारी लोकांच्या मनामध्यें संदेह उत्पन्न केला, तेव्हां ख्रिस्ती उपाध्यायांनीं केवढा गहजब केला ! या डार्विनरूपी राक्षसानें ईश्वराला ठार केलें ! असा त्याच्या नांवाचा बोभाट करून हा सैतान लोकांचीं मनें भुलविण्याकरितां या जगावर अवतरला आहे, अशी एकच ओरड करून सोडली पण आज विचारी लोक त्यांची ओरड खरी मानतात का डार्विनच्या अभिव्यक्तीला योग्य मान देतात तें सांगावयास नकोच प्रचलित धर्ममतांना चिकटून राहण्याचा काम नहमीच सोप असतें. कण्टकाकीर्ण मार्गांतले कंटक दूर करून लोकांना सदाचरणाचा कित्ता घालून देण्याचें काम अत्यंत दुर्धर आहे जुनीं धर्ममतें कशींही असलीं तरी त्यांचा विचिकित्सा करूं नये असें सामान्य लोकांना वाटतें अफू किंवा मद्य यांचें सेवन करणाराला त्या दुर्व्यसनांपासून दूर राहण्याविषयींचा उपदेश करणाराचा राग येतो कोणतीही इष्ट सुधारणा—मग ती राजकीय असो, सामाजिक असो, किंवा धार्मिक असो—तुम्ही विरोधाचा मार खाल्ल्या शिवाय जोरानें पुढें सरकत नाहीं हें बौद्धधर्माविषयींही अनुभवाला आलें यांत आश्चर्य वाटण्यासारखें किंवा अपूर्व कांहीं नाहीं

बुद्धानें व्यक्तिगत आत्म्याचें चिरस्थायित्व किंबहुना अस्तित्वच नाकबूल केलें, हेंहा ब्राह्मणधर्मीयांच्या रोषाचें एक कारण झालें होतें पण बुद्धानें काय

वाईट केलें होतें? सर्व प्राण्यांनीं सुखी व्हावें, अशी त्याची इच्छा होती; आणि आत्म्याविषयींची लोकांची गैरसमजूत ही त्यांना भ्रमांत पाडून भलत्याच मार्गानें नेणारी व त्यांच्या सुखप्राप्तीच्या मार्गांत आड येणारी गोष्ट आहे, अशी विचाराअंतीं त्याची पक्की खात्री झाली होती, म्हणून त्यानें लोकांच्या रोषाला न जुमानता त्या समजुतीच्या विरुद्ध उघड उपदेश केला यांत वाईट काय झालें? पण जी गोष्ट मनुष्यमात्राच्या हिताची म्हणून तो करण्यास गेला, तीच त्याच्याविषयीं लोकांत दीर्घ द्वेष उत्पन्न करण्यास कारण झाली. तथापि त्यानें विरोधाला न भितां आपला मार्ग धैर्यानें आणि नेटानें आक्रमिला, हीच गोष्ट त्याच्या श्रेष्ठत्वाची उत्तम साक्ष देते.

**निर्वाणाच्या पायऱ्या**—निर्वाणप्राप्ति ही एकदम होत नसते. तिच्या प्राप्तीसाठीं दीर्घ प्रयत्न करावा लागतो. या प्रयत्नानें माणसाला उन्नतीची एकेक पायरी क्रमाक्रमानें चढून जातां जातां अखेर निर्वाणप्राप्ति होते. या निर्वाणप्राप्तीच्या सोपानाच्या पायऱ्या कोणत्या तें बुद्धानें सांगितलें आहे. या पायऱ्या म्हणजे स्रोतपत्ति, सकृदागामी, अनागामी, आणि अर्हत् या होत. साधूची संगति, शास्त्रश्रवण, कार्यकारणपरंपरेचा विचार आणि सत्य व पावित्र्य यांविषयींच्या नियमांचें परिपालन या चार गोष्टी केल्यानें मनुष्य स्रोतपत्ति नांवाच्या पहिल्या पायरीला चढतो. या पदवीला आलेल्या माणसानें आत्मवंचनेचा त्याग केला पाहिजे, मनांत शंकांना थारा न दिला पाहिजे, आणि निरर्थक आचारांना फटा दिला पाहिजे. सरळ, शुद्ध आणि पवित्र अशा मार्गानेंच गेलें पाहिजे; असत्य भाषण, शारीरिक व मानसिक व्यभिचार, अप्रामाणिकता, आणि चित्ताला भ्रमविणाऱ्या गोष्टी यांपासून अलिप्त राहिलें पाहिजे. याच्या पुढची पायरी सकृदागामी. या पायरीवर चढूं इच्छिणारानें लोभ, द्वेष, आणि काम हीं सोडलीं पाहिजेत. तिसरी पायरी अनागामी. या ठिकाणीं जाणारानें वरील मनोविकारांशिवाय आणखी रागाचा त्याग केला पाहिजे. शेवटची म्हणजे अर्हत् ही पायरी चढणारानें वरील सर्व गोष्टींचा त्याग करून शिवाय अविद्या, स्वर्गप्राप्तीची लालसा, ममता इ० मनाला भ्रमविणाऱ्या सगळ्या गोष्टी टाकल्या पाहिजेत. 'कर्म-

ण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन ' या गीतावाक्याप्रमाणे राहिलें पाहिजे. म्हणजे मग त्याला जरा, मरण, शोक, वगैरे कशाचेंच भय उरणार नाहीं. रूप अरूप, काम, सायुज्यता, सलोकता इ० सर्व गोष्टींच्या अतीत तो होतो त्याची योग्यता माणसापेक्षां काय, पण देवांपेक्षां ही थोर होते.

या वर सांगितलेल्या गोष्टींसबंधानें थोडेसें स्पष्टीकरण करणें जरूर आहे. पहिल्या पायरीच्या आक्रमणाचे वेळीं आत्मवंचनेचा त्याग केला पाहिजे, असें सांगितलें आहे. ही आत्मवंचना म्हणजे काय? तर व्यक्तिगत आत्मा हाच सत्य आणि स्वयंसिद्ध आहे, अशी जी भ्रामक समजूत ती. या गोष्टीचा अगदीं प्रथम उल्लेख करण्याचें कारण तिचें महत्त्वच तसें आहे. जोंपर्यंत मनुष्य व्यक्तिगत आत्म्याला चिकटून राहील, तोंपर्यंत अहंता त्याला सोडणार नाहीं त्याची दृष्टि स्वतःच्या हितापुरती संकुचित राहील, आणि अहंता ही उच्च मनोवृत्तीला दाबून टाकीत राहील तेव्हां सर्वांच्या आधीं तिचा नाश करणें अत्यंत अवश्य आहे त्याचप्रमाणें मनांत शंकेला थारा देऊं नये, असें म्हटलें आहे त्याचा अर्थ सद्गुरूनें दाखवून दिलेला मार्ग इष्टपरिणामी होईल कीं अनिष्टपरिणामी होईल अशी शंका मनांत घेऊं नये, असा आहे कारण, अशी संदेहात्मक वृत्ति मनुष्याप निष्क्रिय बनविते ही निष्क्रियता टाळल्याशिवाय माणसाच्या हातून कोणतेंही कार्य होणें शक्य नाहीं निरर्थक आचारांना फांटा दिला पाहिजे याचा अर्थ असा कीं, कित्येक आचार स्पष्टपणें निरर्थक आहेत असें पक्कें माहीत असतां महात,गूढ असें कांहीं फलनिष्पत्ति यांत नसेल कशावरून? अशी भावना करून येऊन मनुष्य अवश्यकतेनें त्या आचारांना चिकटून राहतो. त्यामुळें अंतःकरणांतल्या सद्वृत्तीपेक्षां बाह्य आचारांनाच ज्यास्त महत्त्व प्राप्त होतें व त्यामुळें खऱ्या धर्माचरणाची हानि होऊन निर्वाणप्राप्ति दूर राहते दुष्ट या व तिऱ्या पाय या' वर चढतांना करा या लागणाऱ्या गोष्टींसबंधानें येवढेंच सांगण्यासारखें आहे कीं, त्यांचा रोख कडकडीत तपश्चर्या आणि अनिर्बंध नैतिक आचरण यांच्या मधल्या मार्गानें उच्च आदर्शाला नेऊन पोंचविण्याकडे आहे सर्वस्वपरित्याग करून व इंद्रियांचें दमन करून धार्मिक वृत्ति प्राप्त करून घेतल्यावर सुद्धां मनुष्याला 'मीं पहा किती कठीण गोष्ट केली! केवढा धार्मिक बनलों!' असा

प्रकारचा अहंकार नष्ट होतो. हा अहंकार जिंकणें हें काम फार कठीण आहे; म्हणून त्याचा समावेश पहिल्या तिन्ही पायऱ्यांत न करतां चौथींत केला आहे. शेवटची म्हणजे *अर्हत् ही पायरी अविद्येचा नाश केल्याशिवाय आणि पूर्ण ज्ञानप्रकाशाचें* ग्रहण केल्याशिवाय प्राप्त होत नसते. हें पूर्ण ज्ञान म्हणजे वेदान्त्यांचें जीवात्मा व परमात्मा यांचें ऐक्य हें होय. हें ज्ञान म्हणजे नुसती कविकल्पना नव्हे, अथवा नुसती बुद्धीनें ग्रहण करण्यासारखी गोष्ट नव्हे, तर प्रत्यक्ष आचरणांत आणण्याची गोष्ट आहे. आणि तशी ती आचरणांत आल्याशिवाय अर्हत् पदाला मनुष्य जात नाहीं. आपण आणि अखिल विश्व हीं एक आहों, ही भावना पूर्णपणें मनांत बिंबल्याशिवाय अविद्या नष्ट होऊन खरें ज्ञान होत नाहीं आणि आचरणांत विश्वमैत्रीचें तत्त्व उतरत नाहीं.

डा. ओल्डनबर्ग यांनीं बौद्धधर्मासंबंधानें असा एक आक्षेप केला आहे कीं, त्या धर्मांत सामान्य लोकांचें समाधान होण्यासारखें काय आहे ? एका अर्थी हा आक्षेप खरा आहे. म्हणजे बौद्धधर्माचें रहस्य बुद्धिमान् आणि विचारवंत माणसास जितकें उत्कृष्ट समजेल, तितकें सामान्य माणसाला समजणार नाहीं; ही गोष्ट खरी आहे. पण तो धर्म विचारवान् आणि बुद्धिमान लोकांसाठींच आहे, निर्बुद्ध लोकांसाठीं त्यांत जागा नाहीं, असें म्हणण्याचा त्यांचा उद्देश असेल तर मात्र तो आक्षेप साफ चुकीचा आहे, असें म्हणणें भाग आहे. कारण, बौद्धधर्मांचें रहस्य जरी त्यांना समजलें नाहीं, तरी वर सांगितलेल्या पंच

मतिमंद, धीमान, दरिद्री, सर्व तऱ्हेच्या लोकांना सारखी उपयोगी पडणारी आहे तिच्यांत उपयुक्तता, उच्चता, आणि सौंदर्य या तिन्ही गुणांचें योग्य मिश्रण झालेलें आहे

---

# प्रकरण २ रें.



## बौद्धनीति.

गौतमबुद्धानें नवीन कांहीं फारसें केलें नाहीं, तर ब्राह्मणधर्मांत जी मलिनता आली होती ती काढून टाकून त्याला उपनिषत्प्रणीत शुद्धधर्माचें उज्ज्वल स्वरूप प्राप्त करून दिलें, या आमच्या विधानाची सत्यता त्याच्या नीतिशास्त्रांत पूर्णत्वानें प्रत्ययास येते. प्रचलित, पतित व भ्रष्ट झालेल्या ब्राह्मणधर्मी आचारांशीं त्याचा पूर्ण विरोध होता, पण त्या धर्मांतल्या उच्च, सत्त्वपूर्ण आणि तेजोयुक्त तत्त्वांविषयीं व त्याचप्रमाणें प्राचीन ऋषींच्या आचाराविषयीं त्याचे ठायीं पूर्ण आदर होता, याविषयीं शंका नाहीं. सुत्तनिपातांत ब्राह्मणिक धर्मसूत्रांत ब्राह्मणांच्या शीलाची योग्य प्रशंसा करण्यांत आलली आहे बुद्धानें त्या ऋषींनीं रचिलेल्या प्राचीन मंत्रांचीं वचनें घेऊन त्यांवर आपल्या नीतिशास्त्राची रचना केलेली आहे गृहस्थानें पंचमहायज्ञ करणें, मातापितरांस व गुरूस मान देणें, स्त्रियांचा मान राखणें वगैरे गोष्टी त्यानें ब्राह्मणीधर्मांतून जशाच्या तशा घेतल्या जेथें शास्त्रवचन आणि विवेक यांचा विरोध दिसला, तेथें मात्र त्यानें पहिल्यापेक्षां दुसऱ्याचा विशेष आदर केला आहे कोणतेंही नीतिशास्त्र घ्या, तें यम आणि नियम यांत विभक्त असतें यम म्हणजे अनिष्ट गोष्टींचा निषेध, आणि नियम म्हणजे कित्येक गोष्टी सर्वांनीं करावयाच्या किंवा अमकच्या गोष्टी अमकच्याच प्रकारच्या व्यक्तींनीं अमकच्याच परिस्थितींत करावयाच्या असें ठरविणें बौद्धनीतिशास्त्रांत भिक्षु व गृहस्थ यांच्याबद्दलचे यम व नियम निरनिराळ्या प्रकारचे सांगितले आहेत

कांहीं मात्र सार्वत्रिक आहेत. असे सार्वत्रिक यम पांच आहेत. ते हे–अहिंसा, अस्तेय, अव्यभिचार, असत्य निषेध, व अमादन; म्हणजे— मी कोणाला दुखविणार नाहीं, कोणाच्या वित्ताचा अपहार करणार नाहीं, व्यभिचार करणार नाहीं, कोणाशीं असत्य भाषण, निंदा, वगैरे करणार नाहीं, आणि मद्यपानासारखें इंद्रियांना मांद्य आणणारें व्यसन करणार नाहीं; अशा प्रकारच्या शपथा बुद्ध आपल्या शिष्यांकडून घेववीत असे. त्याच्या नीतिशास्त्राचें सगळें सार ज्या एका श्लोकांत आणिलेलें आहे, तो असा—

सब्बपापस्स अकरणं कुसलस्स उपसंपदा
सचित्तपरियोदपनं एतं बुद्धस्स सासनं ॥

म्हणजे वाईट गोष्टी वर्जाव्या, चांगल्या कराव्या, आणि चित्त शुद्ध ठेवावें, या काय त्या बुद्धाच्या आज्ञा आहेत.

बौद्ध नीतिशास्त्रग्रंथांतून कित्येक ठिकाणीं सार्वत्रिक नीति फार उत्तम प्रकारें सांगितली आहे. अशीं कित्येक स्थळें येथें सांगतों. मंगलसुत्तांत म्हटलें आहे—

१ मूर्खांची नव्हे, तर शहाण्यांची सेवा करावी; सन्माननीयांचा सन्मान राखावा. हेंच परम सुख आहे.

२ उत्तम स्थळीं वास, सत्कर्म आणि सद्वासना हीं परम सुखें आहेत.

३ अंतर्निरीक्षण आणि शिक्षण, आत्मसंयमन आणि मधुर भाषण हीं परम सुखें आहेत.

४ मातापितरांचें पालन करणें, बायकापोरांचें लालन करणें, व आपला उद्योगधंदा शांतपणानें चालविणें, हें परमसुख आहे.

५ धर्म करणें, सदाचार राखणें, परस्परांस मदत करणें, व अनिंद्य कृत्यें करणें, हें परमसुख आहे.

६ पापांचा तिरस्कार, मद्याचा निषेध, आणि अविरत परोपकार करणें हें परम सुख आहे.

७ पवित्रता आणि नम्रता, समाधान, कृतज्ञबुद्धि व धर्मश्रवणाची इच्छा हें परमसुख आहे

८ आत्मनियम आणि शुद्धि, आर्यसत्यांचें ज्ञान, व निर्वाणप्राप्ति हें सर्वांत श्रेष्ठ प्रतीचें सुख आहे

९ संसार महार्णवातल्या लाटांच्या तडाख्यानें ज्याचें मन चंचल होत नाहीं व ज्याला दु ख, राग इ० मनोविकार कांहीं करू शकत नाहींत तो परम-सुखी होय.

१० अशा रीतीनें वागणारे सर्वदा अजिंक्यच राहणार ते सदा निर्भय असावयाचे. परम सुख त्यांना करतलामलकवत् आहे

निधिकांडसुत्तांत, मनुष्य द्रव्याला खजिना समजण्यांत कसा चुकतो, तें दाखवितांना म्हटलें आहे—

मनुष्याचा खरा खजिना म्हणजे त्यानें पुण्यकृत्यें करून किंवा धार्मिकता, आत्मसंयमन यांच्या द्वारें मंदिरांतून, संघांतून, आपल्या स्वत च्या ठायीं किंवा परक्याच्या ठायीं, जमवून ठेविलेला असेल तो हा अविनाशी आहे इतर खजिना मेल्या येथेंच राहतो, येवढा काय तो त्याच्या बरोबर जातो चोराला चोरतां येत नाहीं असा हा एकच खजिना—सत्कृत्यांनीं संपादिलेला खजिना—आहे

धम्मपदांतून अशीं नीतिपर सुंदर वाक्यें शेंकडों काढून देतां येतील पहिल्या प्रकरणांत धम्मपदांतून व चवथ्या आणि पांचव्या प्रकरणांत जातक-कथांतून असे सुंदर भाग पूर्वी दाखविण्यांत आलेच आहेत, तेव्हां त्यांची पुनरुक्ति येथें करीत नाहीं

आमगंधसुत्तांत म्हटलें आहे—क्रोध, मद्यपानाविषयीं आसक्ति, दुराग्रह, द्वेष, फसवणूक, हेवा, आत्मस्तुति, परनिंदा, अनुदारता, आणि वगैरे या गोष्टी अपवित्रता आणणाऱ्या आहेत मांसाहारसुद्धां तसाच अपवित्रता आणणारा आहे

म त्स्याहार किंवा मांसाहार यांचा निषेध, नग्नता जटाधारण, तपश्चर्या, होमहवन इ गोष्टी केल्यानें मनाला प्राप्त होणारा मोह दूर होत नाहीं

वेदाध्ययन, होमहवन, दक्षिणा, तपाचरण, यांच्यांत चित्तावरलें मायेचें आवरण दूर करण्याचें सामर्थ्य नाहीं

किंशिलसुत्त, उत्थानसुत्त इ. ग्रंथांतूनही अशीं नीतिवचनें जागोजाग आहेत. यांतेंकीं पुष्कळ नीतिवचनांचें ब्राह्मणधर्मांतील महाभारत, मनुस्मृति इ. नीतिग्रंथांतल्या वाक्यांशीं ततोतंत साम्य आहे कधीं कधीं या नीतिवचनांचा बोध मनावर ठसावा म्हणून त्या वचनांना जोडून नीतिपर कथाही बौद्धग्रंथांतून दिलेल्या आढळतात. बुद्धाच्या नांवावर असे मार्मिक दृष्टांत अनेक प्रसिद्ध आहेत. पैकीं मासल्यासाठीं एक दोन येथें देतों

**मोहरीचा दृष्टांत**—किसागोतमी नांवाची एक तरुण मुलगी होती. तिचा विवाह एका श्रीमान् तरुणाशीं मोठ्या थाटानें झाला होता. पुढें तिला एक मुलगा झाला. तेव्हां तिच्या कुटुंबांतल्या मंडळीला फार आनंद झाला व मोठा उत्सव करण्यांत आला पण हा आनंद फार वेळ टिकला नाहीं कारण तो मुलगा अल्पायु होऊन चालता बोलता होण्यापूर्वींच एके दिवशीं मेला. तेव्हां ती शोकानें फार व्याकुळ होऊन आपल्या मुलाचे प्रेताला कवटाळूं लागली, आणि कोणी तरी औषध देऊन माझ्या मुलाला बरें करा, असें ज्याला त्याला म्हणूं लागली तिच्या घरावरून एक बौद्ध भिक्षु चालला होता. त्याला हा प्रकार पाहून दया आली आणि तिच्या मनावरलें मोहाचें आवरण दूर करण्याकरितां तो तिला म्हणाला 'बाई, तू म्हणतेस तसें कांहीं औषध मला ठाऊक नाहीं, पण माझे गुरु गोतमबुद्ध यांचेकडे तूं जाशील तर ते तुझ्या मुलाला संजीवनानें औषध देतील' ती बुद्धाकडे गेली बुद्धानें तिची सारी हकीकत ऐकून म्हटलें, 'बाई, माझ्याजवळ औषध आहे, पण तें मोहरीबरोबर द्यावयाचें आहे यासाठीं ज्या घरीं आजपर्यंत कोणी पिता, पुत्र, कन्या इ० मेलें नसेल अशा घरून थोडीशी मोहरी आण' त्या बाईला बुद्धाच्या भाषणाचा गर्भितार्थ कळला नाहीं, आणि ती कोणी आजपर्यंत मेलें नाहीं अशा घराचा शोध करीत गांवभर हिंडली पण असें घर तिला दिसना, व मोहरी मिळेना शेवटीं तिचे डोळे उघडले आणि ती बुद्धाला शरण गेली. मग बुद्धानें या जगांतल आस्तित्व कसें क्षणिक आहे तें तिला समजावून तिची शंकानिवृत्ति केली तेव्हां ती बुद्धाची शिष्याण झाली

शेतकऱ्याचा दृष्टांत—हा काशीभारद्वाजसुत्तांत येणेंप्रमाणें दिला आहे: भारद्वाज नांवाचा एक धीमान् ब्राह्मण पीक चांगलें आलें म्हणून आनंदित होऊन आपल्या इष्टमित्रांसह मौज करीत असतां बुद्ध भिक्षापात्र हातीं घेऊन त्याच्यापाशीं गेले. बुद्धाला पाहून लोक भराभर त्याच्या पायां पडूं लागले. हे लोक या भिकाऱ्याच्या पायां पडत आहेत आणि आपण धीमान् असून आपणाला कोणी विचारीत नाहीं, हें पाहून भारद्वाज बुद्धाला म्हणाला, ' अरे जा; भिक्षा काय फुकटची लागली आहे ? आम्ही जमीन नांगरतों, बीज पेरतों, तेव्हां पीक येतें आणि खाण्याला मिळतें. अशी भिक्षा मागतोस त्यापेक्षां शेतकीचें काम कां करीत नाहींस ? '

बुद्ध—मी सुद्धां शेतकरीच आहें.

भार०—काय ! तूं शेतकरी आहेस ? कोठें आहे तुझी जमीन ? तुझे बैल, नांगर, बीज हीं कोठें आहेत ?

बुद्ध—धर्म हें माझें बीज मी पेरतों, आणि सत्कृत्याच्या पावसानें त्याला पीक येतें. शहाणपण आणि नम्रता हे माझे नांगर आहेत, तत्परता हा माझा बैल आहे. कळकळ हा माझा आसुड आहे. या साधनांनीं मी शेतीचें काम करतों, आणि अविद्येचें माजलेलें रान उपटून काढतों. माझें पीक म्हणजे अमृताप्रमाणें मधुर असा निर्वाण हें आहे. त्याच्या योगानें सर्व दुःखांचा परिहार होतो.

सुत्तपिटक व इतर बौद्धग्रंथांतून असे अलंकारिक नीतिपर उपदेश हवे तेवढे देतां येतील. सामान्य जनांस धर्माचीं व नीतीचीं गूढतत्वें अशा अलंकारांच्या साह्यानें फार लवकर पटतात व त्यांचा त्यांच्या मनावर चांगला परिणाम होतो, हें जाणून बुद्धानें मुद्दाम ही अलंकारांची योजना केलेली दिसते. बुद्धाच्या कांहीं उपदेशांतून फार उत्तम प्रकारची मार्मिक व्यावहारिक दृष्टिही दिसून येते असे एक दोन उपदेश येथें देतों.

## तीन प्रकारचीं माणसें.

जगांत तीन प्रकारचीं व्याधिग्रस्त माणसें असतात. कांहीं अशीं असतात कीं, त्यांनीं औषध घेतलें काय आणि न घेतलें काय, पथ्य सभाळलें काय

आणि न संभाळलें काय, त्याची शुश्रूषा करण्याला योग्य अशीं माणसें जवळ असलीं काय आणि नसलीं काय, सारखेंच. त्यांची व्याधीपासून मुक्तता कधीं व्हावयाची नाहीं हें ठरलेलेंच. दुसरे कित्येक याच्या अगदीं उलट असतात. म्हणजे त्यांनीं औषध घेतलें असो वा नसो, पथ्य ठेवलें असो अगर नसो, शुश्रूषेला माणसें असोत किंवा नसोत, तीं आपलीं दुखण्यांतून उठावयाचींच. आणखी रोग्यांचा असा एक तिसरा प्रकार आहे कीं, त्यांनीं योग्य रीतीनें औषधें घेतलीं, पथ्य वगैरे संभाळलें आणि त्याच्या प्रकृतीला जपणारीं माणसें जवळ असलीं तरच ते बरे व्हावयाचे. तसे या संसारांतही तीन प्रकारचे भवरोगी आहेत. कांहीं बुद्धाच्या दर्शनाला येवोत न येवोत, व त्याचा धर्म श्रवण करोत न करोत, पण त्याच्या धर्माच्या नियमांचें मात्र उल्लंघन करीत नाहींत; दुसरे कित्येक बुद्धाचें दर्शन करतात व धर्मोपदेश ऐकतात, आणि असें असून धर्मनियमांचें उल्लंघन करतात; आणि तिसरे, जोंपर्यंत ते बुद्धाचें दर्शन करीत असतात व धर्मोपदेश ऐकत असतात, तोंपर्यंत मात्र अधर्माचरण करीत नाहींत, पण एरवीं ते नियम खुशाल मोडतात.

तसेच कांहीं लोक हिंसापूर्ण कायकर्म, हिंसापूर्ण वाक्कर्म, व हिंसापूर्ण मनःकर्म करीत राहून हिंसापूर्ण अशा लोकांत जन्मास येतात व तेथील दुःखांचा अनुभव घेतात. त्यांना नैरयिक सत्त्व ( नरकलोकवासी ) म्हणतात. जे हिंसापूर्ण कायकर्म, वाक्कर्म व मनःकर्म करीत असून हिंसाशून्य अशा लोकांत जन्म पावतात व नाना प्रकारचीं सुखें तेथें भोगतात, त्यांना देव म्हणतात; व जे हिंसापूर्ण व हिंसाशून्य अशीं दोन्ही प्रकारचीं काय, वाक् व मन यांचीं कर्में करून हिंसा व अहिंसा दोन्हीं गोष्टींनीं युक्त अशा लोकांत जन्माला येतात व सुख आणि दुःख दोघांचाही अनुभव घेतात, त्यांना मनुष्यें म्हणतात.

या तिघांचाही फार उपयोग आहे. कांहीं जणांपासून आपणांस दुःख, दुःखाची उत्पत्ति, दुःखाचा नाश, व त्याचा उपाय हीं चार आर्यसत्यें कळतात. कांहीं जणांपासून बुद्ध, धर्म, आणि संघ यांना कसें शरण जावें तें कळतें; आणि कांहींपासून अनाश्रव चेतोविमुक्ति व प्रज्ञाविमुक्ति हीं अनुभवण्यास मिळतात. या जगांत आणखी थोर उपकारी माणसें तीं कोणी असतात? अभिवादन,

प्रत्युत्थान, अंजलिकर्म, चीवरपिंडपातदान (अन्न, वस्त्र व पात्र यांचें दान), व शयनासनभैषज्यदान इत्यादि गोष्टींनीं त्यांच्या उपकारांची फेड करतांच यावयाची नाहीं.

संसारांत (१) अरुकोंपमचित्त (२) विद्युदुपमचित्त, (३) व वज्रोपमचित्त असे तीन प्रकारचे लोक असतात. पहिल्या प्रकारचे लोक रागीट व नैराश्ययुक्त असतात. अशांशीं व्यवहार करणें कठीण असतें. दुसऱ्या प्रकारच्या लोकांत एक गुण असतो. ज्याप्रमाणें अंधारांत विजेच्या चमकीपासून मिळालेल्या क्षणिक प्रकाशाच्या साह्यानें कित्येकांना चोहोंकडचें दिसतें, त्याप्रमाणें थोडेसे उपदेशाचें साह्य मिळाल्याबरोबर हे लोक चार आर्यसत्यांचें तत्काल ग्रहण करतात. तिसऱ्या प्रकारचे लोक म्हणजे जसें वज्राला एखादें रत्न काय आणि पाषाण काय सारखेच, तसे चेतोविमुक्ति व प्रज्ञाविमुक्ति प्राप्त झालेल्या लोकांपाशीं भेदाभेद उरत नाहीं.

कित्येक असे असतात कीं, त्यांचें भजन, उपासना, सेवा वगैरे कांहीं करण्याचें कारण नसतें. कित्येकांबद्दल तें करावयाला हवें असतें, आणि कित्येकांबद्दल या गोष्टी मोठ्या आदरानें व थाटामाटानें करावयाच्या असतात. जे शील, समाधि व प्रज्ञा यांनीं युक्त नाहींत, त्यांचें भजन, पूजन, सेवा वगैरे कांहीं करण्याचें कारण नाहीं. अशांबद्दल दया व अनुकंपा हीं प्रगट करावीं. जे तुल्यशीलसंपन्न, समान समाधियुक्त, व सदृशप्रज्ञाविशिष्ट त्यांची मात्र पूजा, भजन व सेवा केली पाहिजे, आणि जे या तीन गुणांत तुमच्याहून श्रेष्ठ असतील त्यांची सेवा वगैरे मोठ्या आदरानें व आग्रहपूर्वक करावी. कारण, त्यांच्या उदाहरणापासून तुम्हांस लाभ घडतो. हीन व्यक्तींच्या पूजनानें मनुष्याला हीनता येते, तुल्य व्यक्तींच्या पूजनानें हीनता येत नाहीं येवढेंच, पण श्रेष्ठ पुरुषाच्या पूजनानें पतित मनुष्यसुद्धां उन्नतीला पोंचतो.

जे दुःशील, पापाचरणी, अपवित्र श्रमणांसारखें उपयुक्त कार्य न करतां स्वतःस तें गौरवयुक्त पद लावून घेतात, ब्रह्मचारी नसून ब्रह्मचारी म्हणविण्यासाठीं ज्यांची धडपड चालली असते, अशा अंतर्यामीं दुर्गंध भरलेल्या माणसांचा तिटकारा करणें योग्य; आपण बोलू लागलों असतां जे लवकर रागावतात

किंवा आक्रोश करतात अशांची उपेक्षा करणें योग्य, पण जे शीलवान् व कल्याणकर्ते असतील अशांची सेवा, पर्युपासना वगैरे केली पाहिजे अशांच्या सत्कृत्यांची प्रशंसा प्रत्येकक्षण करतो, व त्यांच्या कीर्तीचा परिमळ सर्वत्र पसरतो.

माणसी तीन प्रकारचे लोक असतात. कित्येक सभेंत, परिषदेंत, दरबारांत व लोकांपुढें जें वस्तुतः ठाऊक नसतें तें ठाऊक आहे म्हणून सांगतात, पाहिलेलें नसतें तें पाहिलें आहे म्हणून म्हणतात, व स्वार्थामुळें म्हणा परोपकाराच्या बुद्धीनें म्हणा अथवा लोभानें अंध होऊन म्हणा, समजपूर्वक खोटें सांगतात; त्यांना गूथभाणी म्हणतात. जे कोणत्याही कारणानें खोटें न सांगतां जें ठाऊक असेल तेवढेंच ठाऊक आहे म्हणून म्हणतात, नसेल तें नाहीं म्हणून स्पष्ट सांगण्यास कांकू करीत नाहींत, ते पुष्पभाणी; व जे सर्वांना गोड सुखकर, प्रेमपूर्ण व तृप्तिदायक असें भाषण करतात त्यांना मधुभाणी म्हणतात.

माणसी अवकुंभसम, उदकुंभसम व पृथुरस, असे तीन प्रकारचे लोक असतात. पहिल्या प्रकारच्या लोकांची मनें पालथ्या घागरीसारखीं असतात. पालथी घागर समुद्रांत कितीही जोरानें आंत दाबली तरी तिच्या आंत पाणी प्रवेश करूं शकत नाहीं, तसें भिक्षूंनी कितीही जीव तोडून यांना धर्मोपदेश केला, तरी तो यांच्या डोक्यांत शिरत नाहीं। म्हणून यांना अवकुंभसम (म्हणजे पालथ्या घागरीसारख्या बुद्धीचे) असें नांव दिलें आहे. कांहीं लोक भिक्षूपाशीं धर्मोपदेश ऐकत बसतात, तोंपर्यंत त्यांचें लक्ष धर्माकडे असतें; पण उद्याप्रमाणें बसलेल्या माणसाच्या मांडीवरच्या जिनसा तो उठतां क्षणींच पडतात, त्याप्रमाणें ही मंडळी आसनावरून उठतांच ऐकलेलें धर्मज्ञान गळून पडतें. म्हणून यांना उदकुंभसम (मांडीवर ठेवलेल्या जिनसाप्रमाणें गळून पडणाऱ्या बुद्धीचे) म्हणतात. तिसऱ्या प्रकारचे लोक अगदीं निराळ्या तऱ्हेचे असतात. पाण्यानें भरलेल्या घागरीतला एक थेंब जसा बाहेर जात नाहीं, तसें ऐकलेलें धर्मज्ञान यांनी आपल्या मनांत पूर्णपणें सांठविलेलें असतें. यांना पृथुरस म्हणतात.

या उपदेशांत बुद्धानें केलेलें जनाचें सूक्ष्म परीक्षण, त्याची विवेचनपद्धति व दृष्टांतांचा यथोचितपणा हीं चांगलीं दिसून येतात.

## सुखाची झोंप.

दुसऱ्या एका वेळीं ‘ सुखाची झोंप ’ कशाला म्हणावी, यासंबंधानें सांगण्याचा प्रसंग आला. भगवान् बुद्ध श्रावस्ती येथें वनांत रहात असतांना हस्तक नांवाचा भिक्षु आला, आणि वंदन करून म्हणाला, ‘ भगवन्, रात्रीं आपल्या निद्रेचा भंग तर झाला नाहींना ? ’ बुद्ध म्हणाले, ‘ वत्स ! मला सुखाची झोंप आली. संसारांत सुखाची झोंप घेणारे असतात त्यांपैकींच मी एक आहें. ’ हें उत्तर ऐकून हस्तकाला आश्चर्य वाटलें. तो म्हणाला, ‘ भगवन् ! आपण हें कसें म्हणतां ! हे थंडीचे दिवस, रात्रीं थंडीचा कोण कडाका होता ! अंग ला झोंबणारा गार वारा वाहत होता. आपणांजवळ ओढायला किंवा पांघरायला या काषायवस्त्राशिवाय कांहीं नाहीं. येथें जमिनीवर गोखरू पसरलेले आहेत. या ठिकाणीं शुष्क झाडांच्या पानांवर आपणास सुखाची झोंप आली, असें आपण म्हणतां हें कसें !’

हा प्रश्न ऐकून भगवान् बुद्ध हसून म्हणाले, ‘ हे वत्स ! कल्पना कर कीं, उत्तम पेटीसारखें घर आहे. वाऱ्याचा रिघाव आंत येण्याला जागा नाहीं. निजायला पलंग आहे मऊ बिछाना आहे, पांघरायला ऊबदार वस्त्रें आहेत; पण माणसाच्या देहाला कांहीं व्याधि आहे किंवा मनाला काम, क्रोध, वगैरे विकार जाळीत आहेत, तर त्याला अशा जागीं सुखाची झोंप लागेल काय ? ’ हस्तक म्हणाला, ‘ नाहीं. ’ बुद्ध म्हणाले, ‘ झालें तर. निद्रेचा भंग करणारे जे कामक्रोधादि विकार ते समूळ काढून टाकल्यावर मला सुखाची झोंप कां लागणार नाहीं ! कायिक, वाचिक, व मानसिक दुष्कृत्यें हीं या लोकीं सुखाची निद्रा मिळूं देत नाहींत, व परलोकींही अधोगतीला नेतात.’

बौद्धधर्मानें मनुष्याचे दोन वर्ग केले आहेत. एक प्रापंचिकांचा आणि दुसरा भिक्षूंचा; व त्यांच्या मार्गे निरनिराळीं कर्तव्यें, नियम वगैरे लावून दिले आहेत. प्रापंचिकांपेक्षां भिक्षूंनीं हे नियम अधिक कडक रीतीनें पाळले पाहिजेत, असा निर्बंध घालून दिला आहे. या नियमांविषयीं थोडीशी माहिती येथें देणें अवश्य आहे.

प्रापंचिकांसाठीं नियमः-हे धाम्मिकसुत्त या ग्रंथांत स्पष्ट सांगितले आहेत त्यांतले मुख्य हे-

(१) त्यानें स्वतः हिंसा करूं नये, किंवा दुसर यानें केल्यास त्या कृत्याला आपली संमति किंवा पसंती देऊं नये.

(२) चोरी करूं नये, व चोरीला संमति देऊं नये.

(३) व्यभिचार हा भयंकर अग्निकुंडासारखा समजून तो न घडण्याविषयीं जपावें.

(४) खोटें बोलूं नये, खोटी साक्ष देऊं नये, असत्याला संमति देऊं नये.

(५) मादक पदार्थांचें सेवन करूं नये; दुसऱ्याला मादक पदार्थ पाजूं नयेत व तशल्या कृत्याला संमति देऊं नये. मद्यपान हें पापाचरणाचें मूळ आहे, म्हणून तें वर्जावें.

या पांच गोष्टींना पंचशीलें म्हणतात. प्रत्येक बौद्धानें यांचें पालन केलेंच पाहिजे याशिवाय धर्मशील माणसानें उपोसथ (उपोषण करणें, जमिनीवर फक्त चटई टाकून निजणें व सुगंधि द्रव्यांचा त्याग) मत शक्य तितक्या मुदतीपर्यंत करावें. याला अष्टांगशील (अष्टांगशील) म्हणतात उपोसथाचे कांहीं नियमित दिवस आहेत वैदिकधर्मांतही उपोषणाचे दिवस सांगितले असून पारणें फेडल्यावर लोक चंद्राची पूजा करून सोमरस अर्पण करीत बुद्धानें चंद्राची पूजा व सोमरसाचें अर्पणाचा विधि काढून त्याबद्दल नीत्युपदेशाचें श्रवण, नीतिसूत्रांचें पठन व पाठन हे विधि घातले. या व दुसऱ्या कित्येक गोष्टींवरून बुद्धानें मूळ वैदिक व ब्राह्मणधर्मांला विनाकारण धक्का न लावतां त्यांच्यांतला चांगला भाग कायम ठेवून बाकीच्या भागाचें इष्ट दिशेनें कसें परिवर्तन केलें, तें दिसून येईल.

या शीलांखेरीज आठ शीलें व १ गायन-नृत्यादिकांपासून अलिप्त राहणें व २ घेणें, चांदी इ. चा संग्रह न करणें मिळून दशशीलें होतात. हीं भिक्षूंसाठीं सांगितली आहेत

## दशपापानि.

दश पापें मुख्य आहेत पैकी ३ कायिक, ४ वाचिक आणि ३ मानसिक आहेत तीं अशीं—कायिक–१ हिंसा, २ चोरी, ३ व्यभिचार, वाचिक– १ असत्य भाषण, २ निंदा ( यांतच चुगली सांगणें याचा अंतर्भाव होतो ), ३ असभ्य भाषण, आणि ४ प्रौढी; मानसिक–१ लोभ, २ मत्सर, द्वेष, ३ नास्तिकता नास्तिकता म्हणजे सब कुछ झूट आहे, हें जग नाहीं, परलोक नाहीं, धर्म नाहीं, नीति नाहीं, जन्म नाहीं, पुनर्जन्म नाहीं, कर्मफलाची प्राप्ति नाहीं वगैरे म्हणून यथेच्छाचारास प्रवृत्त होणें.

सिगालोवादसुत्तांत बुद्धानें आईबाप, मुलें, गुरु, शिष्य, पति, पत्नी, मित्र, स्वामी, चाकर, इ० चीं परस्परांविषयींचीं कर्तव्यें सांगितलीं आहेत या सर्व गोष्टींत बौद्धधर्माचें व ब्राह्मणधर्माचें पूर्ण साम्य आहे, हें सांगावयास नको या नीतिनियमांसबधानें प्रो. व्हिस डेविड्स् सारख्या पाश्चात्य विद्वानानें पुढील प्रशसापर उद्गार काढले आहेत यावरून ते किती चांगले असले पाहिजेत त्याची कल्पना करतां येते प्रो व्हिस डेव्हिड्स् म्हणतात—

" We can realize how happy would have been the village or the clan on the banks of the Ganges, where the people were full of the kindly spirit of fellow feeling, the noble spirit of justice, which breaths through these naive and simple sayings "

**भिक्षूंसाठीं नियम**—गोतमबुद्धाच्या पूर्वीपासून आपल्या देशांत सन्यासी सप्रदाय आहे व वासनानिवृत्ति करून मुक्तिलाभ करून घेण्याला तो एक श्रेष्ठचा मार्ग आहे, म्हणून ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ या तीन आश्रमांपुढची सन्यासाश्रमाची पायरी ठेविलेली आहे गोतमबुद्धानें या पायरीला भिक्षुधर्म हें नांव दिलें, व साध्या नियमांत थोडेसे फेरफार केले, यापेक्षां ज्यास्त कांहीं केलें नाहीं, असें कित्येक म्हणतात, तें खरें आहे भिक्षूंचे सघ स्थापून सघद्वारानें त्यांच्या हातून धर्मप्रचाराचें काम करविण्याची कल्पना अतिशय महत्वाची होती, व बौद्धधर्माच्या प्रसाराला ती अतिशय साह्यभूत झाली हें

इतिहासद्दांस विदितच आहे. बौद्धभिक्षूंसाठीं केलेले नियम कसे होते, हें पुढील माहितीवरून कळेल.

वयाच्या आठव्या वर्षापूर्वी कोणालाही बौद्धधर्माची दीक्षा घेतां येत नसे. त्याचप्रमाणें विसाव्या वर्षापूर्वी कोणालाही भिक्षूची दीक्षा देऊं नये, असा बुद्धानें नियम केला होता. गृहस्थधर्माच्या त्यागाला ' प्रव्रज्या ' अशी बौद्धधर्मात संज्ञा आहे. भिक्षुसंप्रदायांत प्रविष्ट होणें याला उपसंपदा म्हणतात.

## प्रव्रज्या.

भिक्षु होऊं इच्छिणारानें एखाद्या भिक्षूकडे जाऊन व त्याच्या हातीं काषाय ( भगवें ) वस्त्र देऊन त्याला आपली इच्छा तीनदां कळवावी, व मला प्रव्रज्या द्या, अशी तीनदां त्यानें प्रार्थना करावी. मग त्यानें त्रिशरणासह दसशीलांसाठीं मी याचना करीत आहें, असें म्हणावें. नंतर त्या उपाध्यायाच्या (भिक्षूच्या) आज्ञेनें भगवान् अर्हत् सम्यक् संबुद्धाला त्रिवार नमस्कार करून ' बुद्धं शरणं गच्छामि, धर्मं शरणं गच्छामि, संघं शरणं गच्छामि ' असें त्रिवार म्हणावें. याला त्रिशरण म्हणतात. नंतर, मी प्राणिवध करणार नाहीं, परद्रव्याचा अपहार करणार नाहीं, इ० वर सांगितलेल्या दशशीलांचा स्वीकार करतों असें त्रिवार म्हणावें. याप्रमाणें म्हटल्यावर उपाध्यायानें त्याला त्रिशरण व दशशील यांचें नीट परिपालन कर असें सांगून आशीर्वाद द्यावा.

याप्रमाणें प्रव्रज्या घेतलेल्यास चार प्रकारचे प्रत्यवेक्षणविधि करावे लागतात. १ चीवरप्रत्यवेक्षण--म्हणजे शोभेसाठीं नाहीं, तर शीतोष्ण, पर्जन्य इ. पासून देहाचें रक्षण करण्यासाठीं व लज्जारक्षणार्थ वस्त्रें पांघरणें, २ पिंडप्रत्यवेक्षण-म्हणजे विलास, जिव्हालौल्य इ. साठीं नव्हे, तर केवळ जिवाच्या रक्षणार्थ आहार करणें; ३ शयनासन प्रत्यवेक्षण--म्हणजे वायु, सर्प, वृश्चिक, इ. पासून संरक्षण करण्यासाठींच आसन व शय्या स्वीकारणें; ४ भैषज्यप्रत्यवेक्षण—म्हणजे केवळ रोगाचा प्रतिकार करण्यासाठीं व आरोग्यार्थ औषध सेवणें.

याप्रमाणें हे चार विधि करण्याबद्दल शपथ घेतल्यानंतर त्याला दहा प्रश्न ... व त्यांची तो उत्तरें देतो. हे दहा प्रश्न नामरूप, पंचस्कंध व चार आर्यसत्यें या संबंधाचे असतात. त्याबद्दल त्याला बौद्धधर्माच्या मूलतत्त्वांची

तरी माहिती आहे की नाही, याची परीक्षा होते. मग संप्रदायांत प्रवेश करताना म्हणजे उपसंपदा घेताना हातांत एक भिक्षापात्र, अंगावर एक बाहेरचें व एक आंतलें वस्त्र, वगैरे घेऊन तो आपल्या उपाध्याया-बरोबर भिक्षुसंघांत जातो; व त्याला संघांत घेण्याविषयी उपाध्यायानें शिफारस केल्यावर, तुला कांही व्याधि नाहींना? कोणाचें कर्ज नाहीं ना? तू राजाचा भृत्य नाहींस ना? तुला आईबापांची संमति आहेना? वगैरे प्रश्न विचारण्यांत येतात सर्व भिक्षुसंघासमक्ष त्यांची समाधानकारक उत्तरें दिल्यावर व संघानें संमति दिल्यावर स्वतःच्या छायेची लांबी, उपसंपदा घेण्याचा दिवस व नक्की काळ यांचा उच्चार केल्यावर संघाचे वरिष्ठ अधिकारी त्याला भिक्षूंना राहणी कशी असली पाहिजे, वगैरे गोष्टींचा उपदेश करून व त्याच्याकडून भिक्षूचा वेष धारण करवून व धर्मपाल, बुद्धरक्षित, धर्मवंश अशें एखादें नवें नांव देऊन त्याला संघांत घेतात

बुद्धाच्या वेळीं राजे लोकांकडून मठांना देणग्या वगैरे मिळाल्या नव्हत्या आणि जरी कोणी देऊ केल्या असत्या, तरी त्यांचा स्वीकार बुद्धानं केला असता कीं नाहीं, याची शंकाच आहे कारण भिक्षूंनी कडकव्रताचें आचरण करून लोकांची निरपेक्ष सेवा करावी, असा संघ निर्माण करण्यांत बुद्धाचा जो मुख्य उद्देश तो त्यामुळें निष्फळ झाला असता बुद्धाच्या नंतर अशोक राजानें बहुतेक मठाला देणग्या देण्याचा प्रघात पडला पण त्याचा परिणाम काय झाला तो सर्वांसच विदितच आहे त्याच्या योगानें मठवासी भिक्षूंत आळसाची वृद्धि झाली, भांडणें झालीं, अनाचाराकडे त्यांची प्रवृत्ति झाली, आणि खऱ्या धर्मा चरणाला दांभिकपणाचें स्वरूप आलें बुद्धाच्या वेळीं खऱ्या धार्मिक प्रवृत्तीचे लोक तेवढे भिक्षूचें कडकडीत व्रत स्वीकारण्यास पुढें येत दृढ निश्चय व धर्मा विषयींची मनाची खरी तळमळ यांच्या जोरावर भिक्षुव्रत अविच्छिन्न पाळून ते निर्वाणप्राप्तीचा बुद्धानें दाखविलेला मार्ग यथाशक्ति आक्रमीत पण राजाश्रय प्राप्त झाल्यानंतर ही स्थिति राहिली नाहीं

असो; भिक्षा घेण्याला कोण सत्पात्र आहे व कोण नाहीं, या विषयीं धम्मपदांत म्हटलें आहे —

'जो स्वतः निष्कलंक वर्तनाचा नसेल व ज्याच्या ठायीं आत्मसंयमन व प्रामाणिकपणा नसेल, तो भिक्षुचें काषायवस्त्र परिधान करण्यास पात्र नाहीं. जो शुद्ध, शास्त्रज्ञानसंपन्न, प्रामाणिक व आत्मसंयमी असेल तोच योग्य आहे '

'ज्या भिक्षूला कमी भिक्षा मिळाली असतांही आपल्या योग्यतेहून कमी मिळाली असें वाटत नाहीं, जो वाक्यसंयम करणारा, निगर्वी आणि जगाला ज्ञानप्रकाश देणारा व मधुभाषी असतो, ज्याचें चरित्र शुद्ध आणि ज्याला आळस ठाऊक नाहीं, त्याचें माहात्म्य देव सुद्धां वाढवितात विश्वप्रेम ज्याच्या आचरणांत प्रतिबिंबित झालें असतें, बुद्धाचा उपदेश हेंच ज्याचें आनंदाचें निधान, जो सदा संतुष्टचित्त, तोच निर्वाण प्राप्त करून घेतो '

'जटा वाढविल्यानें किंवा ब्राह्मणकुलांत जन्मल्यानें का कोणी ब्राह्मण होत असतो ? सत्य आणि साधुता हीं तर ब्राह्मण्याचीं मुख्य लक्षणें आहेत. तीं नसल्यास मूर्खा, जटा किंवा मृगचर्म धारण केल्याचा काय उपयोग ? तुझ्या अंतर्यामीं सर्व सगळी दुर्वासनांची घाण भरली आहे, आणि बाहेरून मात्र तू स्वच्छता ठेवू पहात आहेस !'

हिरीसुत्त, नवसुत्त, मुनिसुत्त, धम्मचरिय सुत्त, सम्मापरिब्बाजनीयसुत्त वगैरे प्रकरणांतून भिक्षूंनीं कोणत्या गोष्टींवर विश्वास ठेवावा, कसें वागावें, काय करावें, वगैरे पुष्कळ गोष्टींची सविस्तर माहिती दिली आहे तिजवरून असें दिसतें कीं, भिक्षूंनीं केवळ रोजच्या उदरनिर्वाहाच्या साधनापलीकडे कशाचीही अपेक्षा करू नये, द्रव्यसंग्रह करू नये, वासना ठेवूं नये; शकुन, स्वप्नें, उत्पातपात वगैरे गोष्टींवर भरवसा ठेवू नये, लोकांनीं आपणांस मान द्यावा व नमस्कार करावा, अशीसुद्धां अपेक्षा करू नये; उलट लोकांनीं छळलें तरी त्यांवर प्रेमच करावें, शांतता व समाधान ठेवावें, व इतर धर्मांविषयीं उदारबुद्धि ठेवावी, अशी बुद्धाची आज्ञा होती.

शांतिदेवकृत बोधिचर्यावतार ग्रंथांत बौद्धजीवनाचा खरा आदर्श वर्णिला आहे त्याचप्रमाणें विनयपिटकाच्या आरंभीं पातिमोक्ख (प्रातिमुख्य) म्हणून जो भाग आहे, त्यांत भिक्षूच्या व्रताचे नियम (पाराजिक धर्म, संघादि-

दोष, अनियत धर्म, प्रायश्चित्तें वगैरेंची फार विस्तारपूर्वक माहिती दिली आहे. ती अंशतः देण्याइतका सुद्धां स्थलावकाश या पुस्तकांत नाहीं, तथापि वाचकांना भिक्षूंच्या आचिवाराबद्दलची थोडीशी कल्पना व्हावी, म्हणून या मतासंबंधीं अगदीं ठळक नियम येथें देतों. ते असे.—

भिक्षूंनीं चार प्रतिपक्षना करावयाच्या; म्हणजे देहाची अशुद्धता संवेदनापासून होणारे दुष्परिणाम, विचारांचें क्षणिकत्व, आणि अस्तित्वाच्या अवश्य गोष्टी यांचा विचार करावयाचा. त्याचप्रमाणें दुर्गुण अंगीं जडूं नयेत, जडलेले टाकता यावे, सद्गुण संपादावे, व असलेले वाढवावे याविषयीं प्रयत्न ( सम्मप्पधाना ) करावे. इद्धि ( ऋद्धि ) म्हणजे साधुत्व संपादण्याची इच्छा ठेवावी, त्यासाठीं प्रयत्न करावे, त्यासाठीं अवश्य ती अंत करणाची पूर्वतयारी करावी, आणि शोध ठेवावा. श्रद्धा, उत्साह, स्मृति, चिंतन आणि स्वाभाविक ज्ञान हीं चार बलें किंवा मानसिक इंद्रियें दृढ करावीं. त्यासाठीं निरनिराळ्या प्रकारचीं ध्यानें व समाधि वगैरे उपाय सांगितले आहेत ते करावे, व सर्वांत मुख्य म्हणजे अष्टांगिक मार्ग याची सिद्धि करावी, म्हणजे निर्वाणप्राप्ति होते.

यांत हें लक्षांत घेण्याजोगें आहे कीं, बौद्धधर्माची भिस्त ईश्वरी कृपेसारख्या गोष्टीवर नाहीं, तर स्वत:च्या मनाच्या तळमळीवर, स्वावलंबनावर, शुद्धाचरणावर आणि दीर्घ प्रयत्नावर आहे

---

# प्रकरण ३ रें.

## बौद्धदर्शन.

बुद्धाचे मूळ उपदेश पाहिले व त्याच्याजवळ अगदीं मरण काळापर्यंत राहिलेले त्याचे सारिपुत्त, आनंद, उपालीप्रभृति शिष्य यांनीं प्रचारित केलेल्या बौद्धधर्ममतांचा विचार केला म्हणजे कोणाही सरळ मनाच्या आणि विचाराच्या माणसाला नि:संशय असें वाटतें कीं, बुद्धाच्या मागून त्याच्या नांवावर विकलेलें बौद्धदर्शन ऊर्फ बौद्धतत्त्वज्ञान हीं खुद्द बुद्धाच्या मतांची

निव्वळ विकृति किंवा उपहास आहे, त्यांत विश्वास ठेवण्यासारखा अंश लेश-मात्र नाहीं. 'सर्वदर्शनसंग्रह' नांवाच्या हिंदुआचार्यप्रणीत सर्वमान्य ग्रंथांत गौतमबुद्धाचें तत्त्वज्ञान म्हणून जें तत्त्वज्ञानविषयक मत संग्रहित झालेलें आहे, तें गौतमबुद्धाचें नसून त्याच्या शिष्यपरंपरेंत होऊन गेलेल्या अनेक संप्रदायांच्या परस्परविरोधी मतांची खिचडी आहे. वस्तुतः ज्याचा आपणास प्रत्यय येत नाहीं, जें आपल्या ज्ञानाला व बुद्धीला अगम्य, जें केवळ तर्काधीन, जें सामान्य लोकांना गहन वाटणारें व गूढ त्या तत्त्वज्ञानावर बुद्धानें आपली भिस्त कधींच ठेविली नव्हती. कित्येक वेळां लोक त्याला येऊन म्हणत कीं, हें जग कोणीं, केव्हां व कसें निर्माण केलें? या जगांत दुःखाची उत्पत्ति कशी झाली? व पुढें या जगाचें काय होणार? याविषयीं आम्हांला कांहीं सांगा. अशा वेळीं केव्हां स्वतःकडे अज्ञानदोष घेऊन, केव्हां हा वाद म्हणजे शुद्ध वितंड-वाद आहे, निष्फळ शब्दच्छळ आहे, त्यापासून व्यवहारदृष्ट्या कांहीं फायदा नाहीं, अशी पृच्छा करणाराची समजूत घालून, आणि केव्हां या प्रश्नांना निश्च-

१ परिव्राजक पोट्ठपाद यानें एकदां सत्ता आणि आत्मा हीं एकच कीं भिन्न, हें जग नित्य आहे कीं अनित्य, जीव आणि शरीर एकच कीं भिन्न, मृत्यूनंतर कोणती गति मनुष्याला प्राप्त होते, वगैरे अनेक गोष्टींसंबधानें बुद्धाला प्रश्न केले असतां त्यानें या एकादी प्रश्नाचें उत्तर दिलें नाहीं. ज्यानें जगाच्या कल्याणासाठीं सारा जन्म आपला देह झिजविला, ज्यानें प्रचलित ब्राह्मणधर्म जावाचें शाश्वत कल्याण साधण्यास निरुपयोगी आहे, असें विचाराअंतीं ठरवून आपला नवा धर्ममार्ग प्रचारांत आणिला व ज्यानें अनेक ब्राह्मणपंडितांना वादांत निरुत्तर करून त्यांना आपल्या धर्ममार्गांत ओढिलें, त्यानें या प्रश्नाचा मुळीं विचारच केला नसेल, ही गोष्ट संभव-नीय दिसत नाहीं. मग त्यानें या प्रश्नाचीं उत्तरें कां दिलीं नाहींत, हा प्रश्न पुढें येतो. या प्रश्नाचें उत्तर खुद्द बुद्धानेंच पोट्ठपादाला दिलें तें असें आहे "न हेत पोट्ठपाद अत्थसंहित, न धम्मसंहित न आदिब्रह्मचरियक, न निब्बिदाय, न विरागाय, न निरोधाय, न उपसमाय, न अभिञ्ञाय, न संबोधाय, न निब्बाणाय संवत्तति। तस्मा त मया अब्याकत।" (पोट्ठपादसुत्त २८.) म्हणजे त्यापासून कोणताही प्रयोजन-सिद्धि होत नाहीं, धर्मसिद्धि होत नाहीं, ब्रह्मचर्यसिद्धि होत नाहीं, त्यापासून

यात्मक उत्तरें देण्याचा आव घालणारांची कशी फजिती होते, हें दृष्टांतांनीं दाखवून गोतमानें या प्रश्नांचीं उत्तरें देण्याचें साफ नाकारलें होतें. पण जेथें देवदूतसुद्धां पाऊल टाकण्यास भितात, तेथें मूर्ख लोक खुशाल संचार करतात, अशा अर्थाची एक इंग्रजी म्हण आहे. तिला बुद्धाच्या शिष्यवर्गांतील कित्येक आचार्य म्हणविणारांनीं पुष्टि आणून बुद्धाच्या नांवाखालीं दोषयुक्त, गहन, जटिल आणि केवळ कल्पनेच्या आणि तर्काच्या पायावर उभारलेलें असें एक दर्शन निर्माण केलें, व कालांतरानें गोतमबुद्धाच्या धर्माला जें पायाभूत दर्शन तें हेंच अशी लोकांची समजूत होऊन त्या दर्शनाच्या गुणदोषांच्या मापानें लोक बुद्धाच्या धर्मतत्त्वांचा बरेवाईटपणा मापूं लागले. बुद्धाचें धर्ममत आणि बौद्धधर्ममत यांच्यांतली भिन्नता पुढें पुढें इतकी वाढली आणि पहिल्याला गौणत्व व दुसऱ्याला इतकें प्राधान्य मिळालें कीं, कांहीं दिवसांनीं अस्सल बुद्धमताचा लोकांना विसर पडला आणि विकृत बुद्धमतच बौद्धदर्शन या नांवानें पुढें आलें. खऱ्या बुद्धाच्या धर्ममताचा विसर पडून विकृत मतच अस्सल मताची जागा पटकावून बसलें. शंकराचार्यांनीं व कुमारिल भट्टांनीं दिग्विजय मिळविला, तो खऱ्या बुद्धमतावर नसून या विकृत बौद्धमतावर मिळविला, ही गोष्ट येथें नमूद करणें अवश्य आहे. बुद्धाचीं खरीं मतें काय होतीं, यांविषयींचें विवेचन मागील अनेक प्रकरणांत जागोजाग आलेंच आहे. तथापि येथें पुनः बुद्धाच्या दर्शनाविषयीं संक्षेपानें सांगतों. आर्यसत्य या नांवाचीं दुःख, समुदय, मार्ग व निरोध हीं चार तत्त्वें आहेत. स्कंध

---

निर्वेदाला, वैराग्याला, निरोधाला (ध्यानविशेषाला), अभिज्ञेला, संबोधाला, निर्वाणाला, कशालाच कांहीं उपयोग नाहीं. यासाठीं तें मी प्रकाशित नाहीं." असें बुद्ध सांगतात. सारांश काय, तर एक तर या प्रश्नांचीं उत्तरें सामान्य जनाला दुर्बोध—न समजणारीं—असतात, व दुसरें, त्यांचा कथ्यकूट करण्यापासून कांहीं लाभही नाहीं; सबब त्यांचीं उत्तरें बुद्धानें दिलीं नाहींत. मंडिस्स व जालिय या दोघां भिक्षूंनीं दुसऱ्या एका प्रसंगीं असेच प्रश्न केले असतां त्यांनाही बुद्धानें साफ सांगितलें कीं, मनुष्यजीवनाचें जें प्रधान लक्ष्य असलें पाहिजे, त्याच्या ज्ञानाला या प्रश्नांच्या उत्तराची काडीमात्र आवश्यकता नाहीं. [जालिय सुत्त १–५]

पाच असून वेदनास्कंध, विज्ञानस्कंध, संज्ञास्कंध, संस्कारस्कंध व रूपस्कंध अशीं त्यांचीं नांवें आहेत संसारात त्यांची वृद्धि व क्षय हीं होतात. सर्व-क्षणिकत्व ज्ञान हें विज्ञान होय. सुख व दुःख यांचा अनुभव हीच वेदना आहे. संज्ञा म्हणजे नाममात्र, या जगांत स्त्री, पुत्र, मित्र, भ्राते, इत्यादिकांचा संबंध अथवा घट पटादि पदार्थांचा समूह पारमार्थिक (त्रिकाल सत्य) नाहीं संस्कार म्हणजे पूर्व अनुभवाप्रमाणें ज्ञानाची उत्पत्ति, आणि रूप म्हणजे गति-युक्त परमाणूंचा समुदाय हे विस्तार पावणारे पांच स्कंध म्हणजेच दुःख या नांवाचं पहिलें आर्य सत्य किंवा तत्त्व आहे

ज्याच्यापासून लोकांत राग, द्वेष व मोह यांचा, मी व माझा या स्वभावाचा सर्व गण उदय पावतो, त्याला समुदय नावाचें तत्त्व म्हणतात. हा माझा, व हा मजहून निराळा आहे, हा माझा नव्हे, दुसऱ्या कोणाचा आहे, इत्यादि भाव हेंच प्रेम व द्वेष यांचं कारण आहे

सर्व संस्कार क्षणिक आहेत, अशा प्रकारची जी वासना तिला मार्ग म्हणतात म्हणजे या त्रिभुवनांत जवढे म्हणून पदार्थ आहेत, त्यांतील ज्याचें ज्या क्षणीं ज्ञान होतें त्याचें त्याच्या पुढच्या क्षणा ' तोच हा ' अशा प्रकारचें अनुसंधान झाल्यामुळें ज संस्कार-ज्ञानाचे प्रवाह-उत्पन्न होतात, तेच विचार केला असतां क्षणिक ठरतात. नंतर ते सर्व क्षणिक आहेत, अशी वासना दृढ करणें याला बौद्धमतांत मार्ग या नावाचें तिसरें आर्य सत्य किंवा तत्त्व म्हटलें आहे सर्व क्षणिक असल्यामुळेंच निरात्मक आहे, अशी वासना दृढ करणें याला निरोध अथवा मोक्ष किंवा अपवर्ग म्हणतात. हें चवथें आर्य सत्य आहे

हीं तत्त्वें आहेत आतां त्यांच्याशीं अगदीं संबद्ध असलेलीं आयतनें सांगतों -पांच ज्ञानेंद्रियें, शब्दादि पंच विषय, मन व धर्मप्रधान चैत्यस्थान (बुद्धि) हीं बारा आयतनें आहेत निश्चित ज्ञान दोन प्रकारांनीं होतें असल्यामुळें बौद्धमतांत प्रत्यक्ष व अनुमान हीं दोनच प्रमाणें मानलेलीं आहेत. इंद्रियांच्या योगानें होणारें जें ज्ञान तें प्रत्यक्ष, व कार्यरूप लिंगावरून कारणरूप लिंगवान् पदार्थाचें ज्ञान होणें हें अनुमान होय. शब्दसंसर्गयुक्त (शब्दजन्य व शब्दमात्र) मतीला कल्पना असें म्हणतात अशा कल्पनेनें व भ्रांतीनें रहित

असलेलें जें ज्ञान तें प्रत्यक्ष निर्विकल्प ज्ञान होय. बाह्य स्थूल पदार्थांनीं प्रतिबद्ध झालेल्या त्या ज्ञानालाच सविकल्पक ज्ञान म्हणतात. अनुमान म्हणजे तीन प्रकारच्या लिंगांवरून होणारें ज्ञान. धूर हें अग्नीचें कार्य आहे. यास्तव तद्रूप्या कार्यरूप लिंगानें पक्षावर असणें, सपक्षावरही असणें व विपक्षावर नसणें, अशा तीन प्रकारच्या धूमादि लिंगांवरून अग्नि इत्यादिकांचें ज्ञान होणें, हें अनुमान आहे. साध्यधर्मविशिष्ट जो धर्मी त्याला पक्ष म्हणतात. साध्य अग्नि, त्याचा धर्म धूम, त्यानें विशिष्ट असलेला धर्मी पर्वत. यास्तव 'पर्वत अग्नियुक्त आहे, कारण तो धूमवान् आहे' या अनुमानांतील पर्वत हा पक्ष आहे. त्याचप्रमाणें स्वयपाकगृह हा सपक्ष व मोठें सरोवर हा विपक्ष आहे. (पहा रत्न ३ रें, पृष्ठ १४२)

बुद्धाच्या शिष्यांत माध्यमिक, योगाचार, सौत्रांतिक आणि वैभाषिक असे चार पंथ होते. या चार पंथांचीं मतें त्या त्या नांवांनीं प्रसिद्ध आहेत. या चार प्रकारच्या बौद्धांनीं *सर्वशून्यत्व, बाह्यशून्यत्व, बाह्यार्थानुमेयत्व व बाह्यार्थप्रत्यक्षत्व* असे चार प्रकारचे वाद उपस्थित केले. तथापि कांहीं गोष्टींत त्यांचें एकमत दिसतें. या एकमताच्या गोष्टी म्हणजे सर्व क्षणिक क्षणिक, दुःख दुःख, स्वलक्षण *स्वलक्षण आणि शून्य शून्य अशा चार भावना आणि त्यांपासून परम पुरुषार्थाची* म्हणजे मोक्षाची होणारी प्राप्ति या होत.

बौद्धमतांत प्रत्यक्ष व अनुमान हींच दोन प्रमाणें मानिलीं आहेत. बाकीच्या प्रमाणांना बौद्ध मानीत नाहींत. चार आर्यतत्त्वें म्हणजे दुःख, दुःखायतन, समुदय किंवा बंध, आणि मार्ग यांचें महत्त्व विशेष आहे. किंबहुना हीं तत्त्वेंच एकंदर या बौद्धदर्शनाच्या मुळाशीं आहेत.

*विज्ञान, वेदना, संज्ञा संस्कार, व रूप* असे दुःखाचे पांच प्रकार आहेत. या प्रत्येकाला स्कंध अशी संज्ञा आहे.

दुःखायतन म्हणजे दुःखाचा आश्रय किंवा ज्यापासून दुःखाची प्राप्ति होते तें. *अशीं आयतनें* बारा आहेत. त्यांचीं नांवें —पांच ज्ञानेंद्रियें, रूप, रस, गंध, स्पर्श आणि शब्द हे पांच विषय, मन, आणि बुद्धि.

(१) बौद्धदर्शनसार, पृष्ठ २२।२३

समुदय म्हणजे मनुष्याच्या हृदयामध्यें उत्पन्न होणा या रागादिकांचा समुदाय अहंकार किंवा मान आणि इतर कामना असे याचे निरनिराळे भेद आहेत. अहंकाराला आत्मस्वरूप मानिलें आहे, आणि कामना या आत्म्याचे स्वभाव होत.

मार्ग म्हणजे सर्व संस्कार क्षणिक आहेत, अशी जी स्थिर वासना ती. रागादिकांनीं व्याप्त झालेल्या मनांतल्या वासनेचा क्षय केल्याशिवाय मोक्षप्राप्ति नाहीं. वासनेचा क्षय म्हणजेच मोक्ष अथवा निर्वाण.

हीं मतें वर सांगितलेल्या सर्व संप्रदायांना सामान्य अशीं आहेत. तसेंच कांहीं आचारही सर्व संप्रदायांना सामान्य आहेत. उदाहरणार्थ, चर्मधारण, कमंडलु, मुंडन, चीरवस्त्रधारण, पूर्वाह्णभोजन, संघ व काषायवस्त्रधारण. हे आचार भिक्षूचे म्हणजे संन्याशांचे होत अहिंसा तत्त्व हें श्रावकि व भिक्षु या दोघानाही सामान्य आहे या सामान्य गोष्टी झाल्या याशिवाय प्रत्येक संप्रदायात कांहीं विशेष गोष्टी आहेत, त्या आतां क्रमाक्रमानें सांगतों

१ ला पंथ माध्यमिकाचा. या संप्रदायाला माध्यमिक हें नांव पडण्याचें कारण यांची मधली प्रत आहे म्हणजे बौद्धांच्या योग ( अज्ञात वस्तूचे ज्ञान संपादण्यासाठी शंका घेऊन तिची निवृत्ति अधिकारी पुरुषाकडून करवून घेणें ) व आचार ( गुरुवचनाचा अनन्यभावानें स्वीकार करणें ) या दोन गोष्टींपैकीं ज्या कित्येक बौद्धांनीं फक्त आचाराचाच तेवढा स्वीकार केला व योगाला टाकून दिलें, त्यांना माध्यमिक म्हणजे मध्यम प्रतीचे ठरविण्यांत आलें त्यांनीं दोन्ही गोष्टींचा स्वीकार केला असता तर ते उत्तमांत गणिले गेले असते, किंवा दोन्हींचा त्याग केला असता तर नीच गणण्यात आले असते पण एक घेतला व एक सोडली म्हणून ते मध्यम प्रतीचे ठरले

माध्यमिकांना शून्यवाद मान्य आहे. सर्व भावपदार्थांला क्षणिकत्व आहे, ही गोष्ट ते अनुमानानें गम्य मानतात ते अनुमान असें -जी वस्तु सत् म्हणजे कार्यकारी असते ती क्षणिक असते. उदाहरणार्थ मेघमंडल हें सत् आहे व क्षणिक आहे तशी भाववस्तु सत् आहे म्हणून ती क्षणिक आहे हेंच अनु-

मान सर्व गोष्टींना लाविलें म्हणजे ' सर्वं क्षणिकं ' या गोष्टीची सत्यता पटते. या माध्यमिकांचें दुसरें मत म्हणजे ' सर्वं दुःखं दुःखं ' म्हणजे हा सर्व संसार दुःखरूप आहे. त्यांत कोठेंही मनाला रमविण्याला जागा नाही; आशेचा किरण हृदयांत प्रविष्ट होऊन दुःखरूपी तमाचा विध्वंस करील असें काहीं नाहीं. यामुळेंच जगांत सर्व प्रकारच्या विपत्ति दिसतात. तिसरें मत म्हणजे ' स्वलक्षणं स्वलक्षणं,' या मताची थोडीशी फोड करणें अवश्य आहे. जगांतल्या वस्तूंत पूर्ण सादृश्य नाही. सर्वत्र भिन्नता आहे. अर्थात् प्रत्येक वस्तूवरोवर तिचें कांहीं तरी विशेष लक्षण असतें. यालाच स्वलक्षण अशी संज्ञा आहे. अमुक वस्तु अमक्या दुसऱ्या वस्तूसारखी असें सांगतां येत नाहीं. प्रत्येकाला कांहीं तरी स्वलक्षण आहे, आणि जगांतल्या सर्वव्यापी भिन्नतेचें कारण हें स्वलक्षणच आहे. आणि चवथें मत ' सर्वं शून्यं शून्यं, ' म्हणजे या जगांतल्या वस्तुमात्राला सत् म्हणतां येत नाहीं, असत्‌ही म्हणतां येत नाहीं, सदसत् ही तें नाहीं व उभयभिन्नही नाहीं. मग आहे तरी काय ? तर अर्थात् शून्य हेंच नांव त्याला योग्य आहे. अशी भावना पूर्णपणें झाली म्हणजे मनुष्य सर्व संगापासून व सर्व वासनांपासून मुक्त होतो. त्याच्या वासनांचा नाश होतो. यालाच निर्वाण म्हणावयाचें. अशीं मतें ज्यांचीं ते माध्यमिक होत

२ रा पंथ योगाचारांचा—या पंथाला हें नांव पडण्याचें कारण असें सांगतात कीं, योग आणि आचार या दोहोंचाही अंगीकार त्यांनीं केला. योग व आचार या दोन्ही शब्दांचे विशेष अर्थ वर दिलेच आहेत. या योगाचार-पंथाच्या मतें विज्ञान हा एकच पदार्थ आहे. त्याशिवाय दुसऱ्या पदार्थांना ते मानीत नाहीत. त्यांच्या मतें सर्व क्षणिक आहे या नियमाला विज्ञान सुद्धां अपवाद नाहीं. तें सुद्धां क्षणिक आहे. तथापि विज्ञानाचें संतान ( एक सारखी अखंडित परंपरा ) मानिल्यानें पूर्वविज्ञान उत्तरविज्ञानाचें अवलंबन करून आपण नाश पावतें आणि अशा रीतीनें त्याची परंपरा निराळ्या रूपानें कायम राहते. या गोष्टीला ते कापुरीचा दृष्टांत देतात तो असा-कस्तुरी फडक्यांतून जरी काढून टाकली तरी तिचा वास फडक्याला लागलेला असतोच. तसें विज्ञान जरी असतें तरी त्याचा संस्कार उत्तरविज्ञानावर झालेला

असतो, असें योगाचारी बौद्ध म्हणतात. हे विज्ञानाशिवाय ग्राह्य व ग्राहक असे दुसरे पदार्थ मानीत नाहीत. त्यांच्या मतें विज्ञानाचें स्वरूप प्रकट होण्यास अन्य पदार्थांची अपेक्षा नाहीं. विज्ञानच स्वतः स्वस्वरूपाचें प्रकाशन करण्यास समर्थ आहे. याला ते दिव्याचें उदाहरण देतात. दिवा आहे हें दाखविण्यास दुसऱ्या दिव्याची जरूरी लागत नाहीं. तो स्वतःच आपलें स्वरूप दाखविण्यास समर्थ असतो. तसें त्यांच्या मतें विज्ञानाचें आहे बुद्धि किंवा विज्ञान हें जरी एक आहे, तरी अनादि वासनेच्या योगानें अनेक पदार्थांच्या स्वरूपाच्या द्वारें तें अनेकाकार भासतें याच्या मतें, 'सर्वं क्षणिकं क्षणिक,' 'सर्वं शून्यं शून्य' इ ज्या चार भावना वर सांगितल्या आहेत, त्या मनात पूर्णपणें बिंबवून घेतल्या असतां त्यांच्या योगानें सर्व वासनांचा क्षय होऊन विशुद्धविज्ञान प्राप्त होतें, आणि ही विशुद्धविज्ञानप्राप्ति हाच मोक्ष अथवा निर्वाण होय

३ रा पंथ सौत्रांतिकाचा. यांना हें नांव पडण्याचें कारण हे लोक असें देतात कीं, बौद्धदर्शनसूत्राचा अंत (खरें रहस्य) आपणांसच एकट्यांस समजला आहे. या सौत्रांतिकांच्या मतें बाह्य पदार्थ तेवढे खरोखर आहेत, व ते प्रत्यक्ष गम्य जरी नसले तरी अनुमानानें गम्य आहेत याला ते कित्येक व्यावहारिक उदाहरणें देतात. यांतलें एक उदाहरण-एखादा मनुष्य दिवसेंदिवस पुष्ट होत असला म्हणजे त्यावरून तो भोजन करीत असला पाहिजे, असें आपण ओळखतों, व आपलें हें अनुमान खरें ठरतें तसेंच भाषा, चालचलणूक, वर्तन इ गोष्टींवरून आपणावर खरें प्रेम करणारा कोण आणि दांभिकप्रेमी कोण, याचा निवाडा आपणांस करतां येतो तसें ज्ञानाच्या स्वरूपावरून बाह्य पदार्थविषयींचें अनुमान आपणास करतां येतें.

सौत्रांतिकांनीं आलयविज्ञान व प्रवृत्तिविज्ञान असे विज्ञानाचे दोन भेद मानिले आहेत. आलयविज्ञान म्हणजे सर्वत्र 'मी मी' असें अहंकाराचें ज्ञान. व याशिवाय इतर ज्ञान म्हणजे वस्तूचे रंग, रूप इ चें ज्ञान तें प्रकृतिविज्ञान यांनाही माध्यमिकांप्रमाणें पांच स्कंध, बारा आयतनें, चार तत्त्वें वगैरे मान्य आहेत; मात्र त्यांचें स्वरूप ते निराळें समजतात, व त्यांच्या ज्ञानापासून मोक्षप्राप्ति होते असें मानतात.

४ था पंथ वैभाषिकांचा. विभाषा म्हणजे विरुद्ध भाषा. यावरून वैभाषिक हें नांव यांना मिळालें. याचें कारण असें सांगतात कीं, बुद्धगुरूनें वर सांगितलेल्या माध्यमिक, योगाचारी व सौत्रांतिक या तीन प्रकारच्या शिष्यांना निरनिराळ्या प्रकारचे उपदेश केलेले पाहून असे परस्पर विरुद्ध उपदेश गुरूनें कसे केले याविषयीं कित्येकांना आश्चर्य वाटलें. तथापि आपले गुरु फार थोर, त्यांच्या खरेपणाविषयीं शंका घेणें व्यर्थ आहे, शिष्यांच्या बुद्धीचा बोध व अधिकार यांच्या परतें दूरदृष्टि ठेवून त्यांनीं मुद्दामच असें केलें असलें पाहिजे, असा पोक्त विचार करून त्यांनीं आपल्या मनाचें समाधान करून घेतलें अशा शिष्यांना त्यावरून वैभाषिक म्हणजे परस्परविरोधाविषयीं शंका घेणारे, असें नांव प्राप्त झालें.

वैभाषिक बाह्य व अंतर असे दोन्ही प्रकारचे पदार्थ मानतात. बाह्य पदार्थ म्हणजे गंध, रूप, रस यांनीं ज्यांचें ज्ञान होतें ते, हे पदार्थ प्रत्यक्षप्रमाणानें ग्राह्य आहेत अंतर म्हणजे रूपादिक स्कंध होत, ते फक्त अनुमानानेंच ग्राह्य होत. यांना ते अध्यवसेय असें नांव देतात यांच्या मतांत हा विशेष आहे कीं, प्रत्यक्ष प्रमाणानें ग्राह्य तेवढें खरें, आणि अनुमानानें (अध्यवसायानें) ग्राह्य तें खोटें. कारण यांत कल्पनेवर कांहींशी भिस्त राहते; प्रत्यक्ष प्रमाणांत तसा प्रकार नाहीं, असें ते म्हणतात

बौद्धदर्शनासंबंधानें स्थूल असे हे चार पंथ आहेत. त्यांच्यांत पुन: पोटभेद असंख्य आहेत. त्या सर्वांची माहिती तत्संबंधाचे ग्रंथ हल्लीं उपलब्ध नसल्यामुळें येथें देणें शक्य नाहीं तथापि वर जे चार स्थूल पंथ व त्यांचीं मतें सांगितलीं, यावरून हें दिसून येईल कीं, जरी पांच स्कंध व चार आर्यसत्यें इ. कित्येक महत्त्वाच्या गोष्टी त्यांनीं बुद्धाच्या खऱ्या मतांतून घेतल्या आहेत, तरी त्यांतल्या अर्थांचे बारीक कीस काढून विनाकारण वाद माजविण्यानें आणि बुद्धाच्या उपदेशाच्या खऱ्या रहस्याकडे त्यांचें दुर्लक्ष झाल्यामुळें किंवा ते ग्रहण करण्याची पात्रता त्यांच्या ठायीं नसल्यामुळें बुद्धाच्या मूळ मताला विकृत स्वरूप देण्याचें काम मात्र त्यांनीं फार उत्तम प्रकारें केलें आहे बौद्धधर्माला बुद्धाच्या मागें

आफूळी हा पदार्थ एरवीं अगदी निरुपद्रवी असतो त्यांतून अपायकारक द्रव्यें निघतील अशी कल्पनाही करवत नाहीं पण त्याचें पृथक्करण केलें म्हणजे त्यांतूनच विषारी रसायनाद्रव्य उत्पन्न होतात त्याचप्रमाण उन्नतिप्रद असें जें धर्माचरण तें दिसावयाला अत्यंत सौम्य व हितकारी असतें. पण केव्हां ? त्याचे दोन मुख्य घटकावयव—ज्ञान व श्रद्धा हे संयुक्त असतात तेव्हां. या घटकावयवांना पृथक् काढल्याबरोबर त्यापासून धर्मवेडासारखें मोठें संहारक तत्त्व निर्माण होऊन तें मनुष्याची विचारशक्ति, भूतदया, औदार्य, शांतिप्रियता इ० सर्व गुणांचें वाटोळें करून समाजाची राखरांगोळी करण्यास समर्थ होतें बौद्धधर्माच्या इतिहासांत धर्मवेडाचें उदाहरण बहुधा सांपडत नाहीं, याचें कारण त्या धर्मांत ज्ञान व श्रद्धा यांची उत्तम सांगड घातलेली आहे

पृथ्वीवरले ठळक ठळक धर्म म्हणजे हिंदुधर्म, खिस्तीधर्म, व मुसलमान धर्म यांपैकीं शेवटच्या दोन धर्मांत धर्मवेडाच्या व धर्मयुद्धाच्या पायीं लाखों लोकांच्या प्राणांची कशी हानि झाली, तें इतिहासज्ञांस विदितच आहे हिंदु धर्माला सुद्धां धर्मवेडाचा चटका अगदींच बसला नाहीं, असें म्हणवें पाहिल्यांचें होईल मुसलमानधर्मी धर्मवेड्यानीं काफर पाहिला कीं केली त्याची सुता, किंवा तोडलीच त्याची मान, असा हुतुतू अर्धे एशियाखंड व युरोपचा कांहीं भाग यांत एका काळीं घातला होता खिस्तीधर्म हा यहुदी धर्माचा अंकुर म्हणून धर्मवेडाचें पितृधनही त्याला घ्यावें लागलें जेथें युक्तिवाद खुंटतो, तेथें बाक्कीचें प्रदर्शन करून धर्माला पुष्टि आणण्याचे वेडेपणाचे प्रयत्न होत असतात. खिस्तीधर्मांचें असेंच झालें प्रॉटेस्टंट मताला युक्तिवादानें खोडून काढतां येईना, तेव्हां अधिकाराच्या जोरावर रोमन कॅथॉलिक पंथानें प्रॉटेस्टंटांचा व पुढें प्रॉटेस्टंटानीं कॅथॉलिकांचा छळ व रक्तपात केला. हिंदुधर्मांत सुदैवानें इतपत थराला गोष्टी कधींच गेल्या नाहींत. तथापि शैव आणि वैष्णव, यांच्यांतल्या सारखे तंटे व कित्येक वेळां युद्धाशीं अगदीं विसंगत असे विरोध व त्यापासून उत्पन्न होणारे द्वेषाचे परिणाम यांपासून हिंदुधर्म अगदीं अलिप्त राहिला असें मात्र नाहीं पण या हिंदुधर्मांतलाच एक पंथ जो बौद्धधर्म ( किंवा पाहिजे तर त्याला प्राटेस्टंट हिंदुधर्म हें नांव द्यावें ) त्याला मात्र धर्मवेडाचा कलंक

असली पाहिजेत. या भिन्नत्वामुळेंच बौद्धधर्माची इतर धर्माशी तुलना करतां येत नाही.

बौद्धधर्मात श्रद्धेला स्थान नाही, असें वर सांगितलें आहे; पण त्यामुळें वाचकांचा थोडासा गैरसमज होण्याचा संभव आहे. श्रद्धेला स्थान नाहीं म्हणजे अंधश्रद्धेला थारा नाहीं, असें समजावें. ज्ञानजन्य जी श्रद्धा ती बौद्धधर्मास पूर्णपणें मान्य आहे. जें बुद्धीला अगम्य त्याचा काथ्याकूट करण्याचें ओझें बौद्धधर्म विचारी माणसाचें डोक्यावर लादीत नाहीं. जे कांहीं श्रद्धाविशिष्ट धर्म आहेत, त्याचप्रमाणें ईश्वरप्रणीत मानलेल्या ग्रंथांवर ज्या धर्मांची रचना झालेली आहे, त्या धर्मांची मतें क्रूर म्हणून त्यांचा तिरस्कार करावा, असेंही बौद्धधर्म शिकवीत नाहीं. ती मतें खरीं असोत, खोटीं असोत, त्यांचा कर्मफलानुबंधित्वाशीं संबंध येत नाहीं तोंपर्यंत त्यांच्याशीं विरोधही करूं नये, आणि त्यांवर अंधश्रद्धाही ठेवूं नये, येवढेंच बौद्धधर्माचें सांगणें आहे. इतर धर्ममतांविषयींचा हा उदारभाव हें बौद्धधर्माचें तिसरें विशिष्ट आणि अत्यंत प्रशंसनीय लक्षण आहे.

बौद्धधर्माचें चवथें विशिष्ट लक्षण म्हणजे त्याच्या मताचा शास्त्रीय तत्त्वांशी असलेला उत्कृष्ट मेळ हें होय. भौतिक सृष्टींतले नियम नैतिक सृष्टीला लावून दाखविणें हा बौद्धधर्माचा उद्देशच होता. बौद्धधर्माचा सृष्टिशास्त्रांशीं कोठेंही व कशा प्रकारेंही विरोध नाहीं. ज्ञानाच्या पायावर त्या धर्माची उभारणी झाली असल्यामुळें कालक्रमानें ज्ञान जितकें विस्तृत होत जातें, तितकी बौद्धधर्माची बळकटी येते. बौद्धधर्माला कोणतेंही ज्ञान निषिद्ध वाटत नाहीं. दुसऱ्या कित्येक धर्मांतून धर्म आणि आधिभौतिक शास्त्रें यांच्यामध्यें लढा पडलेला दिसत आहे. धर्मग्रंथांत एखादी गोष्ट एक प्रकारची सांगितली असावी, आणि भौतिक शास्त्रांच्या शोधक दृष्टीला निराळाच प्रकार दिसावा, असें झालें म्हणजे धर्म आणि शास्त्र यांची एकवाक्यता करणें कठिण होतें. या दोषांत पडलेली खिंड बळी दिलेल्या प्राण्यांच्या रक्तामांसानें भरून काढण्याचे प्रयत्न पूर्वीच्या काळीं झाले, पण त्यांनीं ती खिंड भरून निघण्याचे ऐवजीं उलट ती वाढतच गेली. कांहीं प्रसंगीं धर्म आणि शास्त्र यांच्यांतला हा विरोध धर्मवेडाच्या तीव्र रूपानें प्रादुर्भूत झाल्याचे दाखले इतिहासांत आहेत.

बिलकुल लागला नाहीं. याचें कारण बौद्धधर्मांत धर्ममतांचा दुराग्रह ( ज्याला इंग्रजींत Dogma म्हणतात तो ) बिलकुल नाहीं. गणितशास्त्रांतले सिद्धांत जसे अबाधित व तर्कपद्धतीच्या दृष्टीनें पायाशुद्ध तसे बौद्धधर्माचे सिद्धांत होत. त्यांत मतभेद होण्याला जागा अगदींच थोडी, त्यामुळें दुराग्रहपिशाचिकेला प्रवेश करण्यास वावच नाहीं. जें तर्कदृष्ट्या आक्षेपार्ह, युक्तीच्या दृष्टीनें त्याज्य, अनुभवाला विरुद्ध, अनुदारपणाचें किंवा रहस्याच्या स्वरूपाचें दिसेल, तें बुद्धानें उपदेशिलेल्या मूळच्या बौद्धधर्मांत सहसा आढळावयाचें नाहीं. 'गुरुमुष्टि' अथवा गुह्य असें बुद्धानें कांहीं ठेवलेंच नाहीं. गौप्यगोपन हें बौद्धधर्माला अज्ञातच आहे. इतकें कीं, बौद्धांच्या आचारात सुद्धां सगळे धर्मसंस्कार उघड उघड करण्याची चाल पडली आहे. बौद्धांचीं लेणीं पहा; त्यांत सगळे खुले दिवाणखाने आढळतील गुप्तमंत्रासाठीं स्वतंत्र एकांतातली जागा मिळणार नाहीं बौद्धलोक पागोड्यात ( मंदिरांत ) प्रार्थना करतात, ती सुद्धां खुल्या जागेतल्या व्यासपीठावरून करतात. त्या जागीं इच्छा त्या वेळीं हवें त्याला जातां येतें. थोड्या वर्षांपूर्वीं तिबेटांत कोणाला जाण्याची परवानगी नव्हती. पण याचें कारण राजकीय स्वरूपाचें होतें. बौद्धधर्माशीं त्या गोष्टीचा अर्थाअर्थी संबंध नव्हता.

बौद्धधर्म हा व्यक्तिस्वातंत्र्याचा मोठा अभिमानी आहे. धर्म हा ज्याचा त्याला, त्याची निवड करण्यात जुलुम उपयोगाचा नाहीं, असें त्याचें मत आहे. स्वतः गौतमबुद्ध आपल्या शिष्यांना धर्माच्या बाबतीत कधींही सक्ती करीत नसे व्यक्तिस्वातंत्र्याचा अभिमान हें देखील बौद्धधर्माचें सहावें विशेष लक्षणच म्हणतां येईल. अंतःकरणांत परिवर्तन घडल्यावांचून नुसत्या बाह्य आचरणाला महत्व देणें ही मोठी चूक आहे, ही गोष्ट बौद्धधर्मांत प्रधान आहे चित्तशुद्धि ही मुख्य असल्यामुळें ती ज्याची त्याची झाली असेल, त्याला सद्धर्माचा मार्ग नुसता दाखविणें येवढें काम पाहिजे तर दुसऱ्यानें करावें त्या मार्गानें जाणें न जाणें हा अर्थात् ज्याचा त्याचा विचार आहे. ज्याला खरोखर भूक लागली असेल त्याच्यापुढें पंचपक्वानांचें ताट आल्यावर तो तें फस्त केल्याशिवाय राहावयाचा नाहीं. बरें, जुलूम करून तरी त्याला काय प्राप्त करून घ्यावयाचें होतें ? स्वर्ग,

परमात्म्याशीं संयोग, अमृताचा लाभ वगैरे आमिष बौद्धधर्म मुळींच लावीत नाहीं. दुःखापासून मुक्ति हें काय तें त्याचें ध्येय आहे; आणि हें तर अभावात्मक ( negative ) आहे. शिवाय हें ध्येय सत्यज्ञानाच्या प्राप्तीनें साध्य होणारें आहे, आणि हें ज्ञान ज्याचें त्यानेंच मिळविलें पाहिजे असें आहे, तर बौद्धधर्मांत जुलुमाला वाव कोठून मिळणार !

अहिंसा हें बौद्धधर्माचें सातवें लक्षण म्हणता येईल. अहिंसा या शब्दाचा अर्थ नुसता निरामिष भोजन किंवा पशुक्लेशनिवारण इतकाच बुद्धानें घेतला नाहीं, तर या जगांतील प्राणिमात्राशीं अद्वैतभाव ठेवणें, दुसऱ्याच्या दुःखानें स्वतः दुःखित होणें, दुसऱ्याच्या सुखांत आपलें सुख मानणें, असा विस्तृत अर्थ या अहिंसातत्त्वाचा आहे. यालाच बौद्धधर्मग्रंथांतून ' विश्वमैत्री ' अशी संज्ञा आहे. कीडामुंगीचा जीव वांचविणें, त्यांवर दया करून त्यांना साखर खाऊं घालणें, वगैरे कामें करावीं असें इतर पुष्कळ धर्मांतून सांगितलेलें आढळतें. पण बुद्धानें सांगितलेली अशा प्रकारची अहिंसा फार थोड्या धर्मांत प्रत्यक्ष आचारांत आढळून येईल. सर्व जीवांविषयीं अभेदबुद्धि या अर्थानें बुद्ध खरो-खर अद्वैतवादी होता. त्यानें हें नुसतें 'वाद ' म्हणून सांगितलें नाहीं, तर प्रत्यक्ष आचरणांत आणून दाखविलें. त्याच्या दृष्टीनें नुसत्या तत्त्वाला तें आचरणांत आलें नाहीं तोंपर्यंत कांहीं किंमत नव्हती. तत्त्वाप्रमाणें कर्म, हेंच त्याच्या धर्माचा अर्थ होता. ज्ञानतरूला कर्मरूपी फळ लागलें, तरच त्या तरूची किंमत; नाहींपेक्षा तें झाड वठल्यासारखेंच तो मानीत असे. म्हणून अहिंसातत्व त्यानें आपल्या चरित्रांत व्यवहाराच्या सर्व अंगाला लावून दाखविलें, आणि हा त्याच्या धर्माचा एक विशेष भाग होता. बौद्धधर्मांत ईश्वरी दयेला जागा नाहीं ही एक उणीव आहे पण दुसऱ्यापासून दयेची अपेक्षा करण्यापेक्षा स्वतः भूतांवर दयादृष्टि ठेवणें हें त्याच्या दृष्टीनें अधिक श्रेयस्कर होतें.

बौद्धधर्माचीं जीं हीं विशेष लक्षणें वर सांगितलीं, त्यांवरून असें दिसून येईल कीं, बुद्धाचा धर्म हा सर्वांना सहज समजण्यासारखा नाहीं. आपला धर्म हा लोकांना यथार्थ रीतीनें समजेल किंवा नाहीं याविषयीं खुद्द बुद्धास शंका होतीच. तो म्हणत असे, 'मी आपल्या सद्धर्माचें संक्षेपतः विवेचन केलें काय, आणि

विस्तारानें केलें काय सारखेंच ते समजणारीं माणसें थोडींच सांपडणार ' बौद्धधर्माचीं तत्वें समजलीं तरी तीं आचरण्यांत येण्याला फार कठीण आहेत. सिद्धार्थ गोतमासारखे संपत्ति, वैभव, व माया यांवा पाश तटातट तोडून निश्चयाच्या बळावर अलग दुष्कर कर्म करणारे थोर पुरुष नेहमीं थोडेच असणार यांतूनच त्याग हा सर्वांत मोठा त्याग आहे तो करण्याचें सामर्थ्य ज्याचे ठायीं आलें त्याला दुष्कर असें काहीं नाहीं या त्यागाची महती बौद्ध धर्मांत विशेष मानिलली आहे, आणि बौद्धधर्मांच्या इतिहासांत अशा त्याग करणा या ठळक व्यक्तींची संख्या जितकी मोठी आढळते, तितकी दुसऱ्या कोण-त्याही धर्मांत आढळत नाहीं, ही एक ध्यानांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे या बाबतींत बौद्धधर्माच्य खालोखाल नंबर ख्रिस्तीधर्माचा लागेल खुद्द गोतमबुद्ध व तत्कालीन कित्येक राजकुलीन पुरुष, राजा अशोकाचा पुत्र महिंद व कन्या संघमित्रा व दुसरे धनवान् आणि कुलशीलवान् स्त्रीपुरुष सर्व वैभवाचा त्याग करून भिक्षु व भिक्षुणीचें व्रत कवें स्वीकारीत, आणि देशभर हिंडून धर्मका-र्यार्थ कसे देह कष्टवीत, हें पाहिलें म्हणजे मन आश्चर्यानें थक्क होतें। आणि तेंच बौद्धधर्माचें तत्व फादर डॅमियन व मिस फ्लॉरेन्स नायटिंगेल यांच्यासारख्या परोपकारी स्त्रीपुरुषांच्या रूपानें ख्रिस्ती धर्मांत पुढें अवतीर्ण झालें असावें, असेंहि मनात यतें ज्या धर्मानें अशा ठळक रीतीनें लोकांच्या अंत करणांत परिवर्तन घडवून आणिलें, त्या धर्मांत आणि त्या धर्माच्या प्रवर्तकांत कांहीं तरी विशेष आकर्षणशक्ति निःसंशय असली पाहिजे या आकर्षणशक्तीचें स्वरूप भाषेनें जरी व्यक्त करता आलें नाहीं, तरी मनानें तें जाणता येतें, आणि बौद्धधर्मसंबधानें ज्यानें कांहीं पाहिलें आहे विचार केला आहे, इति हासाचें अवलोकन केलें आहे, आणि वस्तुस्थिति जाणली आहे, त्याचीं मतें त्या धर्ममतांहून किती जरी भिन्न असलीं, तरी बौद्धधर्माच्या कित्येक विशेषलक्षणांवरून आणि विशेषतः त्यानें केलेल्या कार्यावरून त्या धर्माविषयींची पूज्यबुद्धि त्याच्या मनांत पूर्णपणे वागत व पाहिजे, आणि त्या धर्मांचा योग्य गौरव अशा माणसाच्या हातून झाल्यावांचून कधीं राहणार नाही

# उपसंहार.



बौद्धधर्माचीं सामान्य आणि विशेष तत्त्वें यांचें या पुस्तकांत आतापर्यंत जें विवेचन करण्यांत आलें आहे, त्यावरून हें कोणाच्याही लक्षांत येण्यासारखें आहे कीं, थोडक्या बाबी खेरीज करून बाकीच्या ठळक ठळक बाबतींत बुद्धानें शुद्ध, व निर्मळ अशा उपनिषद्धर्मावरच आपल्या धर्ममताची स्थापना केली; आणि त्या धर्माची उपयुक्तता लोकांच्या खरोखर प्रत्ययास येईल अशा उपायांची योजना करून आपल्या मताचा प्रसार केला. जगाचें कल्याण इच्छिणाऱ्या गुरूनें जें करावयास पाहिजे तेंच बुद्धानें केलें. नुसत्या तत्त्वज्ञानाच्या सूक्ष्म तंतूंत गुरफटून न राहतां किंवा अगडबंब परिभाषा वापरून लोकांना मोहांत न पाडतां जगांत अधम वासना व इच्छित वस्तूंचें क्षणिकत्व हीं मनुष्याच्या दुःखाच्या मुळाशीं आहेत, या वासना प्राण्याला दुःखी करतात, इतकेंच नाहीं, तर जन्मांतरा सुद्धां त्याचा पिच्छा पुरवितात, आणि म्हणून प्राण्याला भ्रमांत व भवचक्रांत पाडणाऱ्या या अधम प्रतीच्या ऐहिक वासनांचा त्याग करणें हें मनुष्याचें कर्तव्य आहे, असेंच खरा सद्गुरु लोकांना सांगत नाहीं काय ? बुद्धानें तरी हेंच केलें. वासनांचा त्याग करणें ही सामान्य गोष्ट नाहीं, महान् दुष्कर गोष्ट आहे, म्हणून हळू हळू त्या गोष्टीचा अभ्यास करणें जरूर आहे, आणि तो अभ्यास म्हणजे आत्मसंयमन करणें व दुसऱ्याच्या दुःखानें दुःख विरघळ होणें हा होय. हा अभ्यास करण्याचा कांहीं ठराविक क्रम खरा सद्गुरु घालून देईल, व अमुक नियम पाळा म्हणजे ही दुष्कर गोष्ट हळू हळू सुकर होईल असें तो सांगेल. बुद्धानें तरी हेंच केलें. त्यानें अधम प्रतीच्या वासना व मनोविकार यांचें दमन केलें, आणि त्याबरोबरच सौजन्य, नम्रता, दया, करुणा, मैत्री इ. गुणांचाही विकास केला, त्याला तो यापुढचा म्हणजे स्वार्थत्यागाचा, अहंकाराच्या त्यागाचा, आणि विश्वमैत्रीचा धडा घालून देईल. बुद्धगुरूनें तरी यापेक्षां निराळें काय केलें ? खरा सद्गुरु आपल्या शिष्यांना

असें सांगेल की 'बाबांनो, या जगांत कार्य आणि कारण यांचा नित्य संबंध आहे कारणाचीं कार्यें आपणास दिसलीं नाहींत, म्हणून तीं झालींच नाहींत असें समजणें हें अज्ञान आहे. तीं घालवयाचीं व, चुकावयाचीं नाहींत. म्हणून तुम्ही जें आचरण कराल त्याचे परिणाम भोगल्यावांचून तुमची सुटका नाहीं. तुमच्या सदाचरणाचें चांगलें फळ व दुराचरणाचें वाईट फळ तुम्हाला मिळाल्यावांचून राहावयाचें नाहीं कार्यकारणाच्या नित्यसंबंधाच्या आड येण्याची कोणाची शक्ति नाहीं म्हणून यज्ञयागादिक सर्व झूट आहे, दैवी चमत्कारही खोटे आहेत, ते माणसांस भ्रमांत पाडणारे आहेत. तुम्ही बाह्य वस्तूंपासून मोक्ष मिळण्याची अपेक्षा करूं नका, तशीच बाह्यवस्तूंपासून दुःख प्राप्त होण्याची

योच्यांत कांहीं बाबतींत दरेंच अंतर पडलें होतें तरी उपनिषत्प्रणीत तत्वें विचाराच्या दृष्टीनें तरी सर्व हिंदुधर्मीयांना मान्य होतीं बुध्दाचें मन त्या तत्वांच्या संस्कारांपासून अलिप्त राहिलें असेल, किंवा त्यानें त्यांच्याबद्दल कधीं विचार केला नसेल, या दोन्ही गोष्टी असंभवनीय आहेत ज्यांना बुद्धानें गुरु केलें होतें त्यांच्या उपदेशाच्या ओघांत तीं तत्वें बुद्धाच्या कानीं पडलींच असलीं पाहिजेत, आणि जरी खुद्द त्या गुरूंचे आचार मूळ उपनिषत्तत्वांना अनुसरून नव्हते, तरी बुद्धासारख्या विचारवंत माणसाची सूक्ष्म दृष्टि या तत्वांच्या विचारांकडे लागली असली पाहिजे त्यांचा विचार केल्यानंतर तीं तत्वें व प्रत्यक्ष आचार यांच्यांत दिसून येणारें अंतर काढून टाकण्याकडे त्याच्या सारख्या थोर पुरुषाच्या मनाचा कल होणें स्वाभाविक होतें या सगळ्या गोष्टींचा विचार केला आणि बुद्धानें पुढें विचार व आचार यांत मेळ राखण्याविषयीं आपल्या शिष्यांना जें वारंवार निक्षून सांगितलें तें पाहिलें, म्हणजे उपनिषद्धर्मांचीं तत्वें व तत्कालीन आचार यांच्यांतली खिंड भरून काढणें हें आपलें जीवितकर्तव्य बुद्धानें ठरवून ठेविलें होतें, आणि तें कार्य त्यानें अपेक्षातीत प्रमाणानें सिद्धीला नेलें, असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं हा माझा तर्क खरा असेल तर बुद्धाचा धर्म हा उपनिषद्धर्म किंवा शुद्ध ब्राह्मणधर्म यांना विरोध करणारा नसून तो प्रॉटेस्टंट ब्राह्मणधर्म होता, असें जें मी मागें एका प्रकरणांत म्हटलें आहे, त्यांत तथ्यांश किती आहे तें सुज्ञ वाचकांच्या नजरेस आल्यावांचून राहणार नाहीं, आणि बुद्धानें उपनिषद्धर्म व दर्शन यांतल्या मुख्य मुख्य गोष्टी व्यवहारांत आणून पूर्णपणें उपनिषद्धर्माचें पुनरुज्जीवन करण्याचें सत्कार्य शंकराचार्यांच्या अगोदर कित्येक वर्षें करून ठेवलें होतें, व त्याच कार्याचें सातत्य शंकराचार्यांनीं बौद्धमतांत पुढें जो भ्रष्टाकार माजला त्याचे विध्वंस आपलें वाक्चातुर्य चालवून कायम राखिलें असें जें माझें मत विचारांतीं झालें आहे त्यालाही पुष्कळांची अनुमति मिळेल, असा मला पूर्ण भरंवसा वाटतो. सध्यां तरी The Creed of Buddha या पुस्तकाचे कर्ते मि० एडमंड होम्स् या पाश्चात्य विद्वानाशिवाय माझ्या या मताचें पुष्टीकरण कोणी पाश्चात्य विद्वान् करीत असलेले मला ठाऊक

नाहींत. आमच्या लोकांनीं जरी बुद्धाची दशावतारांत गणना केली आहे, तरी सामान्य मवाद बुद्धाचें मत म्हणजे नास्तिक व ब्राह्मणधर्माचा विरोध करणारें, मत असाच आहे पाश्चात्य विद्वानांकडे पाहावें तर बौद्धधर्माचें गाढ अध्ययन केलेले प्रो० र्‍हिस डेविड्स्, पॉलॅकरस, प्रो० ओल्डनबर्ग, ड० कोपलस्टन, मॉ० पिशेल, बार्थालमी सेंट हिलेर, बॉरन प्रभृति विद्वान मंडळीला माझें मत रुचेल असा समज आज दिसत नाहीं बुद्धाच्या उपदेशाचा संदिग्धपणा माझ्या मताला त्यांची संमति मिळण्याचे मार्गांत येणारें एक मोठें विघ्न आहे त्यांचा भर बुद्धाच्या शब्दांचा अर्थ ब्राह्मणधर्माशीं बुद्धाचा विरोध दर्शविण्याकडे घेण्यावर विशेष आहे पण बुद्धाचा काळ, त्या काळाची परिस्थिति आणि सुधारक या दृष्टीनें त्याचें उच्च ध्येय या सर्वांचा विचार ते करीत नाहींत, अशी माझी समजूत आहे बुद्ध हा एक मोठा गुरु होता इतकेंच नाहीं, तर तो जगांत आजपर्यंत कोणी झाला नाही येवढा सुधारकही होता, हें त्यांस मान्य आहे. मा विचारतों कीं, ख या सुधारकाचें उच्च ध्येय काय आहे? मागची परंपरा अजीबात नष्ट करून अगदीं कोरी पाटी घेऊन तिच्यावर लिहिणें हें काय? कै० रा० न्यायमूर्ति रानडे यांना सामाजिक परिषदेच्या पीठावरून भाषण करतांना असें सांगितल्याचें मला स्मरतें कीं हें ख या सुधारकाचें ध्येय नाहीं त्यानें मागचें सगळें पुसून टाकावयाचें नाहीं. तर जुन्या परंपरेंत जो अनिष्ट व हानिकारक भाग असेल तेवढा पुसून टाकून इष्ट सुधारणेच्या भरतीने मागच्या परंपरेची पूर्तता करावयाची, हेंच सुधारकाचें खरें कर्तव्य आहे सुधारणेचा प्रचार असानेंच झपाट्यानें होईल व होतो. बुद्धानें पूर्वींची परंपरा अजिबात नष्ट करून अगदीं नवी परंपरा चालून दिली असती, तर त्याच्या धर्माचा जगभर प्रचार जो अगदीं अल्प अवधांत झाला तो कधीं तरी झाला असता काय? हा विचार कणाशासारखा प्रश्न आहे या प्रश्नाचा शांत मनानें सुज्ञ विचार करोत अशी प्रार्थना करून मी हें अपूर्ण कार्य येथें संपवितों



## या पुस्तकाच्या रचनेच्या कामीं साह्यभूत झालेल्या ग्रंथांची यादी.


I Prof. Rhys David's *Buddism.*
2 " " Buddhist India.
3 Mrs Rhys David's Early Buddhism.
4 Vincent Smith's Asoka (Rulers of India series)
5 H. Oldenberg—Buddha, his life and order.
9 Prof. Rhys David's American Lectures.
7 Kern's Manual of Buddhism.
8 P. Dhalke's Buddhist Essays.
9 Warren,s Buddhism in Translation.
10 Paul Carus–The Gospel of Buddha.
11 Col. Alcot's Buddhist Catechism
12 Subhadra Bhikshu's *Buddhist Catechism*
13 Epigraphica India.
14 Indian Antiquary
15 Dr. Coplestons Buddhism in Ceylon.
16 Hackman's Buddhism as a Religion.
17 D. N. Pal–Religion of the Hindus vo. III.
18 Compendium of Buddhist philosophy (Pali-Text *society.*)
19 A. Dharmapal–Life and teachings of Buddha.
20 Edmund Holmes–The creed of Buddha.
21 Jataka Tales.
22 Buddhism and its Christian critics.
23 Therigatha
24 Dr. Bhandarkar's Early history of the Deccan
25 Journal of the Pali Text society.

29 The National magazine of Calcutta.
27 Mc Crindle's Ptolemy.
28 Cunningham-Geography of Ancient India.
29 The Indian Review (Madras)
30 Cunningham- Corpus Inscriptionorum
31 Archeaological Reports.
32 R. C. Dutt--History of Ancient civilisation in India.
33 V. Smiths Early History of India
31 Senart-Mahavatthu.
35 Journal of the Buddhist Text society. Etc.

### संस्कृत.

३६ प्रबोधचंद्रोदय.
३७ ललितविस्तर.
३८ बुद्धचरित.
३९ अवदानकल्पलता.
४० शांकदिग्जय
४१ सर्वदर्शनसंग्रह

### मराठी.

४२ प्रो. धर्मानंद कोसंबी–बुद्ध, धर्म आणि संघ.
४३ पारखी शास्त्री–धर्म दर्प.
४४ बापटशास्त्री बौद्धदर्शनसार.
४५ विविध ज्ञानविस्तार. इ० इ०

### बंगाली.

४६ प्रो. सतीशचंद्र विद्याभूषण–बुद्धदेव.
४७ सत्येंद्रनाथ टागोर–बौद्धधर्म.
४८ डिरो री मोहन राय–कोष्ठफल.
४९ विश्वकोश.
५० प्रवासी, साहित्य, भारती, भारतवर्ष इ. मासिक पुस्तकांतले लेख.

(हा ग्रंथ डे. व्ह. ट्रं सोसायटीनें पसंत करून ग्रंथकारास बक्षीस दिलें आहे.)

# रामकृष्ण-वाक्सुधा.

## प्रथमावृत्ति.

### लेखक—कृष्णाजी गोविंद किनरे.

स्वामी विवेकानंद यांचे गुरु श्रीरामकृष्ण परमहंस यांनीं आपल्या शिष्यांना व भक्तांना भाषणप्रसंगानुरोधानें जो अमृततुल्य धर्मोपदेश केला, त्याचा यांत संग्रह आहे. यांत ज्याचें विवेचन आलें नाहीं, असा एकही धार्मिक प्रश्न नाहीं. तरें गहन पण विवेचन अत्यंत सुबोध व मनोरम असून दाखले अगदीं साधे, रोजच्या व्यवहारांतले, मौजेचे व मनाला तंद्रात पाडणारे असल्यामुळें ग्रंथ कादंबरीसारखा रसाळ आहे. इतका सोपा व सामान्य वाचकालाही मनोरम असा धार्मिक ग्रंथ हा मराठींत पहिलाच. चित्रमयजगताचे द्वारें महाराष्ट्रानें या सुधेची लज्जत पाहिलीच आहे, तेव्हां जास्त वर्णन नको. ग्रंथाचे आरंभीं परमहंसांचें मनोरम व बोधप्रद चरित्र विस्तारपणें दिलें आहे. छपाई सुंदर. बांधणी मजबूत चार सुबक चित्रें पृष्ठें २८८ किंमत १। रुपाया. ट. ख. निराळा.

## अभिप्राय.

केसरी—भाषांतर गोड व कविता त्याहूनही गोड आहेत. भाविक लोकांना आनंदजनक व परमार्थविषयाकडे चिकित्सक दृष्टीनें पाहणारास वाचनीय आहे. पुस्तकाचें बाह्यांग चांगलें आहे. मुमुक्षु—ग्रंथांतील विषयाची तारीफ प्राकृत जनांनीं काय करावी? सिद्धाची स्वानुभवाची वाणी, सगुणप्रेम व नामस्मरणाचा उपदेश फार मौल्यवान आहे. आनंद—पुस्तकांत घातलेलीं पद्यें फारच सुरस व हृदयंगम झालीं आहेत. ज्ञानप्रकाश—या पुस्तकाची भाषा सुबोध व अकृत्रिम आहे. बालबोध—पुस्तक अमृततुल्य आहे, संग्राह्य आहे. इंदुप्रकाश—रा. किनरे यांचें भाषांतर फार सरळ, आटपशीर, उठावाचें आणि जोरदार आहे. दीनमित्र—पुस्तकांत सुधेचे अठ-

**मुमुक्षु**—कागद, छपाई, बाइंडिंग वगैरे उत्कृष्ट केल्याबद्दल जसें रा. भट आणि मंडळीचें अभिनंदन करावेंसें वाटतें, तसेंच भाषांतर सरळ, प्रेमळ व मुळांतील स्फूर्ति कायम ठेवून केल्याबद्दल रा. किनरे यांचें आम्ही सप्रेम अभिनंदन करितों. **इंदुप्रकाश**—रा. किनरे यांनीं भाषांतराचें काम समाधानकारक रीतीनें केलें आहे. त्यांचा भाषा गोड, असंदिग्ध व प्रेमळ आहे. देशाच्या पारमार्थिक उन्नतीसाठीं अशा प्रकारच्या तेजस्वी प्रयत्नांचा फार आवश्यकता आहे. **बालबोध**—विषयाची निवड फार चांगली आहे. अत्यंत बोधप्रद व विचारणीय आहे. भाषा चांगली, शुद्ध, गोड व रसाळ आहे. **पंचमजार्ज**—साध्या व मूळास सोडून नसलेल्या गोड भाषेंत हें भाषांतर केलें असल्यानें महाराष्ट्रवाचकांवर खरोखर मोठे उपकार झाले आहेत. पुस्तक अंतर्बाह्य चांगलें आहे. **ज्ञानोदय**—एकंदरींत धर्माचा शास्त्रार्थरीत्या उलगडा करण्याची (स्वामींची) रीत फार चांगला आहे व ती सर्वांस मान्य करण्यास हरकत नाहीं. हिंदुधर्माचें ज्ञान मिळविण्यास हें पुस्तक साधनीभूत होईल. **शुभसूचक**—मुलाखतींत व संभाषणांत अनेक विषयांचा ऊहापोह झाला असून लोकांनीं विचारलेल्या अनेक शंकांचें समाधान स्वामींनीं फार मार्मिकपणें केलेलें आहे. **विविधज्ञानविस्तार**—पुस्तकाची भाषा विषयास अनुरूप अशी असून सुबोध आणि सरळ आहे. **ज्ञानप्रकाश**—भाषांतर फार चांगलें साधलें आहे. **लोकशिक्षण**—सनातन धर्माचीं अंगें व उपांगें इ. तसेंच शिक्षण, ब्रह्मचर्य विवाह, जातिभेद, स्वार्थत्याग, देशभक्ति इ. अनेक विषयांवर स्वामींचे सफूर्तिपूर्ण व जोरदार भरलेले विचार प्रस्तुत पुस्तकांत वाचण्यास सांपडतात. अशा तेजस्वी ग्रंथांचा मराठीच्या वाङ्मयांत भर पडेल तितकी हवी आहे. भिकार कादंबऱ्या व चकोर गोष्टी इ. च्या माला काढण्यापेक्षां अशा बहुमूल्य व लोकांना मार्गदर्शक पुस्तकांचें प्रकाशन करण्याचें व्रत रा. भट आणि मंडळी यांनीं चालविलें आहे, हें त्यांस अत्यंत भूषणावह आहे. अंतरंगाप्रमाणें पुस्तकाचें बाह्यांगही चांगलें साधलें आहे.

**भट आणि मंडळी, पुणें शहर.**